# लेखकाचा परिचय



श्री. विद्याधर भास्कर उजगरे, एम. ए. हे १९४८ सालापासून समाजकल्याण खात्यात शासकीय अधिकारी म्हणून काम करीत आहेत. त्यांनी खात्यातील निरनिराळ्या विभागात मूलभूत अधिकारी म्हणून काम केले आहे. सोलापूर, कोल्हापूर. अहमदनगर, व धुळे येथील रिमांड होम्समध्ये प्रोबेशन ऑफिसर व अधिक्षक म्हणून काम केल्यावर अहमदाबाद येथे भिक्षा प्रतिबंधक कायदा लागू करताना संस्था-स्थापनाची प्रारंभिक जबाबदारी त्यांनी पार पाडली आहे. त्यानंतर चेंबूर येथील बेगर्सहोममध्यें त्यांनी लेप्रसी व टी. बी. विभाग प्रमुख म्हणून काम केले. त्यानंतर, संचालक समाजकल्याण पुणे यांचे ऑफिसात इन्स्पेक्टर व नंतर नाशिक येथे मुख्य परिवीक्षा अधिकारी म्हणून काम केले. यानंतर महाराष्ट्र पब्लिक सर्व्हिस कमिशनने त्यांची पुणे येथील रिसीव्हिंग सेंटर फॉर बेगर्स या संस्थेचे अधिक्षक म्हणून नियद्द केली. आता श्री. उजगरे हे येरवडा औद्योगिक शाळा या मोठ्या महत्वपूर्ण संस्थेचे अधिक्षक आहेत.

श्री. उजगरे यांनी 'समाजसेवा' या खात्याच्या मुख्यपत्रातून, इतर वर्तमान पत्रे व मराठी मासिकातून इतकेच नव्हे तर भारतीय स्तरावरील समाजकल्याणाच्या मुखपत्रातून माहिती देणारे, लघुकथा, कविता व प्रबंधात्मक असे विविध प्रकारचे लिखाण केले आहे.

पुस्तक रुपाने प्रसिद्ध होणारे हे त्यांचे पहिलेच लिखाण आहे. या पुस्तकात श्री. उजगरे यांनी भिकाऱ्यांच्या प्रश्नाबद्दल माहिती व ज्ञान मनोरंजक शैलीने सादर केली आहे.

# आसरा

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती
मंडळ ग्रंथालय व कार्यालय
मुंबई-४०० ०३२.
परिग्रहण नंबर
१९०
वर्गीकरण नंबर
म. रा. सा. सं. मं. ग्रंथालय
प्र/११०
१
मंत्रालय.

लेखक :

विद्याधर भास्कर उजगरे

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ,
मुंबई.

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति
मंडळ ग्रंथालय व वाचनालय
मुंबई-४०० ०३२.
दाखल नंबर १०० दाखिल नंबर

# — निवेदन —

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रात त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृति, इतिहास कला इत्यादि विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञान करण्याचे सामर्थ्य यावे हा मुख्य उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृति मंडळाने वाङ्मय निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती–विश्व-भारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादि योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगल्भ स्वरूप व दर्जा येण्याकरिता मराठीत विज्ञान, तत्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्यावत् माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृति यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यन्त माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात तोपर्यन्त शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला परावलंबित्व रहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही. एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. वरील विषयांवर केवळ परिभाषाकोश अथवा पाठ्यपुस्तके प्रकाशित करून विद्यापीठीय स्तरावर अशा प्रकारचे स्वरूप व दर्जा मराठी भाषेला प्राप्त होणार नाही. सर्वसामान्य सुशिक्षितांपासून तो प्रज्ञावंत पंडितांपर्यन्त मान्य होतील अशा ग्रंथांची रचना व्हावयास पाहिजे. मराठी भाषेत किंवा अन्य भारतीय भाषांमध्ये विज्ञान, सामाजिक शास्त्रे व तंत्रविज्ञान या विषयांचे प्रतिपादन करावयास उपयुक्त अशा परिभाषासूची किंवा परिभाषा कोश तयार होत आहेत. पश्चिमी भाषांना अशा प्रकारच्या कोशाची गरज नसते, याचे कारण उघड आहे. पश्चिमी भाषांत ज्या विद्यांचा संग्रह केलेला असतो, त्या विद्यांची परिभाषा सतत वापराने रूढ झालेली असते. त्या शब्दांचे अर्थ त्यांच्या उच्चारांबरोबर व वाचनाबरोबर वाचकांच्या लक्षात येतात, निदान त्या त्या विषयांतील जिज्ञासूंना तरी ते माहीत असतात. अशी स्थिती मराठी किंवा अन्य भारतीय भाषांची नाही. परिभाषा किंवा शब्द यांचा प्रतिपादनाच्या ओघात समर्पकपणे वारंवार प्रतिष्ठित

लेखांत व ग्रंथात उपयोग केल्याने अर्थ व्यक्त करण्याची त्यात शक्ती येते. अशा तऱ्हेने उपयोगात न आलेले शब्द केवळ कोशात पडून राहिल्याने अर्थशून्य राहतात. म्हणून मराठीला आधुनिक ज्ञानविज्ञानांची भाषा बनविण्याकरिता शासन विद्यापीठे, प्रकाशन-संस्था व त्या विषयांचे कुशल लेखक यांनी मराठीत ग्रंथरचना करणे आवश्यक आहे.

४. वरील उद्देश ध्यानात ठेवून मंडळाने जो बहुविध वाङ्मयीन कार्यक्रम आखला आहे त्यात इतर वाङ्मयीन योजनांबरोबरच विविध सामाजिक विद्यांच्या कक्षेत येणाऱ्या विषयांवर मौलिक व शास्त्रीय ग्रंथरचना करण्याचा कार्यक्रम अंतर्भूत असून तो कार्यवाहीत आणण्यासाठी मंडळाने सामाजिक विद्या समिती नेमली आहे. मंडळाने आजवर भाषा, भाषाशास्त्र व साहित्य, तत्त्वज्ञान व मानवी इतिहास आणि सामाजिकशास्त्रे या सामाजिक विद्यांच्या कक्षेत येणाऱ्या विषयांवर मौलिक ग्रंथरचना केली आहे. 'सामाजिक करार,' 'धर्मरहस्य', 'आर्थिक सिद्धान्त व अर्धविकसित प्रदेश', महात्मा फुले 'समग्र वाङ्मय', 'स्वातंत्र्याविषयी', 'विसावे शतक आणि समाजवाद' इत्यादी मौलिक ग्रंथ या मालेत मंडळाने प्रकाशित केले आहेत.

५. मंडळाच्या सामाजिक विद्यामालेत श्री. वि. भा. उजगरे लिखित "आसरा" हे पुस्तक प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे. भिकाऱ्यांचे प्रश्न, त्यांचे स्वरूप भिक्षाप्रतिबंधक चळवळीचा उगम, विकास व त्या संदर्भात झालेले कायदे, महाराष्ट्रात हे कार्य कसे चालले, त्यानिमित्त स्थापन झालेल्या संस्था व त्यांत काम करणारे कार्यकर्ते व त्यांच्या कामाचे स्वरुप इत्यादी विषयांची अद्यावत माहिती या पुस्तकात लेखकाने दिली आहे. त्यादृष्टीने हे पुस्तक मौलिक आहे. नागरिकांना व सर्वसाधारण वाचकांना व तसेच या क्षेत्रात कार्यकरणाऱ्या कार्यकर्त्यांना हे पुस्तक उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल.

वाई :
चैत्र ११, शके १८९८
बुधवार दिनांक ३१ मार्च, १९७६.

लक्ष्मणशास्त्री जोशी,
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ,
मुंबई.

अर्पण

सुमृद्धीच्या मार्गावर जाणाऱ्या जीवनाच्या प्रत्येक दालनात प्रकाशझोत टाकून नवीन मार्ग दाखविणाऱ्या आशेस ....

—विद्याधर

मुख्यमंत्री

सत्यमेव जयते

महाराष्ट्र

सचिवालय, मुंबई ३२
दिनांक १८-१०-१९६८

स्वातंत्र्यपूर्व काळातील शासनविषयक कल्पना व तत्संबंधीची आजची कल्पना यात पुष्कळच फरक आहे. पूर्वी कायदा व सुव्यवस्था राखणे हेच शासनाचे प्रमुख कर्तव्य मानले जाई. ते कर्तव्य आजही कायम आहे. तथापि शासनाची यापेक्षाही काही अधिक जबाबदारी आहे, व ती म्हणजे समाजाचा सर्वांगीण विकास घडवून आणण्याची ही कल्पना आता प्रसृत होऊ लागली आहे. आज आपण कल्याणकारी राज्याकडे वाटचाल करीत आहोत. समाज कल्याणाच्या विविध योजना आपण आखलेल्या आहेत. कृषि उत्पादन, औद्योगीकरण, विद्युतीकरण, पाणीपुरवठा, घरबांधणी, आरोग्य, शिक्षण इत्यादी निरनिराळ्या क्षेत्रातील या योजना समाजकल्याणाच्या अंतिम हेतूनेच कार्यान्वित केल्या जात आहेत.

समाजकल्याणाच्या कार्यक्रमात भिकाऱ्यांच्या प्रश्नास महत्वाचे स्थान आहे. भिकाऱ्यांची वाढ होणे ही एक सामाजिक विकृती आहे. समाजपुरुषाचे ते विकृत अंग आहे. भिकाऱ्यांचा प्रश्न जसा महत्वाचा आहे तशी त्याची व्याप्तीही मोठी आहे. हा प्रश्न एका राज्याचा नाही. तो संबंध देशाचा. किंबहुना जागतिक स्वरूपाचा आहे असे म्हटले तरी चालेल. भिकाऱ्यांचा प्रश्न हा प्रामुख्याने सामाजिक प्रश्न असला तरी त्याला आर्थिक व धार्मिक बाजूही आहेत. तो जसा विस्तृत स्वरूपाचा आहे तसा तो गुंतागुंतीचाही आहे. तज्ञांनी व समाजसेवकांनी या प्रश्नाची केवळ चर्चा करून भागणार नाही. त्यांनी या प्रश्नाच्या सामाजिक परिणामांची समाजाच्या सर्व घटकांना जाणीव करून दिली पाहिजे.

भिकाऱ्यांच्या प्रश्नासंबंधी मराठी भाषेत फार थोडे वाङ्मय उपलब्ध आहे. अशा परिस्थितीत अनुभव व शास्त्रीय पार्श्वभूमी यावर आधारलेले "आसरा" हे पुस्तक

लिहून श्री. वि. भा. उजगरे यांनी समाजाची चांगली सेवा केली आहे. श्री. उजगरे हे पुणे येथील भिक्षेकरी स्वीकार केंद्राचे अधीक्षक आहेत. त्यांनी भिकाऱ्यांच्या प्रश्नाची प्रस्तुत पुस्तकात सांगोपांग चर्चा केली आहे. ती सर्वसामान्य वाचकास व या विषयाचा अभ्यास करू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांस उपयुक्त व उद्बोधक वाटेल असा मला विश्वास वाटतो. मराठी वाचक या उपक्रमाचे स्वागत करतील अशी मला आशा आहे. श्री. उजगरे यांच्या लेखन कार्यास मी सुयश चिंतितो व त्यांच्या पुस्तकाच्या प्रकाशनास आपला शुभेच्छा पाठवितो.

— **वसंतराव नाईक**

Minister For Social Welfare
Maharashtra State
नागपूर, दिनांक २०-१२-१९६८.

# -: प्रस्तावना :-

स्वतंत्र भारतांत समाजकल्याण क्षेत्रांत ज्या अनेक सामाजिक समस्यांच्या बाबतीत जागृती होऊ लागली आहे, अशा समस्यांत माणूस बळाचा प्रश्न महत्वाचा आहे. देशाची वाढती लोकसंख्या हा जसा माणूस बळाच्या प्रश्नाचा एक भाग आहे, त्याचप्रमाणे वाया जाणारे माणूसबळ हा तितकाच महत्वाचा प्रश्न आहे. हे वाया जाणारे माणूसबळ अनेक रूपात दिसत असते. तुरुंगातील गुन्हेगार, वेश्या, उन्मार्गी मुलें, भिकारी इत्यादी रूपाने ह्या वाया जाणाऱ्या मानवी शक्तीचा ताण राष्ट्रीय साधन संपत्तीवर दोन तऱ्हेने पडत असतो. गुन्हेगार माणसाला तुरुंगात ठेवल्यामुळे त्यावर होणारा खर्च आणि तो गुन्हेगार समाजात उत्पादक श्रम करीत नसल्यामुळे समाजाचे होणारे नुकसान. भिकाऱ्याच्यावर त्यांना संस्थेत ठेवल्यामुळे होणारा खर्च आणि भिकारी रस्त्यावर भीक मागत असताना दानधर्मातून त्याच्यावर वाया जाणारा पैसा. या विषयामध्ये पुष्कळ संशोधन व्हायचे आहे, पण या क्षेत्रातील तज्ञांचा निष्कर्ष असा आहे की भिकाऱ्यांना किंवा गुन्हेगारांना संस्थेत ठेऊन जर शासन त्यांचेवर १०० रुपये खर्च करीत असेल तर त्यांना संस्थेत न ठेवल्यामुळे शासनाचे व समाजाचे दर माणसामागे साडे तीनशे रुपये खर्च होतात. तेव्हा या माणसांना संस्थेत ठेवणे महागाईचे आहे असे म्हणता येणार नाही. गुन्ह्यांच्या प्रतिबंधनासाठी होणारा खर्च किंवा मुंबईतील दानशूर माणसे दरवर्षी जो खर्च करतात तो अंदाजे पन्नास लक्ष रुपये असतो, असा संशोधकांचा दावा आहे. म्हणून भिक्षा प्रतिबंधनाचा कार्यक्रम जास्तीत जास्त वाढीला लावावा असे महाराष्ट्र शासनाला वाटते.

तथापी हा कार्यक्रम यशस्वी होण्याच्या दृष्टिने त्याची थोडीशी पुनर्रचना करणे आवश्यक आहे असे वाटते. त्यात एक सूचना म्हणजे अशा तऱ्हेच्या उपचारक संस्था ग्रामीण भागात न्याव्यात आणि स्वीकार केन्द्रे शहरामध्ये ठेवावीत असे वाटते. माणूस भीक मागायला का प्रवृत होतो याचा सामाजिक आणि मानसशास्त्रीय अर्थ समजाऊन घेतला म्हणजे असे स्पष्ट दिसते की, आपला स्वाभिमान सोडून माणसे रस्त्यावर भीक मागू लागतात ती सुखासुखी खास नव्हे. परिस्थितीच्या आसूडाखाली मार खाऊन यापैकी

बहुतेक माणसे भिकारी बनतात. यापैकी कित्येक माणसे कुष्ठरोगी आहेत. शरीराने व मनाने अपंग झालेली आहेत. त्या अपंग माणसांना जुन्या काळी राजाकडून व नंतरच्या काळांत स्वयंपूर्ण ग्रामव्यवस्थेत आधार मिळत असे. या खेरीज देवस्थाने, धर्मशाळा, अन्नछत्रे इत्यादी सामाजिक व संस्थाचाही या अपंगांना उपयोग होत असे. बदलत्या कालमानानुसार या संस्था मोडकळीला येऊ लागल्या आणि नव्या संस्था तर उभ्या राहिल्या नाहीत. म्हणून कल्याणकारी शासनव्यवस्थेत या अनाथ अपंग माणसांना आसरा मिळाला पाहिजे तरच कल्याणकारी धोरणाच्या दिशेने वाटचाल करता येईल.

गुन्हेगार, भिकारी आदि जन समाजाकडे मी सामाजिक विघटनाचे आविष्कार म्हणून पाहातो, किंवा एक प्रकारे त्यांना सामाजिक प्रक्षोभाचे प्रतीक मानता येईल. म्हणून या समाजाच्या उपेक्षित भागाकडे समाज कल्याण कार्यकर्त्यांचे जितक्या लवकर लक्ष जाईल तितके चांगले. सामाजिक प्रश्नावर भारतीय पार्श्वभूमीला धरून आणि मराठी भाषेत फार थोडे वाङ्मय उपलब्ध आहे. समाजकल्याण क्षेत्रांत काम करणाऱ्या प्रत्येक अधिकाऱ्याला यापुढे समाजसेवेचे शास्त्र शिकणे आवश्यक होणार आहे. अशा शिक्षणासाठी लागणारी वाङ्मय संपदा हेही समाज सेवेचे नवे क्षेत्र आहे. या क्षेत्रात व विशेषकरुन या विषयात यापूर्वी माझे स्नेही श्री. शरदचंद्र गोखले यांनी बहुमोल भर घातली आहे. या परंपरेतच वाटचाल करून श्री. विद्याधर उजगरे यांनी "आसरा" हे जे भिकाऱ्यांच्या प्रश्नावर पुस्तक लिहिले त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. ह्या पुस्तकात त्यांनी भिक्षा प्रतिबंधक कायद्याचे सविस्तर विवेचन करुन या शिवाय भिकारी पकडल्यापासून त्याच्या पुनर्वसनापर्यंत घडणारी प्रक्रिया तपशीलाने सांगितली आहे. या खेरीज प्रशासन तंत्र आणि व्यक्तिकार्य वगैरे तंत्राचाही उहापोह त्यांनी केला आहे. त्याचप्रमाणे संस्थांची सूची व आवश्यक ती आकडेवारी त्यांनी या पुस्तकात दिली आहे. श्री. उजगरे हे या क्षेत्रांत "अधीक्षक" म्हणून काम करीत असल्यामुळे त्यांच्या लिहिण्याला जिवंतपणा प्राप्त झाला आहे. त्यांची भाषा सोपी, उदाहरणे जिवंत आणि पटणारी आहेत. श्री. उजगरे यांच्या हातून समाजसेवा क्षेत्रांत अशीच वाङ्मय सेवा घडो ही शुभेच्छा.

**बा. म. भास्कर**
मंत्री,
समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य.

# लेखकाचे दोन शब्द

समाजकल्याण खात्यांत सुमारे २१ वर्षे काम केल्यावर पुस्तक लिहिण्याचा मी हा प्रयत्न केला आहे. लहानपणापासून गरिबाबद्दल दया व दुःखी माणसास मदत करण्याची बुद्धी मला देणाऱ्या परमेश्वरास व माझ्या मातापितरास विनम्रपणे नमन केल्या नंतरच मी माझे मनोगत उघडे करीत आहे.

मराठी भाषेची सेवा करण्याची इच्छा मराठी हा विषय घेऊन पदवीधर झाल्यापासून माझ्या मनांत आहे. त्यातच समाजसेवेचे कार्य करीत असताना जे ज्ञान पुस्तकातून व अनुभवाने मिळाले तेच बीज रूपाने मनात रुजले व त्याला ही छोटीशी पालवी फुटली आहे. या खात्यात काम करीत असताना आठ नऊ वर्षे भिकाऱ्याच्या प्रश्नाविषयी फार जवळून माहिती मिळाली एवढेच नव्हे तर कितीतरी भिकारी हे माझे मित्र झाले. त्यांनी आपले हृदय माझ्याजवळ उघडे करून दाखविले. आपल्या समाजाच्या या खिडकीतून मला आत डोकावता आले व यातूनच मला समाजाचे फार जवळून दर्शन झाले आहे. स्वतः भिकाऱ्यांच्या बरोबर कार्य करताना मला जे कांही समजले ते इतरांच्या माहितीकरिता लिहून ठेवले आहे. समाजशास्त्राचे विद्यार्थी, सामाजिक कार्यकर्ते, या क्षेत्रांत काम करणारे अधिकारी व इतर यांनाही या पुस्तकांत बरीच नवीन व उपयुक्त अशी माहिती मिळेल असे मला वाटते.

समाजकल्याण खात्यांत काम करीत असताना श्री. शरदचंद्र गोखले यांच्याबरोबर काम करण्याची संधी प्राप्त झाली व त्याचवेळी या विषयावर लिहिण्याची प्रेरणाही त्यांच्यामुळेच मिळाली. हे पुस्तक लिहित असताना सुद्धा त्यांनी खूप उपयुक्त अशा सूचना केल्या. या त्यांच्या प्रेमाबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

या पुस्तकास पुरस्कार लिहून देण्याची विनंती करताच श्री. वसंतराव नाईक, मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांनी अनुमोदन दिले व फारच उपयुक्त असा पुरस्कार त्वरित लिहून दिल्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी राहीन.

त्याचप्रमाणे समाज कल्याण खात्याचे मंत्री श्री. बाबुराव भारस्कर यांनी तर विनंती करताच पुस्तकास सुयोग्य व शास्त्रोक्त अशी प्रस्तावना लिहून दिली. याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी राहीन.

समाजकल्याण खात्याचे भूतपूर्व संचालक श्री. श्रीधरपंत हाटे I. A. S. यांनी मौलिक सूचना केल्या. या त्यांच्या प्रेमळ मार्गदर्शनाबद्दल मी त्यांचाही ऋणी आहे.

समाजकल्याण खात्याचे सध्याचे संचालक श्री. डी. जी. जाधव I. A. S. यांनीही जे प्रोत्साहन दिले त्याबद्दल त्यांचाही मी ऋणी आहे.

समाजकल्याण खात्यात काम करणारे भूतपूर्व मुख्य निरक्षक डॉ. डी. व्ही. कुलकर्णी व श्री. जी. एन्. हर्वे तसेच सध्याचे मुख्य निरिक्षक श्री. बेलवडी व श्री. खरे तसेच विभागीय अधिकारी सर्वश्री वाईकर व गायकवाड या सर्व अधिकाऱ्यांनी हे पुस्तक लिहित असताना महत्त्वपूर्ण सूचना केल्या त्याबद्दल मी सर्वांचा अत्यंत आभारी आहे.

या पुस्तकाच्या टंकलिखित प्रती काढण्याच्या कामी कुमारी पार्वती कांबळे यांनी मोठे सहाय्य दिले. तसेच पुस्तकाला "आसरा" हे अतिशय सुयोग्य असे नाव सुचवल्याबद्दल माझ्या पत्नी सौ. आशा उजगरे यांचे आभार मानणे जरूर आहे.

तसेच या खात्यात काम करणाऱ्या व इतरही पुष्कळ मित्रांनी या कार्यात प्रोत्साहन दिले याबद्दल त्या सर्वांचे मी आभार मानतो.

पुस्तकाच्या "आसरा" या नावातून भिकाऱ्याला आश्रयाची अधिक जरूर आहे ही कल्पना ध्वनित होते. भिकाऱ्यामध्ये वृद्ध, अपंग मनोविकृत व शारीरिक व्याधींनी ग्रस्त अशांचे मोठे प्रमाण आहे. माणूस म्हणून या साऱ्यांना समाजाने आसरा देणे जरूर आहे. मनोविकृतांना व आजाऱ्यांना औषधोपचारासाठी योग्य ठिकाणी आसरा हवा असतो. त्यांना तो मिळविता यावा याची समाजाने सोय करून ठेवली पाहिजे. तसेच भीक मागण्यात गैर असे काही नाही. किंवा भीक मागणे हा आमचा अधिकार आहे असे ज्यांना वाटते त्यांना कांही वेळेस आश्रय देऊन किंवा समाजात ठेऊन सुद्धा शिक्षणाचे वा इतर संस्कार करून त्यांच्या मनामधील हा दोष काढून टाकण्याचा समाजाने प्रयत्न करावा. त्याचप्रमाणे दान देणाऱ्यांनी आपल्या दानाचा ओघ व्यक्ती ऐवजीं संस्थेकडे वळवावा या विचारांना या पुस्तकात चालना दिली आहे.

महाराष्ट्र राज्यात भिकाऱ्यांसाठी काय केले जाते ही माहिती तर या पुस्तकात दिली आहेच पण त्याच्या जोडीस समाजाची याबाबतीत काय जबाबदारी आहे याचीही कल्पना देण्याचा प्रयत्न केला आहे. याच कारणामुळे हे पुस्तक समाजकल्याण खात्यांत काम करणाऱ्यांनाच नव्हे तर आम जनतेस उपयोगी पडेल अशी आशा आहे.

हे पुस्तक छापण्याचा निर्णय, महाराष्ट्र राज्य साहित्य सांस्कृतिक मंडळाने घेतल्यामुळेच हे पुस्तक छापून तयार झाले आहे. याबद्दल मी मंडळाचा अत्यंत आभारी आहे. तसेच पुस्तकाचे हस्तलिखित तपासण्याचे (अवघड) काम एका विद्वान मित्राने केले. त्यांचेही मी आभार मानतो.

रचना प्रिंटर्सचे मालक श्री. राघोबा म्हात्रे यांनी छपाईचे काम फार वेगाने व सुबकतेने केले याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

या पुस्तकाच्या अखेर परिशिष्टामध्यें दिलेली आकडेवारी व माहिती ही जुनी आहे त्यामध्यें मला सध्यापर्यंतची आकडेवारी घालता आली नाही. तसेच नवीन बदल झालेली माहितीही उपलब्ध करून देता आली नाही. याबद्दल वाचक मला क्षमा करतील अशी आशा आहे. कारण मूळ प्रश्नात त्यामुळे फरक होत नाही.

समाजाचे प्रयत्न व परमेश्वराच्या सहाय्याने भारतातील भिकाऱ्यांचे निर्मूलन व्हावे हीच भाग्य नियंत्यापाशी प्रार्थना आहे.

— वि. भा. उजगरे

ग्रंथालय

# अनुक्रमणिका

## विभाग पहिला



## विभाग दुसरा

# प्रकरण पहिले

## विषय–प्रवेश

एका चाकाने फिरणारे दुसरे चाक व दुसऱ्या चाकामुळे फिरणारे तिसरे चाक हे या यांत्रिक युगात नेहमीच दिसणारे दृश्य आहे. एवढेच नव्हे तर ते या युगाचे प्रतीक आहे; असे म्हणावेसे वाटते. समाजाचा प्रत्येक घटक हा माणूस आहे व तो स्वतः जी हालचाल करीत असतो त्याला कारण इतर असतात व त्याच्या हालचालीमुळे इतर माणसे आपल्या हालचाली करीत असतात. समाज हे या पद्धतीने हालचाल करणाऱ्या घटकांनी तयार झालेले एक मोठे यंत्र आहे. पण हे इतके मोठे व विचित्र यंत्र आहे की एका घटकाचा दुसऱ्या घटकावर होणारा परिणाम, गती, दिशा व वेग या दृष्टींनी आकलनीय नसतो. या कारणामुळेच इतक्या मोठ्या विलक्षण घटना जीवनात घडतात की त्या कशा व का घडल्या हेसुद्धा समजत नाही. माणसाचे जीवन हे असेच आहे, असे मला नेहमीच वाटते. आता या मगनलालचीच गोष्ट पहा ना—

मी आपल्या ऑफिसात बसलो होतो. एक आंधळा माणूस दरवाजावरच्या शिपायास, मला भेटता यावे म्हणून विनंती करीत होता. मला त्यांचे हे संभाषण ऐकू आले व मीच त्याला आत बोलावून घेतले. नमस्कार केल्यानंतर समोरच्या खुर्चीत बसण्यास सांगितले त्याबरोबर तो अगत्याने बसला. मला एकदम जाणवले की हा नेहमीच भेटावयास येणाऱ्या साध्या भिकाऱ्यापैकी नाही. भिकाऱ्यांच्या स्वीकार केंद्रात अधीक्षक म्हणून काम करताना दिसून येई की भेटावयास येणारा सर्वसाधारण भिकारी माझ्या समोरच्या खुर्चीत विशेष आग्रह केल्याशिवाय बसत नसे. पण हा आंधळा माणूस आग्रह न करताच तसा बसला व म्हणून या गृहस्थाविषयी अधिक माहिती मिळवावी असे मला वाटले.

बोलता बोलता आमच्या बोलण्यातून एक चित्रपटच निर्माण झाला. मी त्याला बोलायला लावले व त्याने हळू हळू आपली जीवनगाथा माझ्या समोर उभी केली. माझ्या अपेक्षेप्रमाणे तो एके काळी गर्भश्रीमंत व्यापारी होता. तो हस्तिदंताचा व हत्तींचा व्यापारी होता. त्याचे कुटुंब गेल्या सहा पिढ्या इंग्रज सरकारचे या धंद्यातले कंत्राटदार होते. तो शेकडो मैल जंगलाचा मालक होता. इतकेच नव्हे तर 'मगनलालचा पाडा' म्हणून एक

खेडेगांव त्याच्या मालकीचे होते. स्वतःच्या जंगलात हत्ती पकडणे, हत्तींची विक्री राजे-महाराजांस करणे किंवा त्यांची हाडे व दात यांचा व्यापार भारतात व बाहेर करणे हा त्या कुटुंबाचा पिढिजाद धंदा होता.

एका मोठ्या इंग्रज कंपनीबरोबर त्याने भागीदारी करून बांधकामाचे एक बरेच मोठे कंत्राट मिळविले. कांही नैसर्गिक आपत्तीमुळे या कंत्राटामध्ये त्याला नुकसान आले. हे नुकसान एवढे मोठे होते की त्यात मगनलालला आपली सारी मालमत्ता विकून टाकावी लागली. लाखो रुपयांचे नुकसान झाले होते व त्यातच जवळची गडगंज संपत्ती नाहीशी झाली होती. पण व्यापारीच होता तो त्याने किरकोळ धंदा चालू केला. मोटारसायकलीवरून तो ये जा करीत असे. एका अभद्र वेळी त्याची मोटारसायकल रस्त्यावरून घसरली व त्याच्या दोन्ही डोळ्यांना मार बसला. शरीरावरील इतर जखमा कालांतराने बऱ्या झाल्या. पण डोळ्याच्या जखमा बऱ्या झाल्या नाहीत. हळू हळू त्याची दृष्टी पूर्णपणे गेली. त्यातच म्हातारी आई वारली व बायकोपण आजारपणात वारली. वर्ष दीड वर्षात त्याचे जीवन पार बदलून गेले. गाद्यागिरद्यावर ऐष आरामात लोळणारा मगनलाल एक गरीब आंधळा झाला. कोणतीही मदत घ्यायला त्याचा हात पुढे होईना, पण इलाजच नव्हता. त्याला मूलबाळ झालेच नव्हते. नातलगांनी त्याला हळू हळू दूर केले. मगनलाल म्हणत होता, 'साहेब, माझे म्हणण्यासारखे आता या जगात फक्त माझे हे आंधळे शरीरच आहे. मला जवळ करील असे कोणीच नाही. मी आपल्या येथे आनंदाने राहीन. हातांनी करतां येईल ते सारे काम करीन. मला विडी हे एकच व्यसन आहे. आपण मला विडी द्यावी हीच माझी आपल्याला विनंती आहे.' मी ती विनंती मान्य करताच तो आनंदाने निघून गेला. हत्तीच्या जंगलाचा हा मालक एवढा गरीब झाला होता की त्याला स्वतःची विडीची तलफ भागविता येत नव्हती. जीवन यंत्राची चाके कशी फिरली हे समजले नाही, की त्यांना विरोध करता आला नाही व शेवटी हिमालयाच्या ऊंच शिखरावरील हा बर्फाचा कडा कोसळून खोल दरीत पडला होता. आता तर तो विरघळूनही गेला होता. माझ्या डोक्यातली विचारांची चाके फिरू लागली.

भारतात भिकारी उदंड आहेत. शहरातच नव्हे तर खेड्यातही आहेत. भारतात भिकारी कोठे नाहीत? या प्रश्नाला उत्तर देणे अवघड होईल असे वाटते. भीक मागणे ही एक प्रवृत्तीच आहे. सारेच गरीब भीक मागत नाहीत. दारिद्र्यामुळे कांही लोक नाईलाज म्हणून भीक मागतात, पण पुष्कळ भीक न मागता जगणारे देखील दरिद्री लोक आहेत. कांही लोकांच्यावर लहानपणापासूनच भीक मागण्याचा संस्कार झालेला असतो.

धंदेवाईक भिकारी व भीक मागून जगणाऱ्या जमाती या अशाच आहेत. या लोकांना भीक मागण्यांत काहीच विशेष वाटत नाही. त्यांच्या बाबतीत भीक न मागणे हेच विशेष समजावे लागेल. शिक्षणामुळे व जीवनमूल्यांच्या सुयोग्य ज्ञानामुळे ही प्रवृत्ती व या तऱ्हेच्या भिकाऱ्यांची संख्या कमी होत जाईल; पण आज अशा लोकांना भीक मागणे व काही उद्योग करणे यात काही फरक आहे असे वाटत नाही. इतकेच नव्हे तर जनतेच्या धार्मिक वृत्तीचा फायदा घेऊन अशा तऱ्हेने भीक मागण्याचा आपल्याला अधिकार आहे असे म्हणण्यापर्यंत त्यांची पाळी जाते. धर्मापेक्षा रूढींनी या गोष्टींना संमती दिली आहे, व रूढीपासून जनतेने दूर जाऊ नये यासाठी परमेश्वराच्या कोपाचे भय दाखवून सुद्धा हे लोक आपली भीक मागण्याची परंपरा चालू ठेवतात. फकीर, गोसावी, वासुदेव जोशी, हिजडे, बहुरुपी, माकडवाले, अस्वलवाले किंवा आराधी जोगी या साऱ्यांची स्थिती अशीच आहे. धर्म व रूढी यांच्या आश्रयाने जगणाऱ्या अशा अनेक जमाती आहेत. या लोकांत व यांच्या बऱ्याच मुलाबाळांत भीक मागण्याची प्रवृत्ती निर्माण झालेली असते. म्हणून भिक्षेकऱ्यांच्या प्रश्नाचा विचार करीत असताना या सामाजिक परिस्थितीचा विचार करणे जरूर आहे.

त्याचप्रमाणे आपल्या समाजातील एकत्र कुटुंबपद्धती खूपच दुर्बल झाली आहे याचीही नोंद घेणे जरूर आहे. एकत्र कुटुंबपद्धतीत गुणदोष आहेत, पण आपण या ठिकाणी मुख्यतः विचार करीत आहोत तो म्हणजे या कुटुंबपद्धतीत ज्या चांगल्या गोष्टी असतात त्याबद्दलचा. एकत्र कुटुंबांत एक प्रमुख असतो. तो स्वतः कष्ट करितो व इतरांना मार्गदर्शन करून त्यांच्याकडून योग्य प्रकारे काम करून घेतो. मिळकत एकत्र करून, साऱ्यांच्या गरजांचा विचार करून त्या भागविण्याचा प्रयत्न शक्य तितक्या चांगल्याप्रकारे तो करतो. कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीवर त्याचे लक्ष असते व प्रेमही असते. प्रत्येकाच्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक मगदुराची त्याला कल्पना असते व त्याप्रमाणेच त्यांची कामाची वाटणी होते. वृद्ध व दुबळयांना त्या घरांत प्रेमाचे स्थान असते, चुकणाऱ्यांना सुधारण्याचे प्रयत्न होत असतात व त्यांच्याबद्दल एक तऱ्हेची सहानुभूती घरांत कोणाला तरी असते या सर्व कारणामुळे कुटुंबातून फुटून फारसा कोणी जात नाही. कांही वेळेस कुटुंबप्रमुखाची सहानुभूती नसली तरी इतक्या मोठ्या कुटुंबातील कोणाची तरी सहानुभूती दुबळ्यांना व चुकणाऱ्यांना असते व याच कारणामुळे मार्ग सोडून भटकणाऱ्यांची संख्या त्या मानाने कमी असते. यांत्रिकीकरणानंतर एकत्र कुटुंबे फुटून त्यातून लहान लहान कुटुंबे तयार झाली आहेत. या युगांत सांपत्तिक, भावनिक व बौद्धिक संघर्षामध्ये एकत्र कुटुंब टिकून रहाणे अशक्य झाले आहे. या लहान कुटुंबात नवरा-बायको व मुले एवढाच

परिवार असतो. आता पुरुषच नव्हे तर स्त्रीही नोकरी करण्यास सज्ज झाली आहे. शहरात रोज बाहने भरभरून लोक येत आहेत. त्यात नोकरीच्या उद्देशाने येणाऱ्यांची संख्या खूप मोठी आहे. औषधोपचारासाठी येणारे आहेत. भल्या-बुऱ्या कामासाठी माणसे शहरात येत आहेत. नवरा-बायको कामाला जात असतील तर त्यांच्या मुलांकडे लक्ष देण्यास कोणी नसते. त्यामुळे अशा मुलांचे बाबतीत अनेक बिकट प्रश्न निर्माण होतात. घरांच्या कमतरतेमुळे शहरात माणसे कोंबून भरल्यासारखी रहातात. एकाच खोलीत दोन कुटुंबेसुद्धा रहातात. झोपड्यांची संख्या वाढली आहे. गलिच्छ वस्त्यांचे भाग शहरात ठिकठिकाणी निर्माण झाले आहेत. स्वच्छता, आरोग्य, नैतिक पातळी या सर्वच गोष्टींना खूप मोठा धोका निर्माण झाला आहे. पाश्चिमात्य संस्कृतीचे भडकदर्शन घडविणारे चित्रपट व कथा, पैशाची उधळपट्टी करण्याचे विविध मार्ग, वृद्ध, अपंग व आजारी यांचे कुटुंबातील गेलेले स्थान वगैरे गोष्टी शहरांत निर्माण झालेल्या आहेत. यांत्रिकीकरणामुळे नोकरी शोधणारांची शहराकडे रीघ लागली आहे व त्यातूनच सारे गंभीर प्रश्न निर्माण होत आहेत. ही एक सांस्कृतिक क्रांतीच देशात घडून येत आहे.

या क्रांतीची लाट खेड्यापाड्यातही पसरत चालली आहे. या क्रांतीतून निर्माण होणाऱ्या सामाजिक जीवनांतील अडचणी निवारण करण्याचे प्रयत्न फारच अपुरे पडत आहेत, कारण आपला देश खूप मोठा आहे व आपल्या जवळ या दृष्टिकोनातून समाजाचा विचार करून त्याला सुधारण्याचा किंवा सावरण्याचा प्रयत्न करणारे कार्यकर्ते फारच थोडे आहेत व जे थोडेफार कार्यकर्ते आहेत त्यांचे स्थान हे काम करण्याच्या दृष्टीने महत्वाचे नाही. या परिस्थितीत ते आपले समाजकार्य विशेष वेगाने करू शकत नाहीत. भिकारी, बेकारी, भटकेपणा, मुलातील गुन्हेगारी, नैतिक अधःपतन, नको असलेली अर्भके, कुटुंबातील फाटाफूट, घटस्फोट, आत्महत्या, कुमारिकांचे मातृत्व, प्रौढातील गुन्हेगारी व लाचलुचपत अशा एक ना हजार अडचणी समाजाच्या समोर आक्राळविक्राळ रूप धारण करून उभ्या आहेत. या अधःपतनाला आळा कसा घालावा हाच यक्ष प्रश्न समाज सेवकांच्या, समाजशास्त्रज्ञांच्या व राज्यकर्त्यांच्या पुढे आहे. यातून सुटण्याचा मार्ग शक्य तितक्या लौकर सापडावा हीच सर्व विचारवंतांची इच्छा आहे.

भिक्षेकऱ्यांच्या प्रश्नापुरतेच पाहिले तर असे दिसून येते की हा प्रश्न अतिशय मोठा आहे. तो केवळ मुंबई व पुणे यासारख्या शहरांचा किंवा महाराष्ट्रापुरता नाही. हा प्रश्न संपूर्ण देशाला भेडसावणारा आहे. मुंबई व पुणे येथे जे भिकारी पकडले जातात त्यांत भारतातील सर्व राज्यांतील लोक असतात. इतकेच नव्हे तर महाराष्ट्रीय भिकाऱ्यां-

पेक्षा बाहेरच्या राज्यातील भिकाऱ्यांचे प्रमाण अधिक असल्याचे मुंबईमध्ये पकडलेल्या भिकाऱ्यावरून आढळून आले आहे. भारतातील इतर सर्व शहरामध्ये भिकाऱ्यांची वर्दळ आहेच.

भिकाऱ्यांच्या संख्येचा अंदाज घेण्याचे काही पद्धतशीर प्रयत्न करण्यात आले आहेत. अर्थात हे अंदाज आहेत. बृहन् मुंबईमध्यें ४० ते ५० हजार भिकारी असावेत व पुण्यामध्ये ३ ते ४ हजार भिकारी असावेत असा अंदाज आहे. भिकाऱ्यांच्या या अफाट संख्येकडे पाहताच लक्षांत येते कीं या दोन शहरातील भिकारी सांभाळणेसुद्धा महाराष्ट्र राज्यासारख्या राज्याला अशक्य आहे. सध्या महाराष्ट्रामध्ये शासकीय व खाजगी संस्था-मधून सुमारे ४ हजार भिकाऱ्यांना सांभाळण्याची सोय आहे.

भिक्षाप्रतिबंधक कायद्याप्रमाणे भिकाऱ्यांचा ताबा घेऊन, त्यांच्यावर योग्य ती प्रक्रिया करून त्यांचे पुनर्वसन करणाऱ्या योजना भारतातील सर्वच राज्यात नाहीत. फार थोड्या राज्यांत अशा लहान लहान योजना आहेत. महाराष्ट्रातील जेवढे भिकारी एखाद्या राज्यांत सापडले असतील तेवढेच त्या राज्यातील भिकारी महाराष्ट्राकडून घेतले जातात व महाराष्ट्रीय भिकाऱ्यांना महाराष्ट्रात पाठविले जाते. या प्रकाराला 'रेसिप्रोकल' अदला-बदल म्हणून संबोधण्यात येते. आतापर्यंत महाराष्ट्राने इतर प्रांतात पाठविलेल्या सर्व भिकाऱ्यांची संख्या ४०० ते ५०० पेक्षा अधिक नाही.

भारतातील इतर राज्ये, त्या राज्यातील येथे सापडलेल्या भिकाऱ्याकरिता काही अनुदान द्यावयास तयार नाहीत, इतकेच नव्हे तर सध्या चालू असलेल्या भिक्षेकऱ्यांच्या या कार्याच्या खर्चातील वाटा केंद्र सरकार सुद्धा घ्यावयास तयार नाही. या कार्यक्रमात ज्या सुधारणा करण्यात येतात किंवा जी वाढ करण्यात येते, त्या साऱ्या गोष्टींचा पंचवार्षिक योजनात अंतर्भाव केला जातो व या कार्यक्रमाकरिता ५० टक्केपर्यंत अनुदान मात्र केंद्र सरकारकडून मिळते.

वरील विवेचनावरून लक्षांत येण्यासारखे आहे कीं भिकाऱ्यांचा प्रश्न अतिशय मोठा व जिकिरीचा आहे. तो कोणत्याही एका प्रांतापुरताच मर्यादित नसून संबंध भारताचाच आहे असे म्हटल्यास फारसे वावगे होणार नाही. त्याचप्रमाणे या प्रश्नाची सोडवणूक कोणतेही एक राज्य करू शकणार नाही. म्हणूनच या प्रश्नाची सोडवणूक केंद्रीय नियंत्रणा-खाली झाली तर ते प्रयत्न अधिक फायद्याचे होतील. तरी सुद्धा समाज सेवकांनी व या शास्त्रातील विद्वानांनी व सरकारांनी या विषयी गंभीरपणे विचार करावा अशी स्थिती जरूर निर्माण झाली आहे.

भिक्षा प्रतिबंधक कायद्याखाली अटक होऊन सुटलेली माणसे भीक मागतात काय व त्यांचे प्रमाण किती असावे हा एक प्रश्न आहे ? भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणे अटक झालेल्यापैकी सुमारे निम्म्या लोकांना कोर्टातर्फे जामिनावर सोडण्यात येते. पुष्कळांचे नातलग किंवा मित्रमंडळी पुढील चांगल्या वर्तणुकीचा जात मुचलका देऊन त्यांना सोडवून घेतात. तर कांही लोकांना त्यांच्या स्वतःच्या जामिनावर सोडण्यात येते. ही माणसे पुन्हा समाजात गेल्यावर भीक मागूनच आपला उदरनिर्वाह करतात काय ? किंवा त्यांच्यात सुधारणा होते का ?

भिक्षा मागणे ही एक सामाजिक विकृती आहे. ती अनेक कारणामुळे निर्माण झालेली आहे. म्हणजेच या विकृतीला जबाबदार असणारी कारणे समाजात विखुरलेली आहेत. मनुष्य भिक्षेकरीगृहात आणून त्याला जरी सुधारले तरी तो जेव्हा समाजात जातो तेव्हा त्याला पूर्वीच्याच विकृत वातावरणात रहावे लागते. शिवाय त्याच्या मनावर केलेला परिणाम पुष्कळवेळा अशा परिस्थितीत टिकून रहात नाही आणि तो पुन्हा भीक मागण्याची शक्यता निर्माण होते.

आजारी पडलेला माणूस दवाखान्यात जाऊन बरा होऊन येतो, पण तो परत आजारी पडणारच नाही असे म्हणता येईल काय ? क्षयासारख्या चेंगट आजाराने आजारी असलेला माणूस घरात खाण्याची आबाळ झाली किंवा घरात मानसिक समाधान मिळाले नाही तर पुन्हा आजारी पडतोच. त्याचप्रमाणे भिक्षा मागणाऱ्याचे सुद्धा आहे.

या विषयावर उपलब्ध असलेली आकडेवारी पाहिली तर दिसून येते कीं शेकडा ६·४ टक्के भिकारी पुन्हा पकडले गेले आहेत कोर्टातून सुटलेल्या व संस्थामधून मुदत संपल्यावर सोडलेल्या लोकांच्या पैकी फक्त ६·४ टक्के लोकच पुन्हा पकडले जातात. या आकड्यावरून असे वाटते की पुन्हा पुन्हा भीक मागणाऱ्यांचे प्रमाण फार मोठे नसावे.

आजच्या यंत्रणेत, सुटून गेलेल्या प्रत्येक माणसावर लक्ष ठेऊन त्याला मदत करण्याची किंवा तो काय करीत आहे याची माहिती मिळविण्याची योजना नसल्यामुळे प्रत्यक्ष किती माणसे सुधारली हे आकड्यांनी दाखवून देता येणार नाही. परंतु वर निदर्शनास आणून दिलेली आकडेवारी हे या कायद्याच्या सदुपयोगाचे अप्रत्यक्ष गमकच आहे, असे खचित म्हणता येईल. या कामात परिपूर्णता आली आहे किंवा ते सुधारणेच्या पलिकडे आहे असा अर्थ नव्हे. जे काम चालू आहे ते थोडे असले तरी चांगले आहे व त्यातून अनेक माणसांचे जीवन सुधारत आहेत.

संस्थेमध्ये आल्यानंतर सर्व प्रकारच्या भिक्षेकऱ्यांची योग्य ती काळजी घेतली जाते. आजारी आहेत त्यांच्यावर इलाज तात्काळ सुरू होतो. अपंगांना मानसिक समाधान देऊन सुयोग्य असे धंदे शिक्षण देण्यात येते. वृद्धांना व अतिशय विकलांग झालेल्यांना सांभाळले जाते.

मानसिक विकृती झालेल्यांची चिकित्सा करून त्यांना सुधारण्याचे शक्य ते सारे प्रयत्न करण्यात येतात. सुदृढांना येत असलेल्या व्यवसायात चालना दिली जाते. किंवा त्यांना येतील असे उद्योग शिकविले जातात. या सर्व प्रयत्नांचा उद्देश एकच कीं हा इसम जेव्हा पुन्हा समाजात जाईल तेव्हा त्याला आपल्या पायावर उभे रहाता यावे. आज नोकरी मिळण्याच्या दृष्टीने काय अडचणी आहेत हे सर्वांना माहित आहे. सर्वसामान्य व उत्तम कामगारालासुद्धा लौकर नोकरी मिळत नाही अशी परिस्थिती आहे. नोकरीच्या क्षेत्रांत वेगवेगळ्या प्रकारची तीव्र चढाओढ आहे तेव्हा या सामाजिक परित्यक्ताला व प्रमेयात्मक बनलेल्या माणसाला कोण नोकरी देणार ? तरीसुद्धा नोकरी देऊ शकणाऱ्या संस्थांना व व्यक्तींना गळ घालून कितीतरी लोकांना नोकऱ्या लावून दिल्या जातात व कितीतरी लोक सर्वसामान्याप्रमाणे आपले काम योग्य तऱ्हेने करीत आहेत हे पाहून जे समाधान होते त्याची कल्पनाच करवत नाही.

आपण आतांपर्यंत ज्या कार्याचा विचार केला ते कार्य प्रमेयात्मक बनलेल्या व्यक्तीबद्दलचे आहे. भिकारी हा सामाजिक परिस्थितीमुळे समाजातून बाहेर निघालेला असतो. सामाजिक धारणेला जरूर अशी त्याची वर्तणूक नसते. भिकारी हा समाजरूपी भिंतीतून निखळलेला चिरा किंवा दगड होय. या निखळलेल्या चिऱ्यांना त्यांच्या पुन्हा जागी बसवताना टाकीचे घाव घालून त्याचा नको असलेला भाग काढून टाकावा लागतो. त्याचप्रमाणे तो चिरा किंवा दगड ज्या ठिकाणी बसवावयाचा असतो ती जागा साफ करावी लागते. कोंदणातून निसटलेला खडा बसवताना सुद्धा सोनाराला मुख्यतः कोंदणातच सुधारणा करावी लागते. समाजाचे कोंदण कोरून दुरूस्त करण्याचे काम सोपे नाही. एक माणूस बदलणे जर येवढे अवघड आहे तर त्या माणसाच्या भोवतालच्या व्यक्तींनी बनलेले वातावरण बदलणे किती अवघड आहे ! या, कुटुंबातून गेलेल्या माणसाला परत घ्यायला मुळात कुटुंबातील लोकच तयार नसतात, मग बाजूच्या लोकांची सहानुभूती मिळविणे किती अवघड आहे याची कल्पना येईल. भिकाऱ्यांच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने अत्यंत जिकिरीचे व सारखे स्वरूप बदलणारे हे कार्य यशस्वीरीतीने करणे हे सर्वसामान्यास जमणारे नाही.

कोणत्याही व्यक्तीमध्ये होणारी अशाप्रकारची सुधारणा ही हळू हळू होत असते.

एकादा गुन्हेगार सुधारत असताना त्याच्या दोन गुन्ह्यामधील कालावधी वाढत असतो. जर तो रोज गुन्हा करीत असेल तर तो आरंभी आठवड्यातून एकदा गुन्हा करू लागेल, मग पुढे महिन्यातून एकदा, अशा प्रकारे तो हळू हळू सुधारेल. पण अशा सुधारणाऱ्या व्यक्तीला समाज व कायदा संरक्षण देऊ शकत नाही. भिकारी या नियमास अपवाद नाही. त्यालासुद्धा असेच सुधारावे लागेल. समाज, कुटुंब, प्रमेयात्मक व्यक्ती व मदत करणारी व्यक्ती या साऱ्यांच्या प्रयत्नातून व विशेषत: अधिकारी व्यक्तीच्या कौशल्यातून व कार्याच्या तळमळीतून व्यक्तीचे पुनर्वसन रूप घेते. एका एका व्यक्तीला सुधारून त्यांच्या पुनर्वसनाची मालिका बनविणे ही अतिशय अवघड अशी गोष्ट आहे.

पुण्यप्राप्तीसाठी किंवा दयेच्या पोटी भिकाऱ्यांना दान देणे कितपत योग्य आहे याचा समाजास विचार करावयास लावील असे वाङ्मय सिद्धहस्त लेखकांनी शास्त्रशुद्ध रीतीने लिहिले पाहिजे किंवा कोणीतरी लिहून घेतले पाहिजे. नाटक सिनेमातून व वाङ्मयातून पुष्कळवेळा भिक्षेची तरफदारी अवधान नसल्यामुळे होते. या प्रकाराला आळा घातला पाहिजे. याच वेळी सुयोग्य मार्गाने दया कशी करावी याचे शिक्षण बालवयातच मुलांना देण्याचे दृष्टीने क्रमिक पुस्तकात काही पाठ घालण्यात यावे व लहानपणापासून मुलांचा दृष्टिकोन निर्दोष बनवावा.

भिकाऱ्याला दान दिल्याने तो सुधारत नाही. तो भिकारीच रहातो. सुयोग्य संस्थेला दान दिल्याने भिकाऱ्यास सुधारण्याचा शास्त्रोक्त प्रयत्न केला जातो व त्याचे भेडसावणारे नजिकचे प्रश्नसुद्धा सुटू शकतात. अशा लोकांना चांगले नागरिक बनविण्याचे प्रयत्न काही संस्था करीत आहेत; अशा संस्थांना सहाय्य करणे म्हणजेच भिकाऱ्यांचा प्रश्न सोडवण्याला मदत करण्यासारखे आहे. या सर्व विषयावर सोपे व मनोरंजक वाङ्मय लिहिले जावे व त्याचा उपयोग क्रमिक पुस्तकातून करून नवीन पिढीची मते शास्त्रशुद्ध बनवावीत असे वाटते.

अपंग, वृद्ध, व्याधीग्रस्त व वेडे या सर्व प्रकारच्या लोकांना समाजात योग्य स्थान नाही, पण म्हणून त्यांना आता भीक मागण्याची स्थिती येऊ नये. त्यांना सन्मानाने जाऊन रहाता येईल अशा खूप संस्था समाजाने निर्माण केल्या पाहिजेत. सध्या महाराष्ट्रात हे कार्य करणाऱ्या सरकारी व सरकारमान्य (प्रमाणित) अशा संस्थांची यादी परिशिष्ट 'अ' मध्ये दिलेली आहे. अशा संस्था फक्त १७ आहेत. या सर्व संस्थामधून आश्रय घेणाऱ्यांची संख्या सुमारे ३,००० इतकी आहे. सरकारी (शासकीय) व प्रमाणित संस्थांमध्यें तीन चार संस्था अशा आहेत की ज्या ठिकाणी अपंगांना व वृद्धांना ठेवता येईल.

ही सामाजिक तरतूद फार तोकडी आहे. भिकारी नसलेल्या अपंगांना व वृद्धांना सांभाळणाऱ्या अपंग कल्याण विभागातर्फे मान्यता पावलेल्या १४ संस्था असून त्यांतील वृद्धांची व अपंगाची संख्या ३०० च्या वर नाही. यावरून असे म्हणता येईल की महाराष्ट्रात अशा वृद्ध व अपंग यांना सांभाळणाऱ्या संस्था जरूरीच्या मानाने फारच कमी आहेत. समाज सेवकांनी व शासनाने अशा आणखी संस्था काढल्या पाहिजेत. जनतेने उदार हस्ते अशा संस्थांना मदत केली पाहिजे. व शासनानेसुद्धा सुयोग्य संस्थांना भरपूर प्रमाणात अनुदान दिले पाहिजे. या लोकांना समाजात व कुटुंबांत पूर्वी मानाचे स्थान होते. पण आता बदलत्या सामाजिक परिस्थितीमुळे ते नाहिसे झाले आहे. या कारणामुळे अशा लोकांना सांभाळण्याची नैतिक जबाबदारी समाजाची व पर्यायाने शासनाची आहे. या संस्थात प्रवेश सन्मानपूर्वक व सुकर असावा. तेथे कायद्याचा बडगा किंवा त्याची टोचणी असू नये. अशा प्रकारच्या कार्यांनी समाजाचा कोसळणारा हा बुरुज सांभाळता येईल.

या सर्व कार्याला पैसा कोठून आणावयाचा ? कर देणाऱ्यांचा पैसा वापरावयाचा काय ? या प्रश्नाचा विचार करीत असताना एक गोष्ट निदर्शनास येते की, आपला समाज खूप दयावंत व दानधर्म करणारा असा आहे. एका पहाणीमध्यें असे दिसून आले आहे कीं, मुंबई शहरात एका वर्षांत दान धर्म म्हणून रोख रकम रु. छत्तीस लाख दिली जाते. अन्न, वस्त्र व इतर गरजेच्या वस्तू किंवा संस्थांना दिलेल्या देणग्यांचा यात समावेश नाही. मुंबई शहर हेच समाजाच्या दातृत्वाचे प्रतीक मानले तर दानधर्म करणाऱ्यांची संख्या खूप मोठी आहे. मद्रास शहरात नुकतीच एक पहाणी करण्यात आली. त्यात असे दिसून आले की मद्रास शहरातील ८० टक्के लोक दान देतात. शहरांतील लोकापेक्षा खेड्यातील व ग्रामीण लोक अधिक धार्मिक वृत्तीचे आहेत असे मानले तर भारतीय लोक किती मोठ्या प्रमाणावर दानधर्म करतात हे दिसून येईल. भारताच्या पातळीवर एक मोठी 'गंगाजळी' प्रामाणिक सिद्धहस्त व दूरदृष्टीच्या नेत्यांनी काढली तर खूप मोठा निधी सहज जमा होईल व या साऱ्या तऱ्हेच्या लोकोपयोगी संस्था समाजाला चालविता येतील. परदेशात अशा यंत्रणा आहेत व त्या मोठे कार्य करीत आहेत. भारतातसुद्धा असा प्रयोग करावयास हरकत नाही. हे कार्य करावयास चारित्र्यवान् निस्पृह व सच्च्या समाज सेवकांची जरूर आहे. सध्या असे लोक मिळणे अवघड असले तरीसुद्धा ही परिस्थिती बदलून जाईल व ही धुरा सांभाळणारी माणसे पुढे येतील याची खात्री वाटते.

# प्रकरण दुसरे

## भिक्षा प्रतिबंधक कायदा

भिकारी फार प्राचीन काळापासून भारतात आहेत. अगदी सुधारलेल्या देशामध्ये-सुद्धा भिकारी आढळतातच. अर्थात त्यांचे प्रमाण फार कमी आहे व त्यांची भूक पण वेगळी असते. भीक मागणारा अन्नच मागतो असे नाही तर पैसा, कपडे वगैरे वस्तूदेखील मागतो. पैसा मिळाला तर बाजारात वाटेल ती वस्तू विकत घेता येते. परदेशात एकादा छुपा भिकारी मद्याच्या बाटलीची मागणी करताना दिसतो. अशा आहेत भिकाऱ्यांच्या तऱ्हा.

मोठाली युद्धे, धरणीकंप, पूर अशा मोठाल्या नैसर्गिक आपत्तीनंतर किंवा दुष्काळा-नंतर भिकाऱ्यांची संख्या वाढल्याचे आढळून येते. याशिवाय यांत्रिकीकरणामुळेही भिकाऱ्यांची संख्या वाढल्याचे दिसते. निरनिराळ्या देशांनी हे प्रश्न सोडवण्यासाठी कायद्याचा उपयोग केला आहे.

मालमत्ता कायदा करताना असे गृहीत धरले जाते की प्रत्येक माणसाला आपल्या उदरनिर्वाहाचे साधन आहे व तो चांगले काम करून आपले व आपल्या कुंटुबाचे पालन पोषण करू शकतो. असे असूनही जर एकादा माणूस चोरी किंवा इतर गुन्हा करून पैसे किंवा इतर वस्तु मिळविण्याचा प्रयत्न करीत असेल तर तो महत्वाचा गुन्हा मानण्यात येतो. पण देशात मोठा दुष्काळ पडला असताना लोकांनी केलेल्या चोऱ्या या त्या मानाने कमी दर्जाचे गुन्हे ठरतात. याबाबतीत प्रसिद्ध गुन्हेगार शास्त्रज्ञ श्री. हॅन्स् फॉन् हेंटिग (Mr. Hans Von Hentig) यांनी आपल्या "Panishment" या पुस्तकांत लिहिले आहे.

"Thus the judgment of delicts against property supposes a dishonest and subduable intention of appropriation, which, according to its moral accentuation rests on the assumption of normal industrial conditions and normal possibilities of work."

( याप्रमाणे मालमत्तेबाबतच्या गुन्ह्यावर निर्णय देताना अप्रामाणिकता व फसवून मालमत्ता ताब्यात घेण्याची इच्छा गृहीत धरली जाते. या निर्णयाची नैतिक गुणवत्ता सामान्य उद्योग स्थिती व नोकरी मिळण्याची सामान्य स्थिती यावर अवलंबून असते. )

या तऱ्हेच्या भिकाऱ्यांच्या बाबतीत कायदे करतानासुद्धा याचा विचार केला जातोच. अनेक प्रकारच्या सामाजिक परिस्थितीमुळे भिकाऱ्याची संख्या टिकून आहे व वाढते आहे. त्यामुळे ही परिस्थिती कायम राहू नये म्हणून कायदा करून परिस्थिती शक्य तेवढी आटोक्यात आणावी ही इच्छा त्यामागे आहे. शिवाय इतर कायद्याप्रमाणे हा कायदा शिक्षा देणारा नाही. भिक्षा मागणे हा जरी गुन्हा मानण्यात आलेला असला तरी अशा लोकांची सुधारणा व्हावी म्हणून त्यांना स्थानबद्ध करून उद्योगधंदे शिकविणे, त्यांची अन्न-पाण्याची सोय करणे, तसेच वृद्ध, अपंग व आजाऱ्यांची सोय करणे ही शिक्षा नव्हे. भिकाऱ्याचेसाठी करण्यात येणारे कायदे सामाजिक स्वरूपाचे असल्यामुळे त्यांचा उद्देश शिक्षा करणे हाच नसून सुधारणा करणे व काळजी घेणे हा असतो. मुले व स्त्रिया यांचे बाबतीत करण्यात येणारे कायदे सुद्धा अशाच प्रकारे सुधारण्याच्या हेतूने केलेले कायदे आहेत. म्हणून देशातील सांपत्तिक स्थिती फार चांगली असो किंवा नसो तरी सुद्धा असे कायदे देशांनी वेळोवेळी अंमलात आणले आहेत. भारतात सुद्धा असे कायदे निरनिराळ्या स्वरूपात व परिस्थितीत तयार केलेले आहेत. अर्थातच भिकाऱ्यांचे पुनर्वसन करण्याचा हेतू त्यातील काही कायद्यात आहे तर काही कायद्यात त्यांना जरब बाटावी व त्यांनी तेथे भीक मागण्याचे बंद करावे असे वेगवेगळे हेतू आहेत. जरब निर्माण करणारे कायदे अर्थातच शिक्षा करणारे किंवा दंड करणारे असे आहेत. याशिवाय काही कायद्याचा हेतू भिकाऱ्यांना प्रतिबंध करण्याचा असतो. त्यात त्यांच्या पुनर्वसनाचा भाग फार कमी असतो. असे वेगवेगळे हेतू मनांत ठेऊन कायदे करण्यात आले आहेत.

सर्व तऱ्हेच्या भिकाऱ्यामध्ये मुलांचा प्रश्न विशेष महत्वाचा आहे. मुले ही लहान व अजाण असल्यामुळे त्यांच्यावर खूप अन्याय व जुलूम होतो. काही मुले स्वतः होऊन भीक मागतात पण लहान मुले पळवून आणून त्यांना अपंग बनवून भीक मागण्याचे साधन म्हणून वापरणारे काही समाजकंटकही आहेत. या कामाकरिता पळवून आणलेली मुले विकली जातात. वरील सर्व गोष्टींचा विचार करून इंडियन पीनल कोडचे कलम ३६३ [अ] १५-१-१९६० पासून अंमलांत आणले आहे. हे कलम पुढीलप्रमाणे आहेत.

" ३६३ (अ) भीक मागण्याच्या धंद्याकरिता किंवा भीक मिळविण्याच्या उपयोगाकरिता कोणत्याही इसमास रखवालीतून चोरून नेणे किंवा अल्पवयी इसमाचा कब्जा मिळविणे. शिक्षा दहा वर्षे कैद व दंड.

(२.) भीक मिळवण्याच्या धंद्याकरिता किंवा तशा उपयोगाकरिता अल्पवयी इसमास किंवा त्याच्या अवयवास निरुपयोगी करील तर, शिक्षा, आजन्म कैद व दंड. ”

समाजकंटकापासून मुलामुलींचे संरक्षण करावे या हेतूनें वरील सुधारणा इंडियन पीनल कोडच्या कायद्यात १९६० साली करण्यात आली. या कायद्याची अंमलबजावणी करण्यात आली आहे. कायद्याची अंमलबजावणी करणाऱ्यांनी या कायद्याचा शक्य तेवढा अधिक फायदा करून घेऊन अडचणीत सापडलेल्या व सापडणाऱ्या मुलांची सोडवणूक करावी म्हणून या गुन्ह्याकरिता शिक्षा जबर ठेवली आहे, कारण या प्रकारे वागल्याने होणाऱ्या शिक्षेची भीती समाज कंटकांच्या मनात निर्माण होणे जरूर आहे.

याशिवाय भारतातील बहुतेक सर्व राज्यामध्ये मुलांसाठी कायदे केलेले आहेत व त्या कायद्याखाली मुलांची काळजी सरकार घेते. महाराष्ट्रातही असा कायदा आहे. या कायद्याचे नाव ‘मुंबई मुलांचा कायदा १९४८’ हा कायदा मूळ स्वरूपात १९२४ साली करण्यात आला.

## मुंबई मुलांचा कायदा १९४८

ज्या लहान मुलामुलींना भिकारी बनविण्यात येते त्यांच्या बाबतीत उपाय योजना करावी या उद्देशाने मुंबईमध्ये १७ जुलै १९२० रोजी सभा बोलाविण्यात आली होती. या सभेचे अध्यक्ष मुंबईचे एक प्रमुख न्यायाधीश सर मॅकलेऑड हे होते. त्यापूर्वी १९१५ साली डॉ. जहांगीर करसेटजी यांनी या प्रश्नाला मुंबईत चालना दिली. हा प्रश्न अपंग केलेल्या भीक मागणाऱ्या मुलांच्या बाबतीत मुख्यतः निर्माण झाला होता व याच प्रश्नासंबंधीच्या चळवळीतून ‘मुंबई मुलांचा कायदा’ १९२४ साली झाला व १९४८ सालचा ‘मुंबई भिकाऱ्यांचा कायदा’ करण्याची पूर्वतयारी झाली.

१९४८ चा मुंबई मुलांचा कायदा हा भारतात मुलांच्या कायद्यामध्ये अग्रेसर मानण्यात येतो. या कायद्यात मुलांच्या समस्यांशी, तसेच या प्रश्नाशी निगडीत अशा सर्व परिस्थितीशी मुकाबला करण्याची तरतूद करण्यात आली आहे व वैचारिकदृष्ट्या हे विशेष महत्वाचे मानले जाते. गुन्हेगार मुलानाच नव्हे तर अनाथ परित्यक्त, योग्य कुटुंब नसलेल्या व ज्या मुलावर गुन्हा होण्याची शक्यता आहे किंवा ज्या मुलावर गुन्हा झालेला आहे अशा सर्व मुलांना या कायद्याखाली आसरा देता येतो. तसेच गुन्हे करणारी व ज्यांच्या हातून गुन्हा होण्याची शक्यता आहे अशीही सर्व मुले या कायद्याच्या कक्षेत

येतात. व त्यांना सन्मार्ग दाखवण्याचे कार्य हातात घेता येते. अर्थातच भीक मागणारी व ज्यांना भीक मागावयास लावली आहे अशीही मुले रिमांड होममध्ये घेता येतात. मुलांची काळजी नीट न घेणाऱ्या तसेच मुलांचा दुरुपयोग करणाऱ्या समाजकंटकांना शिक्षाही देता येते. या दृष्टीने या कायद्यातील कलमे ४० व ४७ ही महत्वाची आहेत. तसेच मुलांच्या बाबतीत गुन्हे करण्याच्या दृष्टीने ६ व्या विभागांतील कलमे ४८ ते ६३ ही महत्वाची कलमे आहेत.

## स्त्री व शिशु संस्था ( लायसेन्स देण्याबाबत ) अधिनियम १९५६

हा भारतीय कायदा आहे. बहुतेक सर्व राज्यामध्ये या कायद्याप्रमाणे स्त्रिया व मुले यांच्या संस्थांवर नियंत्रण आणून त्यांच्यातील अनिष्ट पद्धती बंद करण्यात आल्या आहेत. स्त्रिया व मुले यांच्या संस्था काढून स्त्रिया व मुले यांचा दुरुपयोग करणाऱ्या काही संस्था श्रीमती राव कमिटीच्या निदर्शनास आल्या होत्या. अशा वाईट संस्थांचे उच्चाटन करून सर्व संस्थांच्या कामाची पातळी वाढवून देण्याचे कार्य या कायद्यान्वये होत आहे. महाराष्ट्र राज्याने हा कायदा १–४–१९५९ या दिवशी लागू केला व त्याखाली आता १०५ संस्था प्रामाणिक झाल्या आहेत.

या कायद्यामुळे भटकणारी मुले व स्त्रिया यांच्या पुनर्वसनाचा मार्ग मोकळा झाला आहे व समाज कंटकांनी चालविलेल्या संस्थांचा बीमोड झाला आहे. या कायद्यामुळे ज्यांना भीक मागावी लागते अशा स्त्रिया व मुले यांचा प्रश्न काही अंशाने सुकर झाला आहे.

## इंडियन लेपर्स ॲक्ट १८९८

१९२० पर्यंत या मूळ कायद्यात सुधारणा झालेली आहे. या कायद्याचे कलम ६ ( १ ) प्रमाणे कुष्टरोगी भिकाऱ्याला अटक करता येते. व कलम ८ प्रमाणे त्याला कुष्टरोग्यांच्या प्रमाणित संस्थेत ( लेपर असायलम ) ठेवता येते. या संस्थेच्या संचालक समितीस किंवा कोर्टास त्याला नंतर सोडण्याचा अधिकार आहे. या कायद्याप्रमाणे जरी कुष्टरोगी भिकाऱ्यांना पकडण्याचे अधिकार असले, तरी प्रत्यक्षात त्याचा फार थोडा उपयोग होतो. कुष्टरोग्यांच्या बहुतेक सर्व संस्था नेहमीच भरलेल्या असतात व तेथे एकाद्या कुष्टरोग्यास प्रवेश मिळणे हे बरेच जिकीरीचे काम असते. सध्याची स्थिती व कुष्टरोग्यांची संख्या पहाता असे वाटते कीं या कायद्यात किंवा परिस्थितीत काहीतरी सुधारणा झाली पाहिजे अशा आणखी अनेक संस्थांची जरूर आज भासत आहे.

महाराष्ट्रापुरतेच पाहिले तर असे दिसून येईल की सार्वजनिक आरोग्य खात्यातर्फे हे कार्य बऱ्याच जोराने चालू आहे. रोग्याला घरीच ठेऊन औषधोपचार घेता यावेत अशी सध्याच्या कार्याची शास्त्रीय भूमिका आहे व तशी सोय निरनिराळ्या ठिकाणी उपचार केंद्रे निर्माण करून उपलब्ध केली आहे. तसेच कुष्टरोगी बरे झाल्या-नंतर त्यांच्या पुनर्वसनाचे कार्य समाज कल्याण खात्यामार्फत करण्यात यावे असे ठरले आहे. रोगदग्ध ( Burnt out ). लोकांच्यासाठी एक योजना समाज कल्याण खात्यामार्फत राबवली जाते. रोगदग्धांच्या पुनर्वसनाचे कार्य सोपे नाही. या रोगाच्या बाबतीत निरनिराळ्या समजुती समाजात खोलवर रुजलेल्या आहेत व त्यामुळे हे कार्य अधिक गुंतागुंतीचे झाले आहे. तरीसुद्धा नोकऱ्या देऊन पुनर्वसन केलेल्या लोकांची उदाहरणे समोर असताना हे कार्य होणारच नाही असे म्हणवत नाही. हे कार्य सुकर होण्यासाठी जनमत तयार होणे जरूर आहे. जनमत बदलणे ही फार मंदगतीने होणारी गोष्ट आहे. म्हणूनच या कार्याची फळे दिसावयास खूप अवधी लागेल.

## इंडियन ल्यूनसी ॲक्ट १९१२.

या कायद्याप्रमाणे रस्त्यावर फिरून लोकांना त्रास देणाऱ्या वेड्या भिकाऱ्यांना पकडून मेंटल हॉस्पिटलमध्ये पाठवता येते. या कारणामुळे हा कायदा भिक्षाप्रतिबंधक कायद्यास पूरक असाच आहे. या कायद्याचा अधिक उपयोग व्हावा असे वाटते.

## यूरोपियन व्हेग्रन्सी ॲक्ट १८७४

हा कायदा बराच जुना आहे व त्याचा उपयोग युरोपियन भटक्यांच्या बाबतीत असल्यामुळे त्याला प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त झाले नाही.

## क्रिमिनल प्रोसिजर कोड १८९८

या कायद्याच्या १०९ कलमाप्रमाणे उदर निर्वाहाचे प्रत्यक्ष साधन नसलेल्या इसमास कोर्टापुढे आणून त्याला चांगल्या वर्तणुकीच्या शर्तीवर, जामीन घेऊन सोडून देण्यात येते. याचा उपयोग भिकाऱ्यांच्या दृष्टीने केला जात नाही. या चॅप्टर केसेस गुंड किंवा संशयित गुन्हेगाराविरुद्ध घातल्या जातात. भिकाऱ्यांना या कायद्याप्रमाणे अटक केल्यास त्यांना जामीन कोण रहाणार ? त्यांना थोडीशी कैद देता येण्याची शक्यता आहे म्हणूनच या कलमांचा उपयोग भिक्षा प्रतिबंधनासाठी होत नाही. नव्या क्रिमिनल प्रोसिजर कोड प्रमाणे भिकाऱ्याविरुद्ध कारवाई करता येत नाही असे वाटते.

## म्युनिसिपल ॲक्टस

वर नमूद केलेले सर्व कायदे व योजना या भिकाऱ्यांसाठी प्रत्यक्षपणे केलेल्या नाहीत. पण त्यात भिकाऱ्यांचाही समावेश होऊ शकेल. पण याशिवाय भारतातील बहुतेक राज्यांनी आपापल्या राज्यापुरते भिक्षाप्रतिबंधक कायदे बनविलेले आहेत. भारतातील काही शहरातील म्युनिसिपल ॲक्टसमध्ये भिकाऱ्यांचे बाबतीत तरतूद करण्यात आलेली आहे. पंजाब म्युनिसिपल ॲक्ट १९११, अजमेर व मेवारा म्युनिसिपल ॲक्ट १९१६ व मध्यप्रदेश आणि बऱ्हाड म्युनिसिपल ॲक्ट १९२२ या कायद्यान्वये भिकाऱ्यांच्या विरुद्ध कारवाई करण्याची, त्यांना दंड करण्याची, तीन महिनेपर्यंत अटकेत ठेवण्याची, किंवा रु. ५०/– पर्यंत दंड करण्याची शिक्षा ठेवलेली आढळून येते.

## पोलीस ॲक्टस्

मुंबई, मद्रास व कलकत्ता, येथील पोलीस–कायद्यामध्ये भिकाऱ्यांच्या विरुद्ध कारवाई करण्याची सोय आहे. हे कायदे वेळोवेळी सुधारण्यात आले आहेत. या कायद्यांचे स्वरूप अर्थातच मर्यादित आहे. ज्या ठिकाणी भिक्षेकऱ्यांचे स्वतंत्र कायदे करण्यात आले आहेत तेथे हे कायदे अप्रस्तुत व अनावश्यक आहेत. मुंबई व मद्रास या दोन्ही ठिकाणी आता भिक्षा प्रतिबंधक कायदे लागू झालेले आहेत. भारतामध्ये निरनिराळ्या राज्यांनी भिकाऱ्यांच्या समस्येला तोंड देण्याचे स्वतंत्र कायदे केलेले आहेत. या सर्व कायद्यांची तपशीलवार माहिती देणे जागेच्या अभावी अशक्य आहे. म्हणून या कायद्यांच्या विषयी अगदीच त्रोटक अशी नामावली खाली देत आहे. या कायद्यांची कालक्रमवार यादी अशी :

| | | | |
|---|---|---|---|
| १ | भोपाळ | १९१७ | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |
| २ | हैद्राबाद | १९४१ | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |
| ३ | प. बंगाल | १९४३ | बेंगाल व्हेग्रन्सी ॲक्ट. |
| ४ | म्हैसूर | १९४४ | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |
| ५ | त्रावणकोर | १९४५ | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |
| ६ | मद्रास | १९४५ | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |
| ७ | मुंबई | १९४५ | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |
| ८ | कोचीन | | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |
| ९ | बिहार | १९५२ | भिक्षा प्रतिबंधक कायदा. |

महाराष्ट्रामध्ये किंवा पूर्वीच्या मुंबई प्रांतात याबद्दलचा विचार १९१५ च्या सुमारास झालेला आहे हे मागील विवेचनावरून स्पष्ट झालेलेच आहे. त्यानंतर ही वैचारिक चळ-

बळ चालूच राहिली व त्यातून १९२४ साली मुंबई मुलांचा कायदा निर्माण झाला. कोणत्याही प्रजासत्ताक राज्यात कायदा हा जनमत तयार झाल्यानंतरच होत असल्यामुळे हा कायदा तयार व्हावयास १९४५ पर्यंत वेळ लागला. अर्थातच मध्यंतरीच्या काळात महायुद्ध झाल्यामुळे थोडा अधिक वेळ लागला. येवढे बाकी म्हणता येईल की मुंबई प्रांतात या प्रश्नावर १९१५ पासून जनमत तयार होत होते, पण प्रत्यक्ष भिक्षा प्रतिबंधक कायदा हा प्रौढासाठी १९४५ साली तयार झाला येवढेच नव्हेतर तो लगेच कार्यान्वितही झाला व त्यानंतर हे कार्य वाढत गेले.

या प्रश्नातील मुलांचा विशेषत: अपंग व विकृत बनविण्यात येणाऱ्या व भिक्षा मागण्याचे साधन म्हणून बाळगण्यात येणाऱ्या मुलांचा, प्रश्न विशेष महत्वाचा वाटला होता तो १९२४ च्या मुलांच्या कायद्याने हाताळण्यात आला. म्हणजेच मुलांनी भीक मागू नये किंवा समाजकंटकांनी त्यांना भीक मागावयास लावू नये हा त्यामागचा हेतू होता. तसेच गुन्हेगार मुलांना वेगळ्या प्रशासनाखाली आणण्यात आले आहे. त्यामुळे मुलाच्यासाठी मुंबई प्रांतात नवीन व्यवस्था निर्माण झाली. आरंभी ही व्यवस्था मुंबई शहरापुरतीच होती पण पुढे १९३२ च्या सुमारास प्रांतातील निरनिराळ्या जिल्ह्यांच्या मोठ्या गावीही ही योजना कार्यान्वित झाली. म्हणजेच भटक्या व भीक मागणाऱ्या मुलांचा प्रश्न १९२४ च्या कायद्यामुळे हाताळण्यात आला आहे असे म्हणता येईल.

या नंतर १९४५ साली जो भिक्षा प्रतिबंधक कायदा निर्माण झाला त्याने अधिक शास्त्रशुद्ध प्रयोग सुरू केले व कार्य सुद्धा इतर प्रांतांच्या मानाने अधिक मोठ्या प्रमाणावर सुरू केले. कलकत्ता येथे १९०३ सालीच भिकाऱ्यांच्यासाठी खाजगी संस्था निर्माण झाली होती. ही संस्था श्री. आनंद मोहन विश्वास यांनी स्थापन केली होती. मुंबईमध्येसुद्धा १८३१ साली 'बॅंबे डिस्ट्रिक्ट बेनिव्होलंट सोसायटी' स्थापन झाली होती. हे प्रयत्न फक्त दयाबुद्धीनेच प्रेरित होऊन झालेले होते.

१९४५ सालचा भिक्षा प्रतिबंधक कायदा हा भिक्षा-प्रतिबंध करण्याच्या दृष्टीने त्यावेळच्या मुंबई सरकारने टाकलेले एक महत्वाचे पाऊल होते. या कायद्याप्रमाणे मुंबई शहरात भिक्षेकरी स्वीकार केंद्र स्थापन करण्यात आले व शासकीय प्रमाणित संस्था ( Govt. certified Institutions ) प्रांतात स्थापन करून भिक्षेकऱ्यांच्या प्रश्नाबाबत कायदेशीरच नव्हे तर शास्त्रोक्त दृष्टिकोनातून भरीव कार्यास चालना दिली गेली. या जुन्या कायद्यात उणीवा आहेत असे लौकरच दिसून आले. देवळे, मशिदी किंवा चर्चे यांच्या अवारात किंवा इमारतीत भीक मागणाऱ्या भिकाऱ्यांना पकडता येईना. धार्मिक

भावना दुखावल्या जाऊ नयेत ही काळजी घेणे जरूर होते. हळू हळू या धार्मिक संस्थाच पुढे आल्या व भिकाऱ्यांचा बंदोबस्त करावा म्हणून विनंती करू लागल्या. याला कारण म्हणजे जनतेत किंवा जनमतात जागृती करण्यात सरकारला यश आले हे होय. नागरिकांचे लक्ष या विषयाकडे वळावे म्हणून उच्च पातळीवर सभा घेण्यात आल्या व वर्तमान पत्रातून या विषयावर लिखाण प्रसिद्ध झाले.

श्री. मोरारजीभाई देसाई हे मुख्यमंत्री असताना आमदार श्री. होमी तल्यारखान यांनी भिक्षा प्रतिबंधक कायदा दुरुस्त करणारे विधेयक मांडले होते. पण त्यावेळी जनमत अजून तयार झालेले नाही, या योग्य कारणासाठी मुख्यमंत्र्यांनी ते मागे घ्यावयास लावले. कायद्यात संपूर्ण सुधारणा घडवून आणण्यास पुढे बराच वेळ लागला हे खरे आहे. १९५९ साली नवा कायदा पास झाला. पण त्यावेळी या कायद्यावर जी चर्चा झाली त्यांत भिक्षा देणाऱ्याला शिक्षा करावी किंवा महारोगी भिकाऱ्यांचे निर्बीजीकरण करावे, येथपर्यंतचे विचार मांडण्यात आले. समाजाच्या विचारात झपाट्याने बदल झाला होता हे दाखविणारी ही परिस्थिती आहे.

१९४५ च्या कायद्यात प्रोबेशन ऑफिसरच्या रिपोर्टाबाबत उल्लेख नव्हता. नव्या कायद्याप्रमाणे प्रत्येक आरोपीत भिकाऱ्याच्या, सामाजिक, मानसिक, वैद्यकीय वगैरे गोष्टींचा अभ्यास करून प्रोबेशन ऑफिसरने कोर्टास रिपोर्ट द्यावा अशी सोय करण्यांत आली. या ठिकाणी या प्रश्नाच्या तळाशी असलेल्या सामाजिक व इतर कारणांचा अभ्यास शास्त्रीय दृष्टीकोनातून करण्यास कायद्याने मुभा दिली. त्याचप्रमाणे प्रोबेशन ऑफिसरचा रिपोर्ट हा गुप्त मानण्यात यावा असेही सांगण्यात आले. अर्थात जरुर तेथे आरोपीस त्याच्याबद्दलच्या रिपोर्टची माहिती देऊन त्याबाबतीत त्याला पुरावा देण्याची संधी कोर्टाकडून देण्यात येते. पुन्हा पुन्हा भीक मागण्याचा गुन्हा करणाऱ्यास १० वर्षेपर्यंत भिक्षेकरी गृहात ठेवण्याची शिक्षा देण्याचा अधिकार कोर्टास देण्यात आला आहे. या दहा वर्षांपैकी दोन वर्षांपर्यंतच्या मुदतीत निगरगट्ट भिकाऱ्यास तुरुंगातही पाठविण्याचा अधिकार कोर्टास देण्यात आलेला आहे.

१९४५ व १९५९ च्या भिक्षाप्रतिबंधक कायद्यातील मूलभूत फरक खालील प्रमाणे मांडता येतील.

१) भिकाऱ्यांच्या प्रश्नाची उकल करून प्रतिबंधन करण्यावर अधिक भर देण्यात आला आहे.

२) कुठल्याही धार्मिक पूजास्थानात भीक मागण्यास नव्या कायद्याने बंदी केली आहे. जुन्या कायद्याप्रमाणे भिकाऱ्यांना पूजास्थानांत पकडता येत नसे.

३) जुन्या कायद्याप्रमाणे प्रत्येक भिकाऱ्याच्या सामाजिक, मानसिक, भावनिक किंवा वैद्यकीय माहितीची कोर्टास जरूर नव्हती. पण नव्या कायद्याप्रमाणे ही माहिती गोळा करून प्रोबेशन ऑफिसरने कोर्टास ती जरूर त्या वेळी द्यावी असे नमूद केलेले आहे. या माहितीचा उपयोग करून कोर्टाने आपल्या समोरील भिकाऱ्याच्या परिस्थितीचा आढावा घेऊन त्यांच्या कल्याणाच्या दृष्टीने काय करावयाचे हे ठरवावयाचे असते. कोर्टाचा निकाल हा त्या भिकाऱ्याच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने केलेला एक प्रयत्नपूर्ण हुकूम असतो. या हुकूमामध्यें त्याचे पुनर्वसन किंवा त्याची काळजी ही अभिप्रेत असते. प्रोबेशन ऑफिसरचा रिपोर्ट हा गुप्त मानला जातो. परंतु कोर्टास जरूर वाटेल तेवढ्या भागाबद्दल आरोपित भिकाऱ्याला प्रश्न विचारता येतात किंवा त्याबाबतीत विरुद्ध किंवा बाजूचा पुरावा देण्याची संधी देता येते. नव्या कायद्यातील कलम ६ व ७ हे या दृष्टीने विशेष महत्त्वाचे आहेत. जुन्या कायद्याप्रमाणे भिक्षेकरी स्वीकार केंद्रातील कोणत्याच अधिकाऱ्यास कोर्टात अवाक्षरही बोलण्याचा अधिकार नसे. स्वीकार केंद्रांतील प्रत्येक भिकाऱ्याच्या बाबतीत कोणती परिस्थिती त्याला समाजातून उठण्यास कारणीभूत झाली होती याचा अभ्यास आता शक्य झाला आहे व या अभ्यासाच्या बळावरच त्या माणसाच्या पुनर्वसनाचा मार्ग आखता येतो. पूर्वी हे कार्य संस्था कसेतरी करीत असत पण नवीन कायद्याप्रमाणे प्रत्येक व्यक्तीचा अभ्यास व्यक्ती म्हणून होऊ लागला आहे, व शास्त्रीय दृष्टिकोनातून त्याच्या सुधारणेच्या मार्गाचा अवलंब करता येऊ लागला आहे. विकृती समजली म्हणजेच त्यावर उपाययोजना कोणती करावी हे मुक्रर करता येते. कायद्यातील या सुधारणेमुळे भिकाऱ्यांच्या कामात अधिक शास्त्रशुद्धता यावयास मदत झाली आहे व या शास्त्रीय माहितीचा उपयोग कोर्टास होऊ लागला आहे.

४) सराईत भिकाऱ्यांना कडक शासन करण्याची सोय निर्माण झाली आहे.

५) इतरांना भीक मागावयास लावून त्यावर आपली उपजीविका करणाऱ्यांना अधिक कडक शिक्षा देण्याची सोय नव्या कायद्यात आहे.

६) शारीरिक व मानसिक दुर्बळांना संस्थेत कायम ठेऊन घेण्याची सोय उपलब्ध झाली आहे.

७) रजेवर व शर्तीवर सोडण्याचे नियम सैल करण्यात आले आहेत.

८) कायद्याखाली काम करणाऱ्यांना जनतेचे सेवक मानण्यात आले असून त्यांना कायदेशीर संरक्षण मिळण्याची व्यवस्था नवीन कायद्यात झाली आहे.

९) कुष्ठरोगी व मनोविकृत यांच्यासाठी सोप्या पद्धतीचा अवलंब २६ व्या कलमात दर्शविलेला आहे.

कायदा कितीही चांगला बनविला तरी सुद्धा तो हाताळणारे लोक हे अधिक महत्वाचे असतात. कायद्यातील शब्दांचाच अर्थ न पहाता त्यांच्यामागील हेतूची व भावनेची कदर करणे जरूर असते. भिक्षा प्रतिबंधक कायद्याची अम्मलबजावणी करताना तीन महत्वाच्या खात्यांशी संबंध येतो. १) पोलीस, २) न्याय व ३) समाज कल्याण.

या सर्व खात्यांचे एकमेकांशी जेवढे चांगले सहकार्य असेल तेवढे भिकाऱ्यांचे कार्य उत्तम होणार आहे. या खात्यांचे सहकार्य म्हणजे अर्थात काम करणाऱ्या अधिकाऱ्यांचे प्रत्यक्षात सहकार्य, ही गोष्ट अवघड समजली जाते, कारण पोलीस व न्याय खात्यांना एवढेच काम नसते. उलट भिकाऱ्यांच्या बाबतीत असणारे अतिशय लहान असे हे काम त्यांच्याकडे दिलेले आहे. सर्व कायद्यांची अम्मलबजावणी व त्याबाबतीतील न्यायदान ही महत्वाची कामे पोलीस व न्याय खात्यासमोर अकाळविकाळ स्वरूपात उभी असतात. त्यांचा सारा वेळ या कामात जात असल्याने, सुधारणा घडवून आणणाऱ्या, सामाजिक स्थिती नाजुक हातांनी हाताळणाऱ्या या कायद्यांना प्रमाणाबाहेर धक्के बसण्याची शक्यता आहे, तरी स्वीकार केंद्राचा उत्तम प्रकाशक या सर्व अधिकाऱ्यांशी चांगले सह-कार्य ठेवून कामात जास्तीत जास्त सुरळीतपणा आणू शकतो.

भिकाऱ्यांना पकडण्याचे कार्य हे मुख्यतः सामाजिक समस्येचे निराकरण करण्याचे कार्य आहे. ते अतिशय वाईट कृत्य करणाऱ्या गुन्हेगाराला पकडण्याचे नाही. त्यांत कायद्याचे बारकावे किंवा भीक मागण्याच्या वेळची तंतोतंत स्थिती व तिच्या पंचनाम्याची फार मोठी आवश्यकता नसते. माणूस व त्याची सामाजिक स्थिती हीच मुख्यतः कोर्टापुढे येणे जरूर असते. म्हणूनच या नव्या कायद्यावर आधारलेल्या नियमामध्ये भिकाऱ्यांना पकडण्याचे अधिकार स्वीकार केंद्रातील अधिक लोकांना दिले तर हे कार्य स्वीकार केंद्रांना-सुद्धा करता येईल असे वाटते. अधिक योग्य अशाच लोकांना पकडण्याच्या दृष्टीने कदाचित याचा उपयोग होण्याची शक्यता आहे.

या नवीन कायद्यानंतर १९६४ साली या कायद्यावरील नियम प्रकाशित करण्यात आलेले आहेत. या नियमांमध्ये न्यायालय, स्वीकार केंद्र व प्रमाणित संस्था या साऱ्या संस्थांच्या कार्याचे नियम दिलेले आहेत. १९४९ सालच्या कायद्याखाली नियम तयार करण्यात आले होते ते आता रद्दबातल झाले आहेत. खालील विषयावर हे नियम केलेले आहे.

१. पकडलेल्या आरोपित भिकाऱ्यांना कसे व कोणत्या पद्धतीने ताब्यात ठेवावे. (५).

२. कलम ५ (१). प्रमाणे (समरी) संक्षिप्त पद्धतीने प्रकरणे कशी चालवावीत. (६).

३. नातलग किंवा पालकांनी द्यावयाची मासिक रकम. (७).

४. रिमांडवरील किंवा स्थानबद्ध लोकांची स्वच्छता व वैद्यकीय तपासणी (८).

५. स्थानबद्ध व कच्च्या कैदेतील लोकांना वेगळे ठेवण्याबाबत.

६. संस्थेत नवीन आलेल्या व्यक्तीस कांही दिवस इतरापासून वेगळे ठेवण्याबाबत (१०).

७. झडतीत सापडलेल्या वस्तूंबद्दल (११).

८. कच्च्या कैदेतील इसमाच्या झडतीत सापडलेल्या वस्तूंच्या विल्हेवाटीबद्दल (१२).

९. स्थानबद्द इसमाच्या झडतीत सापडलेल्या वस्तूबद्दल. (१३).

१०. संस्थेतील निवासींनी कोणती कृत्ये करू नयेत. (१५).

११. त्यांनी कोणत्या वस्तू बाळगू नयेत. (१६).

१२. कल्याणनिधीबद्दलची माहिती. (१७).

१३. अभ्यागत समितीच्या कार्याची माहिती. (२०).

१४. मुख्य निरीक्षक यांनी निवासीच्या प्रमाणित संस्थांतून बदल्या करताना विचारात घ्यावयाच्या गोष्टी. (२१).

१५. शर्तीवर मुक्तता. (२५).

१६. स्वीकार केंद्र व प्रमाणित संस्थातील दिनचर्या. (२६).

१७. मुकादम पद्धत. (२७).

१८. पळून गेलेल्या किंवा निधन पावलेल्या व्यक्तींच्या मौलवान वस्तूंची विल्हेवाट (२८).

१९. निवासीना करावयाच्या शिक्षा.

वरील महत्वाच्या विषयावर नियम करण्यात आलेले आहेत. प्रत्येक विषयाच्या अखेरीस नियम नंबर दिलेला आहे.

# प्रकरण तिसरे

## भिकाऱ्यांची धरपकड

### भिकारी कोणाला म्हणावे

खरे पाहिले तर भिकारी कोणाला म्हणावे हा प्रश्न सोपा आहे. दररोज खूप भिकारी दिसतात. लोकांनी भीक द्यावी म्हणून नाना प्रकारांनी त्यांचे प्रयत्न चालू असतात. कोणी भीक देतात किंवा कोणी 'माफ करना' म्हणून नमस्कार करतात. पण हे सारे झाले सर्वसामान्य माणसाच्या माहितीकरिता. भीक मागणे हा गुन्हा मानला गेल्या-नंतर भीक मागणे म्हणजे काय हे कायद्याच्या भाषेत ठरवावे लागले आहे.

आपल्या भारतात कांही जमाती किंवा पंथ भीक मागण्यावर जगणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. काही लोक करमणुकीचे कार्यक्रम करतात, तर काही लोक भरमसाट भविष्य सांगतात, काही लोक आपले शरीर वाकडेतिकडे करून किंवा त्यांत व्यंग निर्माण करून दया किंवा किळस निर्माण होईल असे करतात. तान्हे मूल, लहान कोवळी मुले किंवा जनावरे यांच्याही उपयोगाने पहाणाऱ्यांच्या भावना उद्दीपित करून त्यांच्या खिशातील पैशाचा कांही भाग आपल्याकडे यावा यासाठी या लोकांचे सारखे नाटक चालू असते.

भीक हमरस्त्यावर मागितली जाते असे नाही. काही माणसे देवळात जाऊन सुद्धा भीक मागतात. म्हणून अशा भिकाऱ्यांना देवळात जाऊन पकडण्याची सोयही या काय-द्यात केली आहे.

काहीं भिकारी फारच हुशार असतात. ते तोंडाने कांही मागत नाहीत. देवळात किंवा देवळासमोर शांतपणाने बसलेले असतात. भाविक लोकांनी दिलेले पैसे ते घेतात. पण याही भिकाऱ्यांना कायद्याप्रमाणे पकडता येते.

स्वतः भीक मागणे हे जसे गुन्हा म्हणून मानले आहे. तसेच इतरांना भीक मागायला लावणे किंवा भाग पाडणे हेसुद्धा भीक मागण्याइतकेच किंवा त्याहून गंभीर स्वरूपाचे गुन्हे आहेत.

गाणी गाऊन, नाचून किंवा भविष्य सांगून पैसे मागणारी माणसे भिकारी म्हणूनच गणली जातात. काही लोक अगदीच किरकोळ वस्तू विकल्याचे दाखवत असले तरी प्रत्यक्षात ते भीकच मागत असतात. अशा छुप्या भिकाऱ्यांना सुद्धा भिकारी म्हणून मानले जाते.

कायदेशीरपणे पैसे मागणे, पैसे घेणे किंवा अन्न घेणे हे गुन्हे नाहीत. मुंबई व पुणे येथील पोलीस कमिशनर अशी परवानगी देऊ शकतात. तशी तरतूद कायद्यात केली आहे.

## भिकाऱ्यांना पकडण्याचा अधिकार

पोलीस स्टेशनचा अधिकारी किंवा पोलीस सेक्शनचा अधिकारी यांना भिक्षा प्रतिबंधक कायद्याच्या कलम ४ प्रमाणे भिक्षा मागणाऱ्यांना वॉरंटशिवाय अटक करता येते. त्याच प्रमाणे प्रमाणित संस्था किंवा आदान केंद्र प्रमुख हेही अशी अटक करू शकतात.

या कायद्याप्रमाणे भिकाऱ्यांना अटक करण्याचे काम मुंबईत एका खास पथकाकडे किंवा पोलिसांच्या तुकडीकडे दिलेले आहे. तेथील तुकडीचा प्रमुख हा सबइन्स्पेक्टर असतो. पुण्यात या कामा करिता नेमलेल्या पोलीस तुकडीचा मुख्य पोलीस जमादार असतो. (या पोलिसांच्या पथकात स्त्री पोलिसही असतात पण त्यात स्त्री पोलीस असावेत असे कायद्यात दिलेले नाही.)

भिक्षेकरी गृहाच्या प्रमुखास कायद्याप्रमाणे जो अधिकार आहे त्याचा प्रत्यक्ष उपयोग किती हे सांगता येणार नाही. पण या अधिकाऱ्यांना त्या अधिकारामुळे अत्यंत गरजू किंवा माहितीच्या भिकाऱ्याला अटक करता येईल. अर्थात पुढे त्यांना पोलिसांची मदत घ्यावी तरी लागेल किंवा कायद्याप्रमाणे कोर्टाला रिपोर्ट देणे, भिकाऱ्याला कोर्टासमोर स्वतः हजर करणे, वगैरे गोष्टी कराव्या लागतील. या कायद्याच्या व्यापामुळे या कामात कोणी फारसा हात घालीत नसावेत.

**चुकीची अटक** – पोलीस कित्येकदा चुकीच्या माणसाला पकडतात म्हणून स्वीकार केंद्राच्या प्रमुखाने किंवा इतर प्रोबेशन ऑफिसरांनी या कामात पोलिसांशी सहकार्य करावे किंवा त्यांचे सहकार्य मिळवावे असे सांगण्यात येते. असे प्रयोग झालेले आहेत पण त्यातून काय निष्पन्न झाले आहे हे सांगणे अवघड आहे. कारण या बाबतीत कोणी संशोधन केल्याचे दिसत नाही.

मुळात पोलीस चुकीच्या लोकांना पकडतात काय हा विवाद्य प्रश्न आहे. भिकाऱ्यासारखी

दिसणारी सर्वच माणसे भीक मागतात किंवा बऱ्यापैकी कपडे घातलेले लोक भीक मागत नाहीत या दोन्ही कल्पना चुकीच्या आहेत.

एखादा गुन्हेगार स्वतःवरील आरोपातील कायदेशीर पळवाट माहीत असल्यास किंवा त्याबाबत योग्य माणसाचा सल्ला किंवा मदत मिळाल्यास निर्दोष सुटतो. अशा वेळी गुन्हेगार नाही हे कायदेशीर उत्तर आहे. पण भिक्षा प्रतिबंधन करणारा हा सामाजिक कायदा आहे म्हणून आपण या प्रश्नाच्या मुळाशी जाऊन विचार केला पाहिजे. निर्दोष सुटणारा तत्वतः भिकारी नसेल पण तो खरोखरीच भिकारी असण्याची शक्यता आहे.

शिवाय निर्दोष सुटणाऱ्या भिकाऱ्यांचे प्रमाण तरी किती आहे ? पोलिसांनी भिकारी म्हणून पकडून आणले व पोलीस निघून गेले की सर्वच भिकारी आपण भीक मागत नव्हतो असे सांगतात पण हळूहळू अधिक माहिती झाली की खरी गोष्ट बाहेर येते.

**श्रीमंत भिकारी** – लोक भीक कसे मागतात हे दाखविणारी एक गमतीची सत्यकथा सांगण्याचा मोह आवरता येत नाही.

मी एकदा मिरजेच्या स्टेशनावर कोल्हापूरकडे जाणाऱ्या गाडीत बसलो होतो. मी खिडकी जवळ बसलो होतो. एवढ्यांत एक वृद्ध गृहस्थ सावकाश चालत माझ्या खिडकी जवळ आले. डोक्यावर काळी टोपी, पांढरा जुना शर्ट, तसेच जुने पण स्वच्छ धोतर, पायात चप्पल, पिकलेले केस, दाढी केलेली तरतरीत गोरा चेहेरा, पण वृद्धापकाळामुळे चेहऱ्यावर बऱ्याच सुरकत्या पडलेल्या असा हा गृहस्थ होता. त्याला पाहिल्याबरोबर तो चांगल्या कुटुंबातला असावा व त्याचे पूर्वायुष्य सुखात गेलेले असावे असे दिसत होते. खिडकी जवळ येऊन तो वृद्ध गृहस्थ मला म्हणाला, "मला जरा मदत कराल का ? मी रात्री बेळगावहून आलो. पुण्याला जायचंय मला. माझं सर्व सामान व तिकिटसुद्धा चोरीला गेलं आहे. मला पुण्याचं तिकिट काढायचंय."

कां कुणास ठाऊक पण मला त्याचा संशय आला. मी त्याला काही दिले नाही. कष्टी चेहरा करुन तो गृहस्थ पुढे गेला. एवढ्यात वर्तमानपत्र विकणारा पोऱ्या चालला होता. त्याला मी हाक मारली. वर्तमानपत्र घेतले. वर्तमानपत्र वाल्याने मला विचारले, "साहेब आपण काही दिलंत कां म्हाताऱ्याला ?" मी एकदम म्हणालो, 'नाही बुवा !' वर्तमान-पत्रवाला पोऱ्या म्हणाला, 'बरं झालं. लबाड आहे म्हातारा. त्याचा मुलगा चांगला व्यापारी आहे गावात. घरात सुखानं रहावत नाही. काही कमी नाही त्याला.' चांगल्या कुटुंबातला गृहस्थ भीक मागत होता व ते सुद्धा लोकांच्या डोळ्यात धूळ फेकून.

**आणखी एक सत्यकथा** – एका गृहस्थाला भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणे अटक झाली. अटक करताना पोलिसांनी त्या गृहस्थाजवळ असलेले पूजेचे साहित्य देखील जप्त केले होते. कोर्टात केस चालली तेव्हा आरोपीच्या वकिलांनी माहिती दिली की सदरहू गृहस्थ ४–५ दुकानांचे मालक आहेत. पण नंतर प्रश्नोत्तरात दिसून आले कीं हा गृहस्थ श्रीमंत जरूर होता पण निरनिराळ्या दुकानात पूजा करून पैसे गोळा करण्याचा त्याला हव्यास होता.

फार क्वचित प्रसंगी भिकाऱ्यांच्या ऐवजी चांगली माणसे पकडली जातात. भिकारी कोणत्या ना कोणत्या प्रकाराने भीक मागत असतात किंवा त्यांना जगण्याला इतरांच्या दातृत्वा शिवाय दुसरे साधन नसते. काही लोक नुकतेच भीक मागण्याच्या परिस्थितीला पोहोचलेले असतात. त्यामुळे ते भिकारी आहेत किंवा नाहीत हे एकदम ओळखणे अवघड जाते.

**भिकाऱ्यांचे संघटित गट** – माणूस हा संघप्रिय आहे. व भिकारीसुद्धा त्याला अपवाद नाहीत. कित्येकदा भिकाऱ्यांचे गट फिरताना आढळतात त्यावरून अशी समजूत होण्याची शक्यता आहे की खूप भिकारी गटाने रहात असतील. शहरातील भीक मागणाऱ्या जमाती सोडल्या तर बाकीच्या भिकाऱ्यात मुख्यतः तीन प्रकारचे गट आढळून येतात. १] कुष्टरोगी भिकारी २] अंध भिकारी ३] भिकारी कुटुंबे. यातील प्रत्येक प्रकाराबद्दल थोडा विचार करू.

## १) कुष्टरोगी भिकारी

महारोग किंवा कुष्टरोग हा एकच असा भयंकर वाटणारा रोग आहे की जगातल्या सर्व समाजांनी हजारो वर्षांपासून तो झालेल्यांना वाळीत टाकले होते. पण या लोकांनाही जगण्याची तीव्र इच्छा असल्यामुळे ते आपला समदुःखितांचा असा समाज निर्माण करून रहात आले आहेत. हा रोग असलेल्यांच्या लैंगिक जीवनावर काहीच परिणाम होत नाही पण त्यांना सामाजिक जीवनात भाग घेता येत नाही. त्यामुळे असे स्त्री पुरुष फार लौकर जवळ येतात. इतकेच नव्हे तर त्यांच्या संघटना फार प्रभावी होतात. [ इंग्रजी-मध्ये या प्रकाराला Fellowship of the sufferers असे म्हटले जाते. ] यांच्या छोट्या किंवा मोठ्या वसाहती सुद्धा निर्माण झालेल्या आहेत. अलीकडे महाराष्ट्रांत दारूबंदी व रेशनिंग या दोन नियंत्रणाचा फायदा घेऊन अशा संघटना पैसा मिळवण्याचे उद्योग करीत असल्याचे आढळून आले आहे. कांही कुष्टरोगी भिकारी मात्र एका ठिकाणी वस्ती करून रहात नाहीत.

## २) अंध भिकारी —

अंध भिकाऱ्यांचे गट असतात, पण हे गट कुष्ठरोगी भिकाऱ्यांएवढे मोठे नसतात इतकेच नव्हे तर त्यांच्यातील सहजीवनाचा दुवा सुद्धा फार चिवट नसतो. आंधळ्याला मदतनीस म्हणून डोळस लागतो. पुरुषाला स्त्री व स्त्रीला पुरुष असे लहान लहान गट असतात. पुष्कळवेळा समलिंगी अंधांचे छोटे गट आढळतात.

सध्या अंधांना मदत करण्याचे, शिक्षण देण्याचे पद्धतशीर प्रयत्न होऊ लागल्यामुळे हा प्रश्न लौकरच आटोक्यात येईल असे वाटते.

## ३) भिकारी कुटुंबे —

अपंगांची परस्परांशी सहकारिता इतर प्रकारच्या भिकाऱ्यातही आढळते, पण त्याला लैंगिक बैठक असल्याशिवाय गट निर्माण होत नाहीत. भिकारी आपली मिळकत किंवा आपल्या मिळकतीचे क्षेत्रसुद्धा दुसऱ्याला द्यायला तयार नसतो. अर्थात लग्न झालेल्या किंवा केवळ एकत्र राहिलेल्या स्त्री–पुरुषांची कुटुंबे व मुलेबाळे बरीच आढळतात. असे सर्व गट मुलांच्या भवितव्याच्या दृष्टीने फार धोकादायक आहेत.

### प्रत्यक्ष धरपकड

भिकाऱ्यांना पकडण्यासाठी जाळी असलेली पोलिसांची गाडी असते. पोलीस पथकाचा प्रमुख ड्रायव्हर शेजारी बसतो आणि रस्त्यातले भिकारी पाहून आपल्या मागे बसलेल्या शिपायांना त्यांना पकडण्याचा हुकुम देतो.

कोणत्याही शहरात भिक्षाप्रतिबंधक कायदा लागू होण्यापूर्वी तेथील वार्ताहरांना त्याची बातमी मिळते. त्यामुळे एक महिना अगोदरच त्या गावातले भिकारी सावध होतात व ज्यावेळी हा कायदा जारी होतो त्यावेळी रस्त्यावर वेडे, खुळे, पांगळे कमी समजुतीचे व तेथील बोली न जाणणारे किंवा ज्यांना ही बातमी समजलेलीच नाही असे थोडेसे भिकारी आढळतात.

शहरातून नाहिसे झालेले भिकारी जवळपासच असतात. त्यातले काही पोलिसांची गाडी कोणत्या दिवशी धरपकड करण्यास बाहेर पडते किंवा त्यांचा रोख कोणत्या दिशेला आहे याचे बारकाईने निरीक्षण करीत असतात. इतकेच नव्हे तर आपणाला भीक मागता यावी यासाठी सर्व भले बुरे प्रयत्न करण्यास मागे पुढे पहात नाहीत. कोणी आपल्या आजाराचे भय वाटावे म्हणून प्रयत्न करतात, कोणी दयेची याचना करतात. पण

कायदा लागू झाला की एक तऱ्हेची दहशत किंवा धाक भिकाऱ्यात निर्माण होतो. अर्थात त्यामानाने कमी समजुतीचे किंवा बुद्धीचे बरेचसे भिकारी पोलिसांच्या जाळ्यात तावडतोब सापडतात.

भिकाऱ्यांना पकडताना पोलिसांना काही वेळेस कठीण परिस्थितीस तोंड द्यावे लागते. चार पाच भिकारी एकत्र असतील तर त्यांना पकडणे अवघड होते. भिकारी सुद्धा पोलिसांच्यावर तुटून पडतात. लाथा–बुक्या मारतात. एवढेच नव्हे तर चावतात देखील. स्त्रिया आरडा–ओरडा करतात, रडतात, लहान पोरांना पटापट आपटतात व त्यांना पोलिसांनी टाकले म्हणून कांगावा करतात.

चोरी करून चोर पळाला तर रस्त्यावरचे कांही लोकतरी मदतीला धावतात व चोरास पकडतात. पण भिकाऱ्यांना पकडणाऱ्या पोलिसांना कोणीही मदत करीत नाहीत. उलट पोलिसांना कोणीतरी दयाळू अंतःकरणाचा माणूस येऊन सांगतो, 'जाऊ द्या बिचाऱ्याला'. पोलीसाशी झटापटीत कुठेतरी खरचटलं की पोलिसांनी मारलं म्हणून ओरडा करणे सोपे होते.

कुष्ठरोग झालेले भिकारी तर अधिकच त्रासदायक असतात. पोलीसही सर्व सामान्य नागरिकाप्रमाणेच असल्यामुळे या रोग्यांना हात लावायला भितात. त्याचाच फायदा घेऊन हे लोक भीक मागत असतात. येणाजाणाऱ्यांच्या तोंडाजवळ आपले थोटे हात आणून जबरदस्तीने भीक मागतात व एखाद्या अगदीच खाष्ट माणसाने भीक घातली नाही तर त्याला अचकटविचकट शिव्या देतात. अशा भिकाऱ्यांना पकडणे फार अवघड असते. या कार्यासाठी महारोगातून बरे झालेल्यांना स्वीकार केंद्रांत गार्डच्या नोकरीवर घेतले जाते व या लोकांच्या मदतीने कुष्ठरोगी भिकाऱ्यांना पकडावे लागते.

बहुतेक सर्व भिकारी हे अत्यंत घाणेरडे, अस्वच्छ व कोणत्यातरी शारीरिक किंवा मानसिक रोगाने पछाडलेले असतात या दुर्गंधीयुक्त किंवा रोगाने सडलेल्या लोकांना झटापट करून पकडणे हे सुद्धा एक दिव्यच आहे. पोलिसांच्या पथकाला नियमितपणे काम करताना झालेल्या किरकोळ जखमांवर औषधोपचार करण्याची पाळी स्वीकार केंद्रातील वैद्यक विभागावर पुष्कळ वेळा येते.

**वॉरंट** – पकडलेल्या सर्व आरोपित भिकाऱ्यांना तात्काळ कोर्टापुढे उभे करून त्यांच्या करिता कच्या कैदेचा न्यायालयाचा हुकूम [ Remand Warrant ] घ्यावा लागतो. या हुकमा शिवाय स्वीकार केंद्रात सर्वसाधारण परिस्थितीत कोणासहि घेता येत

नाही. भारतीय घटनेप्रमाणे व इंडियन पीनल कोड प्रमाणे तो गुन्हा आहे. पोलिसाप्रमाणेच स्वीकार केंद्रातील अधीक्षकासही न्यायालयाच्या हुकमा शिवाय भिकाऱ्यास पकडण्याचा अधिकार असल्यामुळे तो एकाद्या भिकाऱ्याला २४ तास पर्यंत स्वीकार केंद्रात न्यायालयाच्या हुकुमाशिवाय ठेवू शकतो. अर्थात २४ तासांत या आरोपींना कोर्टासमोर उभे करणे हे अत्यंत जरूरीचे आहे.

म.रा.ना.सं.मं. ग्रंथालय
मंत्रालय.

# प्रकरण चौथे

## त्यांच्या जवळ काय असते.

भिक्षा प्रतिबंधक कायद्याच्या कलम १८ प्रमाणे भिक्षेकऱ्यांच्या स्वीकार केंद्रात ( Receiving Centre ) दाखल झालेल्या प्रत्येक आश्रिताची (Inmate) झडती घ्यावी लागते, त्याच प्रमाणे वैद्यकीय तपासणीही करावी लागते. अशा तऱ्हेने झडती घेणे किंवा तपासणे या गोष्टींचा हुकूम सुपरिंटेंडंट देतात व तो प्रत्येक आश्रिताने पाळला पाहिजे. नवीन नियमावलीतील नियम ११, १२ व १३ हे या संदर्भात देण्यात आलेले आहेत.

कायदा व नियम करणाऱ्यांच्या दूरदर्शीपणाचे खरोखरीच कौतुक करावेसे वाटते. भिकाऱ्यांना जबरदस्तीने पकडल्यावर त्यांची झडती घेणे किती जरूर आहे व त्यांची वैद्यकीय तपासणी करणे किती जरूर असते याचा अंदाज कायदा करणाऱ्यांनी बरोबर केला होता.

कोणत्याच भिकाऱ्याला अटक केलेली व झडती घेतलेली आवडत नाही. भिकाऱ्यालाच काय पण बुद्धी असलेल्या व थोडासा तरी स्वाभिमान असलेल्या कोणत्याच माणसालाही ही गोष्ट आवडणार नाही. भीक मागितली म्हणून काय झाले ? देवानेही भीक मागितली आहे, मग भीक मागण्यात गुन्हा काय ? असे मूलभूत प्रश्न भिकारी विचारतात. निर्बुद्ध, अत्यंत अशक्त व परत पकडून आणलेल्या भिकाऱ्यांची झडती अधिक सुलभतेने घेता येते. कारण दुसऱ्यांदा पकडलेल्या भिकाऱ्याला त्याच्या पैशाच्या किंवा मौल्यवान वस्तूच्या सुरक्षिततेबद्दल एक तऱ्हेचा विश्वास वाटत असतो.

आपल्या फाटलेल्या व मळकट कपड्यांवर सुद्धा त्यांचे प्रेम असते. तसेच पाहिले तर पुष्कळांच्या जवळ अशा कपड्याशिवाय दुसरे काही सुद्धा नसते. पण भिकाऱ्यांची ही मानसिक स्थिती जाणण्याची बुद्धी जर स्वीकार केंद्रात काम करणाऱ्या, रखवालदारीचे काम करणाऱ्या, किंवा पुष्कळ वेळा वरच्या लोकांनाही नसेल तर त्यांची झडती घेताना, त्याला स्वच्छ करताना, किंवा नंतर त्याची वैद्यकीय तपासणी करताना विरोधाला तोंड द्यावे लागेल.

## लपवून ठेवलेले धन

वर्तमान पत्रातून काही वेळा वाचनात येते की अमुक क्षेत्राच्या ठिकाणी एक भिकारी मरण पावला. त्याचा पंचनामा करताना पोलिसांना शेकडो किंवा हजारो रुपये मिळाले.

भारतात दारिद्र्य चौफेर पसरले आहे. खेडेगावातून पाहिले तर गरीब शेतकऱ्याला किंवा शेतमजूराला दिवसाकाठी एक वेळही चांगले व भरपूर जेवण मिळू शकत नाही. असे पुष्कळ ठिकाणी दिसून येते. डोंगर कपारीत राहाणाऱ्या वन्य जमातीची तर त्यापेक्षाही वाईट स्थिती असते. ३ ते ४ महिने अन्न ही वस्तू कांही भागात पहावयासही मिळत नाही. अशा वेळी हे लोक जंगलात जाऊन कडू कंद नावाची बटाट्यासारखी दिसणारी मुळे काढून आणतात. उकडून त्यांचे तुकडे करतात. नंतर नदीच्या वाहात्या पाण्यात १२ ते २० तास ठेवल्यावर त्या मुळामधील कडूपणा कमी होतो. मग हे बटाट्यासारखे दिसणारे तुकडे तिखट मिठाशिवाय सर्वांनी मिळून खायचे. ते सुद्धा दिवसातून एकदाच.

अशी पार्श्वभूमी असलेल्या माणसाला किंवा दारिद्र्यात सारा जन्म गेलेल्या माणसाला पैसा जमवून ठेवण्याचा वेडा चाळा जडल्यास काय नवल! भीक म्हणून मिळालेल्या पैशातून अगदी पोट जाळण्यापुरतेच पैसे खर्च करून बाकीचे पैसे हळूच अंधारात कोटाच्या अस्तराच्या आतल्या बाजूस शिवून टाकले जातात. भिकाऱ्यांची सुद्धा चोरी करणारे चोर असतात. म्हणूनच अत्यंत फाटलेल्या व ओंगळ कपड्यात पैश्यांचा साठा झालेला क्वचितच आढळतो. पण असे पैसे जपून ठेवणाऱ्या लोकांचे प्रमाण फार कमी आहे. शंभरात एकादाच असा माणूस सापडतो. बहुतेक लोकांच्या जवळ २–३ रुपयापेक्षा अधिक पैसे नसतात.

जवळ पैसे किती आहेत हे चटकन कोणीच सांगत नाही. थोडीशी जबरदस्तीच करावी लागते. टोपी, बूट, अंगावरचे सर्व कपडे विशेषतः या कपड्यांच्या शिवणीच्या व नेफ्याच्या जागा याच्यातून पैसे व नोटा असण्याची शक्यता असते. या झडतीत त्यांच्या अंगावर सापडलेले पैसे व मौल्यवान वस्तू यांची नोंद रजिस्टरवर करावी लागते. हे काम अतिशय काळजीपूर्वक करावे लागते. ह्यासाठी एक स्पेशल रजिस्टर असते. भिकाऱ्याजवळ सापडलेले पैसे व मौल्यवान वस्तू नोंदून त्यावर त्याची सही घेतली जाते. ज्यावेळी त्याला सोडून देण्यात येते किंवा त्याला दुसरीकडे बदलण्यात येते तेव्हा त्याचे पैसे व मौल्यवान वस्तू त्याला परत दिल्या जातात किंवा त्याच्या बदली करण्याच्या पत्रांत नोंद करून त्या दुसऱ्या संस्थेत पाठवल्या जातात. भिक्षा प्रतिबंधक कायद्यावरील १९६४ च्या नियम नं. १२ मध्यें याबद्दल उल्लेख आहे.

काही वेळेस या आरोपीजवळ सापडलेला माल खराब होण्याची शक्यता असल्यास त्या मालाचा लिलाव करून आलेले पैसे त्याच्या नावापुढे लिहून त्यावर सुपरिंटेंडटची सही घ्यावी लागते.

या आरोपींचे फाटलेले, न वापरता येण्यासारखे किंवा रोगामुळे दूषित झालेले कपडे जाळण्यात येतात. बाकीच्या कपड्यावर त्याचे नाव व रजिस्टर नंबर घालून एक गाठोडे करून ठेवले जाते.

कोर्टाला जाताना, सुटून जाताना किंवा बदली होऊन जाताना याच कपड्यांचा उपयोग करावा लागतो. कपडेच नसल्यास किंवा जुने कपडे जाळण्यात आलेले असल्यास संस्थेतून सुटून जाताना त्याला, संस्थेतील एक गणवेष देण्यात येतो.

## संस्थेचा गणवेष

स्वच्छ बनण्यास किंवा संस्थेचा गणवेष घालण्यास काही इसम तयार नसतात. संस्थेचा गणवेष म्हणजे निळी चड्डी, पांढरा शर्ट व पांढरी टोपी. पुष्कळ लोकांना हा गणवेष आवडत नाही, तर काही लोकांना कपडेच घालायला नको असतात. विशेषतः साधू लोकांना कपडे घालायला नको असतात. धार्मिक भावना, अनेक वर्षांचा सराव, दुसऱ्या पद्धतीचे कपडे वापरण्याचा संवयीचा अभाव अशा अनेक कारणामुळे गणवेष घालण्यास काही इसम तयार नसतात, पण बहुतेक वेळेस गोड शब्दांनी सर्व काम सुरळीत होते.

## स्वच्छता

पकडलेल्या भिकारी आरोपीपैकी सुमारे ९९ टके आरोपी घाणेरड्या कपड्यातले व शरीर पूर्णपणे मळाने व घाणीने भरलेले असे असतात. अनेक दिवस, कदाचित काही महिने व कित्येकदा वर्षे सुद्धा त्याच्या शरिराला किंवा कपड्यांना पाण्याचा स्पर्श झालेला नसतो. हे अस्वच्छ शरीर एकदा घासून पुसून आंघोळ घालून सुद्धा स्वच्छ होत नाही. ३–४ दिवस सातत्याने हे काम करावे लागते. त्या नंतरच अंगावरील मळाची पुटे जातात.

भिकारी स्वच्छ रहात नाहीत याला अनेक कारणे असण्याची शक्यता आहे.

१] स्वच्छ राहण्यासाठी दुसऱ्या कपड्यांची जरूरी.

२] स्वच्छ राहण्यासाठी पाण्याची व साबणाची जरूरी.

३] घाण, फाटके कपडे यामुळे भीक अधिक मिळण्याची शक्यता.

४] जीवन कमीत कमी प्रयत्नानी व्यतीत करण्याची किंवा आळशीपणाच्या जीव-नाची आवड किंवा संवय.

५] मानसिक व्यथेमुळे स्वच्छ रहाण्याची शुद्धच नसणे.

त्यातल्यात्यात स्वच्छता बाळगणारे भिकारी साधूच्या, फकिराच्या किंवा विठ्ठल-भक्ताच्या वेषांत असतात. या प्रकारचे भिकारी मात्र स्वच्छ असतात. गळयात माळा, भस्माचे पट्टे, अशा ठळक गोष्टींनी त्यांचे वर्णन करता येईल. गोरक्षक या प्रकारातील भिकारी त्या मानाने स्वच्छ असतात, व याची कारणेही सहाजिकच आहेत. या प्रकारातील स्त्री–पुरुष कुटुंबात रहात असून भिक्षा मागून त्यावर संपूर्ण किंवा अर्धवट उदरनिर्वाह करतात. कुटुंबात रहात असल्यामुळे, घर म्हणून त्यांचे एखादे झोपडे तरी असते. हे लोक एकाच गावांत स्थायिक झालेले असतात. इतर भिकाऱ्यांच्या मानाने ते पुष्कळच स्वच्छ असतात. त्यांच्या बाबतीत स्वच्छता हा गौण प्रश्न असतो.

## स्त्री भिकारी

वरील वर्णनावरून असे वाटेल की हे वर्णन फक्त पुरुषांबद्दलच आहे. पण भिकाऱ्यात स्त्रिया व पुरुष असे दोन्हीही असतात. त्यातल्या सर्व साधारणपणे १/३ स्त्रिया असतात. झडती घेण्याकरिता स्त्री कार्यकर्त्या असतात. त्याचप्रमाणे वैद्यकीय तपासणी करण्याकरिता शक्यतो स्त्री वैद्याची नेमणूक केलेली असते. भिकाऱ्यांना अटक करताना ज्या अडचणी येतात त्या स्त्रियांच्या बाबतीतही खऱ्या आहेत. अंग स्वच्छ करण्याची पाळी स्त्रियांच्या बाबतीतही येते. स्त्रियासुद्धां अत्यंत घाणेरड्या, आजाराने जर्जर झालेल्या, फाटक्या विटक्या व दुर्गंधी युक्त कपड्यात रहाणाऱ्या असतात. स्त्रीयाही कुष्ठरोगी, म्हाताऱ्या किंवा वेड्या असतात. लुगड्याच्या चिंध्या झालेल्या भागात किंवा एखाद्या गोधडीत धन लपवलेल्या स्त्रिया क्वचित प्रसंगी सापडतात. स्वच्छ करताना, झडती घेताना, पैशाचा हिशेब देताना, गणवेष घालण्याच्या किंवा वैद्यकीय तपासणीच्या वेळी स्त्रियाही खूप त्रास देतात.

## वैद्यकीय तपासणी

वैद्यकीय तपासणी ही आत्यंतिक जरूरीची असते. अनेक महिने किंवा वर्षे घर सोडून राहिलेल्या या जीवांना निवाऱ्याची जागासुद्धा नसते. यामुळे त्यांना फूटपाथ, रेल्वे स्टेशनातील निवाऱ्याच्या जागा, रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाची वेटिंग रूम किंवा छोट्या मोठ्या घरांचा निवारा किंवा स्वच्छ रस्त्याच्या कडेला उन्हापावसात, थंडीत रहावे लागते. तसेच घाणीतले, कुजलेले, टाकून दिलेले दूषित अन्न खावे लागते. अयोग्य स्त्रीपुरुषाशी

संबंध येतो. किंवा अखेरीस वृद्धत्वामुळे अशक्तपणा येऊन निरनिराळे आजार या भिकाऱ्यांच्या शरीरात घरे निर्माण करतात. क्षय, महारोग, गुप्तरोग, रक्तक्षय, खरूज, नायटे, इसब, जुन्या जखमांचे झालेले व्रण, बेंडे, अतिसार अशा लहानमोठ्या आजारांची नोंद घेऊन ताबडतोब औषधोपचाराची सोय करावी लागते.

भिकाऱ्यांच्या आदान केंद्रात किंवा गृहात वैद्यकीय विभागास फार महत्व आहे. आजार व विकृती हा भिक्षेकऱ्यांच्या प्रश्नाचा फार मोठा भाग आहे. म्हणूनच प्रत्येक आदान केंद्रामध्ये भिक्षेकऱ्यांच्या गृहामध्ये पूर्णवेळ डॉक्टर तसेच औषधे देण्या करिता कंपौंडर व परिचारिका यांची योजना करण्यात आली आहे. प्रत्येक संस्थेमध्ये थोड्या प्रमाणात रोगी सांभाळण्याची सोयही केलेली असते.

कांही भिकाऱ्यांचे रोग संसर्गजन्य असल्यामुळे संस्थेमध्यें विशेष काळजी घ्यावी लागते. क्षयरोग व महारोग असलेल्या लोकांची वेगळी सोय करणे जरूर असते. तसेच एकंदर संस्थेत फिनाईल वगैरे जंतूनाशक औषधे नेहमीच वापरून संस्था शक्य तितकी स्वच्छ ठेवावी लागते.

# प्रकरण पांचवे

## वैद्यकीय परिक्षा

भिक्षाप्रतिबंधक नियम १९६४ च्या कलम ८ प्रमाणे आदान केंद्रात येणाऱ्या-किंवा प्रमाणित संस्थेत असलेल्या प्रत्येक इसमाने वैद्यकीय तपासणी व वैद्यकीय उपचार करून घेतलेच पाहिजेत. शारीरिक स्वच्छतेप्रमाणेच ही तपासणीही अतिशय महत्वाची असते.

**पार्श्वभूमी** — आपल्याकडे भीक मागणारे व ज्यांच्यापासून रस्त्यावरून येणाऱ्या जाणाऱ्यांना विशेष त्रास होतो असे भिकारी हे पिढीजाद किंवा धार्मिक कमी असतात. रस्त्यावर फिरून कोणाकडेही भीक मागणारे फिरस्ते भिकारी असतात, किंवा बाहेरून आलेले पण गावात कोठे तरी आश्रयास राहिलेले भिकारी असतात. पकडल्या जाणाऱ्यात अधिक प्रमाण दुसऱ्या प्रकारच्या भिकाऱ्यांचे असते. अर्थात याला तशी कारणेही आहेत. पण ती येथे देणे अप्रस्तुत आहे. परिस्थिती मात्र अशी आहे कीं फिरस्ते भिकारीच अधिक पकडण्यात येतात तेव्हा सध्या आपण त्यांच्या पार्श्वभूमीचा विचार करू.

फिरस्ते भिकारी ह्या प्रकारात म्हातारे, अपंग, मानसिक दृष्टीने विकृत, मतिमंद, आजाराला कंटाळलेले, कुटुंबात कोणत्यातरी कारणामुळे सुखाने न राहू शकणारे असेच लोक मुख्यत्वे करून असतात. या प्रकारच्या लोकांबद्दल विचार करू लागल्याबरोबर समजून येईल की, हा माणूस कोठेतरी, स्टेशन, धर्मशाळा, दुकाने वगैरे इमारतीच्या आडोशाला किंवा अगदीच उघड्यावर रहाणारा असतो. अपुरे किंवा अयोग्य अन्न खाणारा, घाणीत काम करणारा, स्वच्छतेची तमा नसलेला व संसर्गजन्य रोग असणाऱ्यांच्या संगतीत रहाणारा हा माणूस अनेक आजारांचे माहेरघर झालेला असतो. त्याला कुटुंबात असतानाच असाध्य असे आजार झालेले असतात. त्याच्या आजाराला कुटुंबातले लोक कंटाळलेले असतात. वैतागून हा जीव घराबाहेर रहातो. आजार वाढतच असतो. सुदैवाने एखाद्या दवाखान्यात आश्रय मिळतो, पण नाहीतर रस्त्यावरचे जीवन जगावे लागते. आजार हेच भीक मागण्याचे साधन म्हणून तो हळू हळू वापरू लागतो. हातापायावरच्या जखमा, अशक्तपणा, वाढलेली दाढी, इतकेच नव्हे तर अतिसारामुळे बाहेर येणारे गुद्द्वार यांचे प्रदर्शन करून

पैसे मिळवावे हे शहारे आणणारे दृश्य मी स्वतःही पाहिलेले आहे. सांगण्याचा उद्देश असा की भिकारी आपल्या आजाराचा किंवा व्यंगाचा भीक मागण्याचे साधन म्हणून उपयोग करू लागतो. हे साधन नाहीसे होणे त्याला बरे वाटत नाही. म्हणूनच आजारी माणसास काही वेळेस औषधोपचार घेण्याची सक्ती करावी लागते.

**व्यावसायिक भिकारी** — काही भिकारी भिक्षा मागण्याचा व्यवसायच करणारे असतात. त्यात मुख्येत्वेकरून काही जमाती आहेत. फकीर, गोसावी, आराधी, जोगी, वासुदेव, भुते वगैरे लोक भिक्षा मागून जगणारेच समजले जातात. या सर्व लोकांना घरे असतात; इतकेच नव्हे तर त्यांचे संसार वाढतच असतात. एवढेच की त्यांचे उत्पन्न इतरांच्या मदतीवर अवलंबून असते. यांत पैसा किंवा पिठमिठासारखे पदार्थही असतात. हे लोक घरात किंवा योग्य अशा निवाऱ्याला असल्यामुळे त्यांची स्वच्छता बरी असते. अर्थातच त्यांना आजारही त्या प्रमाणात कमी असतात. या लोकांच्या बाबतीत वैद्यकीय तपासणी फार महत्वाची नसली तरी तिची त्यांना जरूर असते. कारण त्यांच्या घरातही दैन्य व गरिबीमुळे पुष्कळ वेळा माणूस हयगय करतो. तेव्हा अशा माणसांना जुने व अवघड असे आजार असण्याची शक्यता असते. वैद्यकीय तपासणीत ते बाहेर येतात व त्यांना शारीरिक व्याधीतून मुक्त होण्यास मदत करता येते.

याच संदर्भात आणखी एक नियम लक्षात ठेवण्यासारखा आहे. तो नियम म्हणजे नियमावलीतील नियम नं. १० हा होय. या नियमाप्रमाणे ज्यांची वैद्यकीय तपासणी झालेली नाही, अशा नव्या व्यक्तींना तपासणी झालेल्या निरोगी व्यक्तीपासून वेगळे ठेवावे. संसर्गजन्य आजारापासून इतरांना सांभाळावे हा त्यातील मुख्य हेतू होय.

या धरपकडीमध्ये महारोग झालेले व वेडे लोक असतात, तेव्हा त्यांची व्यवस्था कशी करावी या विषयी माहिती व आदेश या कायद्याचे कलम २६ मध्ये देण्यात आलेले आहेत. वेड्या माणसाला कोर्टाचा हुकूम घेऊन वेड्यांच्या दवाखान्यात पाठवता आले तरी याबाबतीत अखेरचा हुकूम राज्य सरकारच देऊ शकते. आज रोजी वेड्या माणसाच्या बाबतीत ही योजना प्रत्यक्ष त्वरित मदत देणारी ठरत नाही. कोर्टाचा कल माणसास वेडे ठरविण्याच्या दृष्टीने बराच साशंक असतो. मोठ्या शहरातून कोर्टाकडे येणाऱ्या वेड्यांच्या प्रमाणात कांही संशयास्पद असल्याच्या अनुभवावरूनच हा दृष्टिकोन बनत असावा असे वाटते. पण या कारणामुळे या संस्थांतून पाठविण्यात येणाऱ्या वेड्यांच्या प्रकरणांना बरेच धक्के बसतात हे खरे आहे. सिव्हिल सर्जन किंवा दोन राजपत्रित अधिकाऱ्यांची प्रमाणपत्रे सुद्धा कोर्ट काही वेळेस ग्राह्य मानीत नाही.

वेड्या लोकांना सांभाळणे ही एक फार मोठी जबाबदारी प्रमाणित संस्थांना पेलावी लागते विष्ठेने आजू बाजू भरवून टाकणारे, मोठमोठ्याने ओरडणारे, गुढग्यात डोके घालून तासन्‌तास बसून रहाणारे, खूप खाणारे व अजिबात न खाणारे, दगड खाणारे, अबोध वस्तू पहाणारे किंवा अबोध आवाज ऐकणारे असे अनेक प्रकारचे वेडे भिक्षेकरी गृहात असतात. त्या सर्वांना वेड्याच्या दवाखान्यात पाठविणे हे जवळ जवळ अशक्य आहे. अशा वेड्यांच्या बाबतीत आपण अधिक अर्ज करू लागलो की कोर्टाकडून योग्य साद मिळतेच असे नाही. ही वेडयांची कहाणी आहे. अशा वेड्यांची वेड्यांच्या इस्पितळांत बदली करण्याचा निःसंदिग्ध असा अधिकार मुख्य निरीक्षकांना देण्याविषयी विचार व्हावयास हवा.

महारोग झालेल्या लोकांच्या बाबतीत असलेला कायदा व नियम नावाचेच आहेत. या लोकांची संख्या एवढी मोठी आहे की त्यांना इंडियन लेपर्स ॲक्ट १८९८ प्रमाणे प्रमाणित संस्थामध्यें जागा मिळू शकत नाहीत. भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणे प्रमाणित संस्थांत आता या लोकांना ठेवण्याची सोय झाल्यामुळे हा प्रश्न थोडा सोपा झाला आहे. परंतु एकंदर प्रश्नाच्या प्रमाणात या सर्व संस्था फार कमी आहेत.

क्षय हाही एक आज भिक्षेकरी गृहांना भेडसावणारा प्रश्न आहे. कुष्टरोग झालेले लोक पुष्कळ वेळा आदान केंद्रात स्वखुषीने यावयास तयार असतात, तसे क्षयाचे रोगी सुद्धा आदान केंद्रात दाखल होण्याकरिता सारखे येत असतात. या रोग्यांची दया येते व मग त्यांना कशी मदत करता येईल याचा विचार करावा लागतो. डोळ्यादेखत माणसाला मरणाच्या तोंडात लोटता येत नाही.

शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहिले असता कुष्टरोगापेक्षा क्षय हा अधिक संसर्गजन्य रोग आहे. या दृष्टीने खोकणारे व थुंकणारे रोगी वेगळे ठेवणे जरूर आहे. प्रमाणित संस्थांत क्षयरोगी ठेवण्याची सोय असली तरी ती नेहमी कमीच पडते.

मुंबईच्या आदान केंद्रात अभ्यागत मनोविश्लेषण तज्ञाची ( Visiting Psychiatrist ) नेमणूक झाली आहे तरी वेड्यांचा प्रश्न सहजासहजी सुटण्यासारखा नाही. कुष्टरोग झालेल्या भिकाऱ्यांच्या बाबतीत त्यांचा रोग, तसेच वेड्या लोकांच्या बाबतीत त्यांचे वेडेपण हा मुख्य प्रश्न आहे. भिक्षेकरीगृह हे सामाजिक स्वास्थ्य प्रस्थापित करणारी संस्था आहे, वैद्यकीय संस्था नाही, त्यामुळे हे प्रश्न आदान केंद्रात किंवा प्रमाणित संस्थामार्फत योग्य तऱ्हेने सोडवता येत नाहीत.

कुष्ठरोगाचे प्रमाण जसे बरेच वाढलेले दिसते तसेच वेड्या लोकांचेही प्रमाण वाढले आहे असे वाटते. संस्कृतिसंकर होत असताना वाढणाऱ्या आपल्या समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या मनावर अनेक प्रकारच्या विचारांचे व संघर्षांचे ताण वाढू लागले आहेत. दुर्बळ माणसाचा किंवा अधिक ताण पडणाऱ्या लोकांचा मनावरचा ताबा नाहिसा होत आहे. या बाबतीत मुख्यतः संशोधन होणे जरूर आहे व त्यानंतर योग्य ती व्यवस्था करावी लागेल. तज्ञांनी याचा विचार करावयास हवा.

वैद्यक शास्त्रज्ञांनी, समाजात स्वास्थ्य निर्माण करण्याकरिता झटणाऱ्यानी व शासनाने विचार करावा असे हे दोन्ही भेडसावणारे प्रश्न आहेत.

# प्रकरण सहावे

## त्यांची प्राथमिक माहिती

प्राथमिक चौकशी करण्याकरिता व्यक्तिचिकित्सक ( Case-Workers ) नेमले जातात. पकडून आणलेल्या लोकांची आदान केंद्रामध्ये वैद्यकीय तपासणी झाल्यावर त्यांना व्यक्तिचिकित्सकासमोर उभे केले जाते. हे अधिकारी या लोकांची सामाजिक चौकशी करतात.

### प्रोबेशन ऑफिसर किंवा केसवर्कर :-

प्रोबेशन ऑफिसर किंवा केसवर्कर या दोन्ही नावावरून या अधिकाऱ्यांच्या कार्या-बद्दल सर्वसामान्य नागरिकास कल्पना करता येत नाही. म्हणून आरंभी या दोन नावांचा विचार करू.

' प्रोबेशन ' हा शब्द मूळ रोमन कॅथॉलिक पंथातील प्रथेवरून आला आहे. रोमन कॅथॉलिक पंथामध्ये ' फादर ' या हुद्यावर कोणत्याही माणसास घेण्यापूर्वी त्याला योग्य वर्तणुकीचा काळ देण्यात येत असे. या काळामध्ये त्या इसमाने चांगली वर्तणूक ठेऊन, आपण ' फादर ' होण्यास योग्य आहोत असे दाखवून द्यावे लागे. या योग्यतापूर्तीच्या काळास ' प्रोबेशनचा काळ ' असे म्हणत व अशा तऱ्हेने ज्याला आपली योग्यता सिद्ध करावयाची आहे त्या इसमास ' प्रोबेशनर ' असे म्हणत.

कालांतराने हा शब्द गुन्हेगारांच्या शास्त्रामध्ये वापरण्यात येऊ लागला-सुधारण्याची संधी दिलेल्या गुन्हेगारास प्रोबेशनर असे म्हणू लागले. तसेच त्याने ज्या काळात सुधारणा करून दाखवावयाची त्या काळाला ' प्रोबेशन पीरिअड ' असे म्हणू लागले. या सुधारणेच्या काळांत त्या गुन्हेगारावर देखरेख करून सुधारण्याच्या दृष्टीने मदत करणाऱ्या अधिकाऱ्यास ' प्रोबेशन ऑफिसर ' असे म्हणू लागले. याच पद्धतीने गुन्हेगार व इतरांना सुधारण्याच्या शास्त्रांत प्रोबेशन ऑफिसर नेमण्यात येऊ लागले.

' केसवर्कर ' हा सुद्धा अडचणीत सापडलेल्या इसमाबद्दलची सर्व तऱ्हेची माहिती

गोळा करून चांगला मार्ग कोणता याची त्याला जाणीव करून देणारा व चांगल्या मार्गानें जाताना मार्गदर्शन व मदत करणारा अधिकारी होय.

वरील दोन्ही अधिकाऱ्यांचे काम जवळ जवळ एकच असते व त्यामुळेच प्रोबेशन ऑफिसरलाच केसवर्कर असे संबोधण्यात येते.

भिकाऱ्यांच्या प्रकरणाचा विचार करीत असताना कोर्टाने प्रोबेशन ऑफिसरच्या रिपोर्टाचा विचार करावा असे भिक्षा प्रतिबंधक कायद्याच्या कलम ६ व ७ मध्ये सांगितले आहे. या कारणामुळे कोर्टामध्ये प्रोबेशन ऑफिसरच्या रिपोर्टाचा विचार करण्यात येतो. हा रिपोर्ट देण्याकरिता प्रोबेशन ऑफिसर किंवा केसवर्कर ( व्यक्तिचिकित्सक ) यांना पोलिसांनी धरून आणलेल्या प्रत्येक इसमाबद्दल काही महत्वाची समाजिक माहिती गोळा करावी लागते.

## माहिती गोळा करणे व त्यातील कसब

कायद्याप्रमाणे पोलीस पकडलेल्या इसमांना वॉरंटसह आदान केंद्रात घेऊन येतात. या पकडण्याचा परिणाम सहाजिकच प्रत्येक इसमाच्या मनावर वेगवेगळ्या प्रकारचा होत असतो. प्रत्येक संशयित भिकाऱ्यास वाटत असते की आपणाला तावडतोब सोडून द्यावे. आपणाला भिकारी म्हणून पकडले आहे असे समजल्यावर मी भिकारी नाही असे तो निरनिराळ्या प्रकाराने सांगण्यास प्रयत्न करीत असतो.

कोणी सांगतो, 'माझ्या जवळचं सर्व सामान काल चोरीस गेलं आहे व मी आताच परगावी जाण्याच्या विचारात होतो.' कोणी सांगतो, 'माझा मुलगा किंवा पत्नी हरवली आहे व त्यांना शोधण्याकरिता मी आताच आलो आहे.' कोणी सांगतो, 'माझा अगदी जवळचा नातलग येथेच रहातो आहे व माझा निरोप जाताच तो धावत येथे येईल.' कोणी सांगतो, 'मी घरचा फार चांगला आहे. मी यात्रेकरिता आलो आहे व मी आता घराकडे जाणार आहे, पण मी भिकारी नाही.' बहुतेकांच्या जवळ ५० पैसे सुद्धा नसतात. इतकेच नव्हे तर, त्यांच्या खिशात किंवा गाठोड्यात पावाचे तुकडे, भाकरीचे तुकडे, भज्यांचा पुडा, इतकेच नव्हे तर हिरव्या मिरच्या, कांदे वगैरे वस्तू सापडतात. सांगण्याचा उद्देश एवढाच की 'मी भिकारी नाही' असे प्रत्येकाला सांगावयाचे असते. 'मला सोडून दिले की मी हे गांव सोडून चाललोच, असे कोणी सांगतात, तर "मी आजारी आहे, मला दवाखान्यात जायचं आहे. हे पहा दवाखान्यातील कागद," असे दुसरे म्हणतात.

प्रत्येकाला स्वातंत्र्य पाहिजे असते. स्वतंत्रपणे कोठेही जावे, केव्हाही यावे, कोणी नाव विचारू नये, कोठून आलास विचारू नये, पैसे मिळाले तर हॉटेलात जाऊन पाहिजे ते खावे, शक्य असेल ते प्यावे, किंवा मिळेल त्याचा भरपूर उपभोग घ्यावा. संस्थेत अडकून पडल्यावर या सर्व गोष्टी कशा मिळणार ? संस्थेत मिळणारे ताजे अन्न, स्वच्छ कपडे, रोजची अंघोळ, झोपायला बऱ्यापैकी बिछाना या सर्व गोष्टी तुच्छ व त्याज्य वाटतात. कोणाला असल्या संस्थेत सर्व धर्मांचे लोक असल्यामुळे किंवा कधीतरी मांसाहारी अन्न तयार होत असल्यामुळे जेवावेसे वाटत नाही. काहींना येथे रहाणे अतिशय कमीपणाचे वाटत असते. औषधोपचार निरुपयोगी व झाडपाल्यांचा उपचार चांगला असे म्हणणारे असतात. कोणाला रोग्याचा खुराक पाहिजे असतो. पण कोणीसुद्धा घर, आई, बाप, पत्नी, नवरा, मुले याबद्दल बोलण्यास तयार नसतो. संसार सोडणारा व अंगावर भगवी वस्त्रे धारण करणाराच असे करतो असे नव्हे तर जवळ जवळ प्रत्येकजण आपल्याला आप्तांच्या-बद्दल आस्था वाटत नाही असे दाखविण्याचा प्रयत्न करीत असतो. शिवाय कायद्याप्रमाणे पोलिसांनी पकडून आणले आहे व कोर्टाचे वॉरंट घेतले आहे याही गोष्टी योग्य माहिती मिळवण्याच्या आड येतात. खरी माहिती सांगणारा थोडासा बावळट असाच समजला पाहिजे.

आरंभी पोलिसांना नाव खोटे सांगितले जाते व त्या नावाबरोबर भरपूर किंवा थोडी-फार खोटी माहिती सांगण्यात येते. माहिती विचारणारा हा शत्रू असावा अशा भावनेने माहिती सांगण्यात येते.

पुष्कळ लोक असे असतात की त्यांना आपले नाव माहीत असते व थोड्या फार प्रयत्नाने ते वडिलांचे नाव सांगू शकतात, पण आडनाव व पत्ता सांगू शकत नाहीत. गावाचे नाव माहीत असले तर तालुक्याचे नाव माहीत नसते व जिल्हा तर सांगताच येत नाही. ही व्यक्तिचिकित्सकांच्या कसोटीची वेळ असते. या सर्व गोष्टी त्या माणसाची भाषा समजत असेल तर. पण जर तो कानडी बोलत असेल, तामीळ, बंगाली, मल्याळम् या सारखी एकादी भाषा बोलत असेल तर मग हे प्रकरणच संपले. व्यक्तिचिकित्सकाला पुष्कळ भाषा येणे फार आवश्यक असते, नाहीतर त्याला काम करणे अवघड होते. रिमांड होममध्यें काम करताना जेवढे भाषावैचित्र्य पहावयास मिळते, तेवढे भाषा वैचित्र्य भिक्षे-करी आदानकेंद्रात पहावयास मिळते. मुंबई येथील आदानकेंद्रात हे वैचित्र्य अधिक प्रकर्षाने लक्षात येते.

**परिवीक्षा अधिकारी :–** प्रोबेशन ऑफिसर या शब्दाला परिवीक्षा अधिकारी असा मराठी शब्द आहे. या अधिकाऱ्याने समाजापासून दूर पळून आलेल्या या

दुर्भागी जीवांना जवळ करून त्यांना समाधानाचे दोन शब्द सांगितले पाहिजेत व त्यांच्या कल्याणासाठी हे केंद्र आहे याची त्यांना खात्री पटवून दिली पाहिजे व मगच त्यांचे खरे नाव, पत्ता या गोष्टी विचारावयास पाहिजेत. यावेळी अधिक खऱ्या गोष्टी समजण्याची शक्यता आहे.

महाराष्ट्रांत ज्या प्रकारे नाव सांगण्याची पद्धत आहे तशी भारतातल्या सर्व प्रांतात नाही. तेलंगणात बापाच्या नावाचे अद्याक्षर लावून नंतर स्वतःचे नाव लिहितात. जसे पी. मल्लप्पा, सी. रामकृष्णराव इत्यादी. परंतु मद्रासमध्ये गावाच्या नावाचे अद्याक्षर लावून मग बापाच्या नावाने अद्याक्षर व शेवटी स्वतःचे नाव लिहिण्याचा प्रकार आहे. आडनाव ही गोष्ट त्यांना समजत नाही. त्यांच्यामधील पोट जातीचे नाव पुष्कळ वेळा ते सांगतात पण त्याचा आपल्याला फारसा बोध होत नाही. कर्नाटकात मोठ्या प्रमाणावर आपल्या प्रमाणे नावे लावतात. उत्तर प्रदेशात स्वतःचे नाव व नंतर बापाचे नाव लावण्याचा प्रघात आहे. पंजाबात सर्व नावात येणाऱ्या सिंग या नावाने घोटाळा होण्याची शक्यता आहे. असे निरनिराळ्या प्रांतांचे नावांचे प्रकार आहेत. माणसाच्या बोलण्यावरून त्यांच्या प्रांताची कल्पना यावयास हवी व त्यावरूनच त्याचे बरोबर नाव मिळवले पाहिजे.

बरोबर पत्ता मिळवणे हे एक अवघड काम आहे. पुष्कळ वेळा पत्ता सांगावा असे या इसमास वाटत असते. पण तो सांगावा कसा हे समजत नाही. अशावेळी सूचक प्रश्न विचारून तो शोधून काढणे हे कौशल्याचे काम आहे. खेड्यातून येणाऱ्या लोकांची अशी स्थिती असते. घर कोणत्या भागात आहे, घराजवळ महत्वाचे कोणते ठिकाण आहे, गावातील पाटलाचे नाव काय, तो कोठे राहतो, चावडी कोठे आहे, ग्रामपंचायतीचे ऑफिस कोठे आहे, गावात कोतवाल कोठे रहातो, वाण्याचे दुकान कोठे आहे, वगैरे प्रश्नावरून त्याच्या घराचा बरोबर पत्ता मिळवता येतो.

वयस्कर माणसांचे आईबाप जिवंत नसले तरी त्यांची भावंडे जिवंत असण्याची शक्यता असते. निरनिराळे नातलग कोण आहेत, चुलत्याचे नाव काय, मामाचे नाव काय, मेहुण्याचे नाव काय असे प्रश्न विचारून नातलगांची माहिती मिळू शकते. नातलगांचे पत्ते देताना हा इसम पुन्हा अडखळतो, कारण आपल्या नातलगास पत्र पाठवले तर गावात आपली 'छी थू' होईल ही भीती असते. छोट्या गावात आलेल्या पत्रामुळे बराच गोंधळ उडतो ही गोष्ट खरी आहे. कारण ज्यांना पत्र लिहितो त्यांना स्वतःला ते वाचता येते असे नाही व मग त्यांना ते कोणाकडून तरी वाचून घ्यावे लागते. त्या पत्रातील माहिती घरगुती व खाजगी राहू शकत नाही. त्या गावात ती माहिती ताबडतोब वणव्या-

सारखी पसरते व जो तो येऊन चौकशी करू लागतो सांत्वन करून मार्गदर्शन करणारे थोडे, पण वरवरची चौकशी करून टवाळी करणारे अधिक, म्हणूनच प्रत्येक माणूस घरी पत्र पाठवू नका असे आर्जवून सांगत असतो. गावात अशी कल्पना असते की हा कामदार माणूस आहे, पण भिकारी म्हणून पकडला गेला, पोलिसांनी पकडला वगैरे बातम्या लोकांच्या तोंडी घोळू लागल्या की मग परत गावात तोंड दाखवण्याची सोय रहात नाही. या व अशाच अनेक कारणांमुळे बरोबर पत्ता सांगण्यास हे इसम तयार नसतात. पत्ता सांगताना किंवा ऐकताना थोडीशी चूक झाली तर हे पत्र अर्थातच योग्य जागी जात नाही.

आणखीही एक मोठी अडचण आहे. महाराष्ट्राबाहेरील राज्यांची नावे, जिल्ह्यांची नावे, तालुक्यांची नावे व गावांच्या नावाचे इंग्रजीत करावयाचे स्पेलिंग यांची व्यक्तिचिकित्सकाला नेहमीच माहिती असते असे नाही. इतकी माहिती असणे जवळ जवळ अशक्य आहे. त्या परप्रांतात पाठवलेल्या पत्रांना बरोबर उत्तर मिळणे हे जवळजवळ अशक्य असे समजण्यात येते. पण व्यक्तिचिकित्सकाने चिकाटीने प्रयत्न केल्यास त्याला यश मिळते व त्यामुळे त्याला जो सात्विक आनंद वाटतो तो व्यक्तिचिकित्सक झाल्यावाचून समजणार नाही.

बाहेरच्या राज्यातीलच नव्हे पण याच राज्यातील रहिवाश्यांचे बरोबर पत्ते मिळवून त्यांच्या नातलगाशी बोलण्याचा प्रसंग फारसा येत नाही. पत्रे पुष्कळवेळा पोहोचतात पण त्यांची उत्तरे येत नाहीत. या टाकून दिलेल्या, नको असलेल्या, पोषणास जड झालेल्या व पुष्कळवेळा मनाला त्रास देणाऱ्या इसमाबद्दल आपुलकीने कोण पत्रे लिहिणार ? पत्राची उत्तरे न पाठवून ते असेच सुचवतात कीं, 'तुम्हाला काय करायचे आहे ते करा, इकडे पाठवू नका म्हणजे झाले.'

फक्त गरीबच असे करतात असे नव्हे तर पुष्कळ वेळा उत्तम कुटुंबातून सुद्धा हेच उत्तर ऐकावयास मिळते व ते सुद्धा आई, बाप, बहीण व भाऊ या अगदी जवळच्या नातलगाबद्दल ! बाह्यत: असे उद्गार ऐकून आश्चर्य वाटते, पण म्हणूनच या पाठीमागची भूमिका समजावून घेणे समाजसेवकाच्या दृष्टीने फार महत्वाचे आहे. समाजाच्या या वागणुकीची चौकशी करताना समाजच कसा बनला आहे व सध्या तो भारतात कोणत्या परिस्थितीत आहे याची माहिती असणे जरूर आहे. ही माहिती नसेल तर आपणाला त्या उत्तर देणाऱ्या व्यक्तीचा राग येईल, तिच्या वर्तणुकीचा अचंबा वाटेल किंवा त्या वर्तनाबद्दल खूप दुःख वाटेल. म्हणून त्यांच्या या वागणुकीमागची भूमिका समजावून घेण्याचा आपण प्रयत्न करू.

# प्रकरण सातवे

## समाज

समाज ही अवाढव्य वाढलेली बहुरंगी व बहुढंगी अशी संस्था आहे. तिचे वर्णन थोडक्यात करणे खूप अवघड आहे. पण समाजसेवा करणाऱ्यांना उपयुक्त अशा दृष्टिकोनातून समाजाची जडण घडण कशी झाली आहे याबद्दलची माहिती फार महत्त्वाची आहे.

सुमारे ५० वर्षांपूर्वी आपल्याकडे सर्व ठिकाणी एकत्र कुटुंब पद्धती चालू होती, एवढेच काय पण सुमारे वीस वर्षांपूर्वी खुद्द पुण्यामध्ये १०० माणसांचे एक मोठे एकत्र कुटुंब होते हे मला माहीत आहे.

समाजशास्त्रांत माणसाचे वर्णन 'कळप भरून रहाणारा प्राणी' असे करण्यात आले आहे व या पद्धतीमधूनच कुटुंब निर्माण झाले. कळपामधून कुटुंबात स्थित्यंतर होण्यास खूप मोठा अवधी लागला, हजारो वर्षे लागली व या हजारो वर्षांत माणूस माणुसकी शिकला. इतराबरोबर प्रेमाने वागायला व एकत्र रहावयास शिकला. स्वैर अशा वासना ताब्यात आणून त्याने कुटुंब संस्थेचा पाया घातला व त्यातूनच पुढे एकत्र कुटुंब निर्माण झाले.

एकत्र कुटुंबात सर्वात अधिक वयाचा पुरुष अगर स्त्री मुख्य असे. त्यांचा एक प्रकारचा दरारा प्रत्येक कुटुंबियावर असे. ते शेती करीत व घरांतील तरुणाकडून शेतीची व घरातील कामे करून घेत असत. वृद्ध हे अनुभवी असत. त्यांच्या अनुभवाचा व ज्ञानाचा उपयोग कुटुंबाला वारंवार होत असे. कुटुंब प्रमुखाच्या आज्ञा सर्वजण मानीत व त्याच्या मदतीला सर्वजण असत. त्यांच्या ठिकाणी अपंग व अशक्ताबद्दल प्रेम व सहानुभूती असे. मुलांना गोष्टी सांगून तो नुसताच करमणूक करीत असे, असे नाही तर तो आपल्या अनुभवाचे ज्ञान मुलांना देत असे. असा हा एकत्र कुटुंबाचा प्रमुख असे.

दुसरे महायुद्ध संपल्यावर हळू हळू यंत्रयुगाचे वारे भारतात आले. स्वातंत्र्याचे युद्ध पेटले असतानाच स्वदेशप्रेमाने प्रजा पेटून उठली होती. गांधीजी जवाहरलाल व

नेताजी सुभाषचंद्र बोस यां‌‌च्या पराक्रमी प्रतिमा सार्‍यांच्या मनांत प्रसन्नपणे वावरत होत्या. स्वदेशांत सार्‍या गोष्टी तयार व्हाव्यात असे सामान्यास वाटतच होते पण श्रीमंत लोकांनी या दृष्टीने प्रयत्न सुरू केले. तो पर्यंत स्वदेशी लोकांचे सरकार आले. त्यांनी उद्योगधंद्यांना चालना दिली व त्यांना मदतीचा हातही दिला. उद्योगधंदे वाढले व अजूनही वाढत आहेत. सरकारी, निमसरकारी व खाजगी क्षेत्रांत उद्योगांची वाढ झाली. धरणे तयार झाली व त्यांची वीज उद्योगधंद्यांना मिळू लागली.

उद्योगांच्या वाढीचा आरंभी एक परिणाम मुख्यतः झाला व तो म्हणजे शेती मागे पडली. दर महिन्यास रोख पैसे मिळवून देणारा उद्योग हा वर्षभर खपून काबाडकष्ट करणार्‍या शेती पेक्षा श्रेष्ठ वाटू लागला. याच सुमारास शिक्षणाची वाढ व्हावी म्हणून खूप प्रयत्न करण्यात आले. खेड्यापाड्यातून शाळा निघाल्या. व तालुक्याच्या गावी माध्यमिक शाळा निघाल्या. आता तर तालुक्यांच्या गावी कॉलेजे-सुद्धा निघाली आहेत. ही सर्व वाढ गेल्या २० वर्षांत झाली आहे.

यंत्रांची वाढ, उद्योगांची वाढ व शिक्षणाची वाढ या कारणामुळे एक स्थित्यंतर जोरात सुरू झाले. शिकलेला तरूण खेड्यातून शहराकडे नोकरी शोधायला निघाला. शहरातील रहाण्याच्या जागा अपुर्‍या पडू लागल्या. घरे बांधणारी महामंडळे स्थापन झाली पण ही उणीव भरून काढता येत नाही एवढ्या झपाट्याने शहरात येणार्‍यांची संख्या वाढली. नव्या उद्योगधंद्यात बर्‍याच लोकांना नोकर्‍या मिळाल्या व काही नोकरी मिळविण्याची खटपट करीत तेथेच राहिले.

ज्या शेतकर्‍यांना पाण्याच्या योजनांचा व विजेचा फायदा मिळाला त्यांचे नशीबच फुलून गेले, पण इतर सर्वजण कसेबसेच जीवन जगत राहिले.

जो पैसा पूर्वी फक्त श्रीमंतांच्या हातात असे त्यांतील काही भाग कामगारांच्या हाती येऊ लागला. राजकारणी लोकांची वाढ झाली व कामगारांना किंवा शेतकर्‍यांना हाताशी धरून राजकारणाची चक्रे फिरू लागली. आज सामान्य कामगार एस्. एस्. सी. झालेल्या कारकुनापेक्षा अधिक पैसा मिळवू लागला आहे.

बव्हंशी म्हातार्‍यांच्या ज्ञानात भर पडली नाही. तरूणांचे ज्ञान झपाट्याने वाढले. यामुळे कुटुंबातील म्हातार्‍यांचा अनुभवावर आधारलेला मोठेपणा कोलमडून पडला. शहरात घरांची टंचाई तीव्रतेने निर्माण झाल्यामुळे म्हातार्‍यांना खेड्यात ठेवण्यात आले, पण तेथे ते सुखाने राहिनात. शहरातील लहान घरांत तर त्यांना बिलकुल जागा नाही. अशी स्थिती झाली.

कुटुंबांतील स्त्रिया पूर्वी अशिक्षित किंवा बाळबोध वळणाच्या, थोरांचा मान ठेवणाऱ्या. आता शिकलेल्या मुली कुटुंबात सुना म्हणून आल्या. त्यांना म्हाताऱ्यांची अडगळ नकोशी झाली. कुटुंबात संघर्ष निर्माण झाले. म्हाताऱ्यांना अपमानास्पद जिणे घरांत निर्माण झाले. त्यांच्या शब्दातला वचक नाहीसा झाला व त्यांना तरुणांच्या तंत्राने वागणे अवघड वाटू लागले.

भारतीय स्त्री ही पूर्वीच्या जमान्यात पुरुषापासून बऱ्याच अंतरावर होती. तिचा संबंध कुटुंबियाशिवाय इतराशी येत नसे. आता कामानिमित्त सारेजण शहरात आले. घरे नसल्यामुळे झोपड्यातून व गलिच्छ वस्त्यातून राहू लागले. घरातील पुरुष कामावर गेला तर स्त्री एकटी दुकटी घरात राहू लागली. समाज कंटकांनी कमकुवत मनोवृत्तीच्या वा अजाण स्त्रिया व मुली यांच्या बाबतीत फायदा घेतला व अनेक दृष्टींनी स्त्री–पुरुष संबंधांची नैतिक पातळी खूप खाली आली. शिक्षणामुळे व भिन्नसंस्कृतिसंगमामुळे सुशिक्षित स्त्री-पुरुषांवर सुद्धा हाच परिणाम झाला आहे. कुमारी मातांचा प्रश्न बिकट होऊ लागला.

आई व बाप कामाला जाऊ लागले. घरांत मुलांच्याकडे लक्ष देण्यास कोणी नसल्यामुळे मुले उनाडपणा करू लागली आहेत. कुटुंबे लहान झाल्यामुळे त्यांची ताकद कमी होऊन ती लौकर मोडू लागली आहेत. अपंगाला पोसणे जड वाटू लागले आहे, वृद्ध हा नकोसा झाला आहे. सुखलोलुपता वाढली आहे. मुलातील शिस्त बिघडली आहे व गुन्हेगारी वाढत असल्याची स्पष्ट चिन्हे दिसत आहेत. नीतीनियमांचे उल्लंघन खूप वाढले आहे. समाजात एक वेगळाच अलगपणा येऊ लागला आहे. जो तो आपल्यापुरतेच पहातो. शेजाऱ्यावर आलेल्या संकटात त्याला मदत करण्याचे प्रत्येकजण टाळीत आहे. स्वतःला जेव्हा अडचण येईल तेव्हाच तो आपत्तीचा विचार करीत आहे. समाज-सेवकांनी ही सामाजिक सहभागिता निर्माण केली पाहिजे. त्याशिवाय कोणत्याही सामाजिक अडचणींना समाज म्हणून तोंड देता येणार नाही.

मुले, वृद्ध, अपंग व मानसिक विकृत या सर्वांची उपेक्षा होऊ लागली आहे व त्यामुळे समाजात वेगवेगळ्या प्रकारचे प्रश्न भीषण स्वरूप धारण करून उभे राहिले आहेत. या सर्व परिस्थितीचा परिणाम म्हणजेच रस्त्यावर दिसून येणारे हे भिकाऱ्यांचे दैन्य आहे असे वाटते. एका दृष्टीने ही समाजातील विकृतीच मूर्त रूप घेऊन रस्त्यात उभी आहे असे डोळसाला दिसते.

# प्रकरण आठवे

## बुद्धी व मन

समाजसेवा कशी करावी याचे शास्त्र झाले आहे. समाजसेवा कोणीही व कशीही करावी हे आता चालणार नाही. ब्रिटिश राजवटीमध्ये वेगळे समाजसेवक होते. हे समाजसेवक सरकारी कामाला मोठाल्या देणग्या देत किंवा मिळवून देत. फौजेच्या भरतीत मदत करीत. कोठल्यातरी शाळेच्या वार्षिक समारंभामध्ये अध्यक्ष म्हणून फिरत. समाज व शासन त्यांना समाजसेवक म्हणून मानत असे. त्यानंतर ब्रिटिश राज्यसत्ता नष्ट करण्यासाठी देशभक्तांनी प्रयत्न केले. त्यांनी समाजाला जागे करण्याचा प्रयत्न केला. शिक्षण घ्यावे म्हणून लोकांना जागृत केले. त्यांनाही समाज सेवक हे नाव होते. सध्या सुद्धा अनेक प्रकारचे समाजसेवक भेटतात. त्यांतील पुष्कळांनी समाजसेवेच्या शास्त्राची माहिती करून घेतली आहे. पण समाजसेवेचे शास्त्र वाटते एवढे सोपे नाही. त्यांत जी व्यक्ती अडचणीत सापडली असेल तिला मदत करावयाची असेल तर दोन तऱ्हेचा अभ्यास करावा लागतो. पहिला अभ्यास ही व्यक्ती ज्या समाजातून व परिस्थितीतून तयार झाली आहे त्या समाजाचा व दुसरा अभ्यास या व्यक्तीच्या गुणदोषयुक्त मनाचा.

पहिल्या विषयाचे ज्ञान होण्याकरिता समाजशास्त्र माहित हवे व दुसऱ्या विषयाचे ज्ञान होण्याकरिता मानसशास्त्राचे ज्ञान होणे जरूर आहे. प्रत्येक माणसाला असे वाटत असते कीं दुसऱ्याच्या मनात काय विचार चालला आहे किंवा त्याचे मन कसे आहे याची आपणाला पूर्ण कल्पना आहे. पण असे मानणाऱ्या लोकांच्या मनाला धक्का देणारी वर्तणूक दुसरा माणूस करतो तेव्हा त्यांना कबूल करावे लागते की अशा वर्तणुकीची आपण अपेक्षा केली नव्हती. एखाद्या माणसाच्या स्वभावातील एकादा पैलू समजला तरी त्याचे संपूर्ण व्यक्तिमत्व आपणाला समजत नाही व तो पर्यंत त्या माणसाची व्यथाच आपणाला समजत नाही. त्या माणसाची व्यथाच समजली नाही तर त्याला सुधारण्याचा प्रयत्न किंवा सुखी करण्याचा प्रयत्न तरी आपण कसा करणार ? माणसाचे खरे व्यक्तिमत्व समजण्याकरिता त्याच्या मनाचे विश्लेषण करता आले पाहिजे व त्याच्या मनामध्ये ज्या वेगवेगळ्या धारणाशक्ती आहेत त्यांचे ज्ञान झाले पाहिजे.

कोणत्याही माणसाच्या मनाचा अभ्यास करताना त्याच्या बुद्धीचा प्रखरपणा समजावून घेणे जरूर आहे. बुद्धी ही एक मनाची शक्ति आहे.

मन ही दिसणारी वस्तू नाही. व ती कशी आहे व कोठे आहे हेही सांगता येत नाही. पण बुद्धीबद्दल मात्र म्हणता येईल की तिचा मेंदूशी फार निकटचा संबंध आहे.

बुद्धीच्या तीन प्रतिशक्ती मानण्यात येतात. १) समजणे २) साठवून ठेवणे ३) पुन्हा स्मरून योग्य वेळी उपयोगात आणणे.

आपण एखादी वस्तू चाखून पहातो. ती आपणाला चटकन समजते. त्या चवीची आपण आठवण ठेवतो. कालांतराने आपण काही खात असताना एकदम म्हणतो "त्या दिवशी पदार्थ खाल्ला होता त्याची चव अगदी अशीच होती."

आपल्या पंचेंद्रियामार्फत आपल्याला निरनिराळ्या वस्तूंचे व प्रसंगांचे ज्ञान होते व आपण ते स्मरणात ठेवतो एवढेच नव्हे तर ते ओळीने स्मरणात ठेवतो व प्रसंग पडल्या-बरोबर त्याची आठवण करून उपयोग करतो.

पुस्तकातील पाठ एकदाच वाचून काही लोकांच्या लक्षांत रहातो. पुढे पुस्तकाची जरूर त्यांना लागत नाही. ही बुद्धीची विषेश शक्ती आहे. सर्वांनाच ही प्राप्त झालेली नसते. मानसशास्त्रज्ञांनी ही शक्ति मोजण्याची पद्धती शोधून काढली आहे. या प्रकाराला बुद्धिमापन पद्धती असे म्हणतात. वेगवेगळ्या प्रकारच्या चाचण्या घेऊन प्रत्येक माणसाचे मानसिक वय किती आहे ते ठरवण्याचे हे शास्त्र आहे.

शास्त्रज्ञानी असे मानले आहे की माणसाच्या ठिकाणची बुद्धी साधारणपणे तो १६ ते १८ वर्षांचा होईपर्यंत वाढत असते व पुढे ती तेवढीच रहाते. तेव्हा ज्याचे मानसिक वय १६ असेल त्याच्या बुद्धीची बहुतेक वाढ पूर्ण झाली आहे असे मानावयास हरकत नाही. त्याचे प्रत्यक्ष वय व मानसिक वय याचे एक सूत्र बनविले आहे व त्यावरून त्याचा बुद्ध्यंक ( I. Q. ) काढता येतो. हा त्याच्या बुद्धिमापनाचा अंश होय. सर्वसाधारण बुद्धिमत्ता असलेल्या माणसाचा बुद्ध्यंक १००° मानण्यात आला आहे. अत्यंत प्रखर व तेजस्वी बुद्धिमत्ता असलेल्या माणसाचा बुद्ध्यंक १४०° मानण्यात येतो, तर निर्बुद्ध, लहान डोक्याचे, लाल गळणाऱ्या माणसांचा बुद्ध्यंक सुमारे ५०° असतो या दरमान बुद्धी असलेल्याचे अनेक प्रकार करण्यात आलेले आहेत.

या बुद्धीच्या जोरावरच माणूस जगातल्या परिस्थितीची जाणीव करून घेत असतो व

त्याचेबद्दल ज्ञान एकत्र करून त्याचा स्वतःच्या व इतरांच्या जीवनात उपयोग करून देत असतो. या माणसालाच आपण साध्या भाषेत फार हुशार माणूस म्हणतो.

मनाचा दुसरा महत्वाचा भाग म्हणजे ज्यामुळे माणसाचा स्वभाव बनतो तो भावनिक विभाग. मूल जन्मल्यापासून त्याच्या मनावर निरनिराळे परिणाम होत असतात. त्या मुलाच्या स्वभावातील काही गुणदोष ( मग ते कितीही थोडे असोत ) आनुवंशिकतेने आलेले असतात असे वाटते. आयुष्यात त्याच्यावर येणाऱ्या प्रत्येक प्रसंगाने त्याच्या मनावर नवा ठसा उमटत असतो. काही ठसे हे अधिक खोलवर उमटलेले असतात. जे ठसे खोलवर उमटलेले असतात त्यामुळे त्या मुलाच्या स्वभावात मूलभूत फरक पडत असतो.

आतापर्यंत या गूढ व अगम्य अशा प्रांतात जे संशोधन झाले आहे त्यावरून मानसशास्त्रज्ञांना असे वाटत आहे की वयाच्या सातव्या वर्षापर्यंत जे परिणाम मुलांच्या मनावर होत असतात त्यामुळेच त्यांच्या स्वभावाची मूळ जडण घडण होत असते. त्यानंतर त्यांच्या स्वभावात फारसा फरक घडून येत नाही. म्हणजेच असे म्हणता येईल की माणसाचा स्वभाव त्याच्या वयाच्या सातव्या वर्षापर्यंत जवळ जवळ पूर्णपणे तयार होतो.

अशा रीतीने मुलाच्या वयाची पहिली सात वर्षे अत्यंत महत्वाची आहेत. पुष्कळवेळा वयाच्या सातव्या वर्षी त्याचे शिक्षण सुरू होते पण त्यावेळी त्याच्या स्वभावाचा पाया तयार झालेला असतो.

याचाच अर्थ असा की माणसाचा स्वभाव हा परिस्थितीप्रमाणे तयार होत असतो. त्याला विशेषतः बालवयात जे अनुभव येतात त्या अनुभवामुळेच त्याच्या स्वभावाची जडण घडण होते. आपण ज्याला स्वभाव म्हणतो तो तरी काय आहे ? विशिष्ट परिस्थितीत माणूस ज्या प्रकारे वागतो त्याला आपण त्याचा स्वभाव असे म्हणतो. प्रेमळ, क्रूर,, भित्रा, शूर, गर्विष्ठ, निगर्वी, प्राण्यावर दया करणारा किंवा दया न करणारा, आईबापांचा मान राखणारा किंवा त्यांचा मान न राखणारा. इत्यादी अनेक पैलू माणसाच्या स्वभावाला असतात व हे सर्व पैलू त्याच्या पूर्वानुभवामुळे निर्माण झालेले असतात.

माणसाची व्याख्या मानसशास्त्रांत विचार करणारा प्राणी अशी केली आहे. मानव सोडून इतर प्राणी फारसा विचार करणारे नसतात. पण माणूस हा खूप विचार करणारा आहे. म्हणूनच तो आपल्या रानटी अवस्थेपासून कितीतरी वेगळा झाला आहे. त्याने आपल्या मूळ स्वभावधर्मावरसुद्धा मात करण्याचा प्रयत्न केला आहे. जनावरात आई, बाप, भाऊ, बहिण ही नाती लैंगिक जीवनात नसतात. पण माणसाने हजारो वर्षात कौटुं-

बिक जीवन व समाजजीवन निर्माण करून निरनिराळी नाती तयार केली आहेत. ही नाती तो कसोशीने सांभाळण्याचा प्रयत्न करतो. परंतु त्याचा मूळ पाशवी स्वभाव अनेक वेळा उचल खातो. स्वतःवरील ताबा टिकवण्यासाठी माणसाला खूप प्रयत्न करावे लागतात. या प्रयत्नांनाच मनावर येणारा ताण असे म्हणतात. हे ताण विचार द्वंद्वातून किंवा संघर्षातून निर्माण होतात. हा ताण ज्या वेळी कमी प्रमाणात किंमा कमी मुदतीचा असतो तेव्हा त्याचा फार मोठा वाईट परिणाम मनावर होत नाही, परंतु तो जर बराच काळ टिकून राहिला किंवा त्याची तीव्रता अधिक असली तर पुष्कळ वेळा मनावर तीव्र आघात होऊन विकृतीं निर्माण होण्याची शक्यता असते. ही विकृती जरी परिस्थिती किंवा औषधोपचार यामुळे नाहीशी झाली तरी तिचा काही परिणाम मनावर रहाण्याची शक्यता असते. काही व्यक्तींच्या मनाला एक तऱ्हेचे अपंगत्व येते. अशा माणसाबरोबर रहाणे किंवा अशा माणसाने इतर समाजात रहाणे अवघड असते. थोड्या प्रमाणात विकृती असलेली माणसे समाजात खूप आहेत पण विकृतीतीची तीव्रता अधिक असेल तर तो माणूस समाजात सुखाने राहू शकत नाही. भिकाऱ्यात या प्रकारचे लोक बरेच आहेत.

पुष्कळवेळा माणसाला लहानपणापासून जे अनुभव येतात त्यांचा किंवा त्याला ज्या परिस्थितीतून जावे लागते त्या परिस्थितीचा त्याच्या मनावर इतका ठसा उमटतो की त्याच्या स्वभावात विकृती निर्माण होते. त्याच्या स्वभाव वैशिष्ट्यामुळे त्याच्या मनात संघर्ष निर्माण होतो किंवा समाजातील इतर व्यक्तीबरोबर त्याचा संघर्ष सुरू होतो. या संघर्षामुळे तो एकतर समाजाशी झगडायला उभा रहातो किंवा निराशेने मौन स्वीकारून अंतर्मुख होतो. या मानसिक प्रकारांना अनुक्रमे बहिर्मुखता व अंतर्मुखता म्हणतात.

या दोन्ही प्रकारातील तीव्रता अधिक झाली की तो माणूस कुटुंबात किंवा समाजात विसंवादी होतो.

समाजाने प्रत्येक व्यक्तीच्या वागणुकीला मर्यादा घालून दिलेल्या आहेत. याला सामाजिक व्यक्तिस्वातंत्र्य असे म्हणता येईल. या मर्यादा समाजाच्या बळकटीसाठी व योग्य वाढीसाठी आहेत. पण मानसिक विकृति झालेलीं माणसे या सामाजिक बंधनाप्रमाणे वागत नाहीत. त्यांची वर्तणूक पुष्कळ वेळा नियमबाह्य ठरते. मग आपण अशा लोकांना समाजात अडचणी निर्माण करणारे किंवा ज्यांच्या स्वभावात दोष निर्माण झाला आहे असे लोक मानतो.

# प्रकरण नऊ

## व्यक्तिकार्य म्हणजे काय ?

प्राथमिक चौकशी या प्रकरणात व्यक्तिकार्याबद्दल माहिती दिलेली असली तरी ती प्राथमिक चौकशीच्या स्वरूपात आहे. व्यक्तिकार्याचे शास्त्रीय स्वरूप कोणते आहे हे त्या प्रकरणात सांगण्यात आलेले नाही. या प्रकरणात व्यक्तिकार्य या पद्धती विषयी संक्षेपाने माहिती देण्याचा मानस आहे.

समाज सेवेच्या क्षेत्रांत मुख्यतः तीन विभाग मानण्यात आले आहेत. १) व्यक्तिकार्य ( Case Work ) २) संघकार्य ( Group Work ) ३) सामाजिक संघटनात्मक कार्य ( Community Organisation ).

या तीन प्रकारांनी समाजकार्य शास्त्रीय दृष्टिकोनातून करता येते. समाजात स्वास्था टिकून रहावे यासाठी निरनिराळ्या मार्गांनी समाजात योग्य विचार व प्रेरणा निर्माण करावयास हव्यात व त्याच दृष्टीने समाजसेवेचे हे तीन मुख्य मार्ग निर्माण झाले आहेत.

व्यक्ति कार्यात व्यक्ती ही समाजाचा अंतिम घटक असल्यामुळे, जेव्हा तिच्यामध्यें काही दोष आहेत असे आढळते तेव्हां त्या व्यक्तीबद्दल विशेष चिकित्सा करावी लागते व तिची माहिती मिळवून तिच्यामध्ये योग्य तो बदल घडवून आणावा लागतो. संघकार्यामध्ये समाजाच्या विशिष्ट विभागामध्ये विकृति निर्माण होऊ नये म्हणून त्या विभागाच्या सर्व घटकांच्या शिक्षणाचा, धंदे शिक्षणाचा, करमणुकीचा किंवा इतर काही कार्यक्रम हाती घेण्यात येतो. अशा कार्यक्रमामुळे त्या संघावर योग्य तो परिणाम घडवून आणता येतो. शेवटचा कार्यक्रम सर्वांत मोठा घटक जो समाज ( Community ) त्या संबंधीचा होय. तो कार्यक्रम समाजासाठी कल्याणकारी योजना तयार करून त्यांची अंमलबजावणी घडवून आणणे हा होय. शेवटचे दोन्ही कार्यक्रम संघाला किंवा समाजाला चालना देऊन त्याच्यामध्ये अयोग्य विचार व आचार निर्माण होऊ नये यासाठी वापरण्यात येणारे बचावात्मक व अभिवृद्धीचे असतात, तर पहिला व्यक्तिकार्याचा कार्यक्रम व्यक्तीमध्ये सुधारणा घडवून आणण्याचा असतो. येथे आपण फक्त पहिल्याच प्रकाराचा विचार करूं.

मेरी रिचमंड यांनी व्यक्तिकार्याची केलेली व्याख्या खालील प्रमाणे आहे :

" Social case-work may be defined as processes. which develope personality through adjustments conciously effected individual by individual between men and their environments. "

" व्यक्तिकार्य म्हणजे व्यक्तिमत्व सुधारण्याकरिता, व्यक्ती व्यक्तीत तसेच मानवाच्या व त्याच्या भोवतालच्या परिस्थितीमध्ये जाणीवपूर्वक घडवून आणलेल्या तडजोडींच्या कार्यपद्धती होत. "

एखाद्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्वात जेव्हा काही दोष निर्माण होतो तेव्हा तो दोष घालवण्याकरिता व्यक्तिकार्यकर्त्याला ती व्यक्ति तिच्या भोवताली असणाऱ्या व्यक्ती यांच्यात अनेक प्रकारची तडजोड घडवून आणावी लागते, इतकेच नव्हे तर ती व्यक्ती व तिच्या भोवतालची परिस्थिती यांच्यातही तडजोड घडवून आणावी लागते. ही सर्व तडजोड काही हेतू मनात बाळगूनच करावी लागते इतकेच नव्हे तर ही तडजोड घडवण्याकरिता ज्या कार्यपद्धती किंवा तंत्र आहे ते कौशल्यपूर्वक वापरावे लागते. मानवाचे मन फार नाजुक व संस्कारक्षम आहे. व्यक्ती व परिस्थिती याबद्दल प्रत्येक माणसात पूर्वग्रह निर्माण झालेले असतात. प्रत्येक व्यक्तीच्या मनात निरनिराळी मूल्ये असतात, तसेच त्यांच्या मनाचे कलही वेगवेगळे असतात. या साऱ्या गोष्टींची सूक्ष्म नोंद घेऊन व्यक्ति कार्यकर्त्याने प्रत्येक व्यक्तीशी वागावयाचे व बोलावयाचे असते. या तंत्रात कौशल्याचा भाग मोठा आहे पण मुळात समाजशास्त्र व मानसशास्त्र या दोन्ही शास्त्रांची त्याला चांगली माहिती असणे जरूर आहे. शिवाय त्याचा स्वभाव प्रेमळ असून त्याला इतरांना मदत करण्याची मनापासून इच्छा असावी. अशी बहुगुणी व्यक्तीच उत्तम व्यक्तिकार्यकर्ता होऊ शकते.

व्यक्तिकार्यकर्त्यांच्या ठिकाणी वर नमूद केलेले गुण नसतील तर अभ्यास करावयाच्या व्यक्तिच्या जागृत व अर्धजागृत शक्तीची नोंद त्याला घेता येणार नाही. किंवा ज्या शक्ति चैतन्यरहित झालेल्या आहेत त्या पुन्हा चैतन्ययुक्त करता येणार नाहीत. व्यक्तिकार्यकर्ता व अभ्यासव्यक्ती यांचे मानसिक संबंध अत्यंत लवचिक व गुंतागुंतीचे असतात. त्यांच्या संवादातील प्रत्येक वाक्य व त्यांची प्रत्येक कृती ही एकाच्या मनात दुसऱ्या विषयीची प्रतिमा निर्माण करीत असते. अशावेळी अतिशय कल्पक, हुषार, प्रभावी व्यक्तिमत्वाचा व्यक्तिकार्यकर्ता असल्याशिवाय मृतवत् झालेल्या शक्तिमध्ये नवजीवन निर्माण कसे होणार ? मेलेल्यांना जिवंत करण्याचे साधन अजून मानवास सापडले नसले तरी ते कांही प्रमाणात व्यक्ति कार्यकर्त्यांच्या हातात आहे. अर्थात् त्याचा उपयोग नीट करता आला पाहिजे.

मराठी साहित्य-संस्कृती
मंडळ ग्रंथालय [illegible]
मुंबई-४०० ०३२.
रजिस्टर नंबर 960
वर्गीकरण नंबर

यासाठीच जाणकारांनी व्यक्तिकार्यांच्या बहुविध अंगांचे निरीक्षण करून शास्त्र बनविले आहे. या शास्त्रातील महत्वाचे ६ मुद्दे याप्रमाणे आहेत.

१) व्यक्तिमत्वाचा आदर किंवा बूज राखणे.
( Respect for the individual. )

२) अभ्यासव्यक्तीने दिलेल्या माहितीची गुप्तता.
( Confidentiality )

३) अभ्यासव्यक्तीस तिच्या समस्येसह समजून घेणे.
( Acceptance )

४) उपचाराच्या स्वरुपाचा निर्णय अभ्यासव्यक्तीकडून करून घेणे.
( Self determanation. )

५) अभ्यासव्यक्तिबद्दल बरा अगर वाईट निर्णय घेण्याचे टाळणे.
( Non-judgmental attitude )

६) उपचारांचे निर्धारपूर्वक आयोजन व पालन.
( Planning and Execution )

## १) व्यक्तिमत्वाचा आदर व बूज राखणे

समाजसेवकासमोर कोणती व्यक्ती येणार ? अर्थात जीवनात समस्या निर्माण झाल्यामुळे जी संभ्रमात पडली आहे ती. कोणत्या मार्गाने जावे याचा निर्णय ती घेऊ शकत नाही. एवढेच नव्हे तर आपला मूळ मार्ग कोणता याचेही भान तिला नाही. या परिस्थितीमध्ये ती असे काही वर्तन करते की समाजापासून तिला किंवा तिच्या या वर्तनामुळे समाजाला धोका निर्माण होतो. असे गृहीत धरण्यात आले आहे की ही व्यक्ती समस्यापूर्ण झाली आहे व तिला कुटुंबातील किंवा समाजातील लोक कंटाळले आहेत. अर्थात समाजाच्या दृष्टीने या व्यक्तीमध्ये काहीतरी अयोग्य असे आहे, पण त्याच प्रमाणे तिच्या जवळ काही तरी चांगले पण असले पाहिजे व त्या चांगल्याचा मान ठेवला पाहिजे. पुष्कळवेळा वाईट फार थोडे असते पण ते इतके ठळक असते की त्या व्यक्तीच्या जवळपास सुद्धा जायला सर्वसामान्य नागरिक भितो. उदाहरणार्थ, ज्याच्या हातून खून झाला आहे अशी व्यक्ती. तिने खून केला असे म्हटले की तिच्या हातून आपल्याला धोका आहे असे सर्व सामान्य माणसाला वाटत असते. पण असा माणूस उत्तम पिता व पती असू शकेल. कदाचित तो उत्तम कलाकार असेल. एका विशिष्ट परिस्थितीमध्ये त्याच्या हातून खून झाला म्हणून त्याच्या व्यक्तिमत्वाचा अपमान करण्याचे कारण नाही व त्या व्यक्तीचा अभ्यास करावयाचा असल्यास, त्याच्या अंतःकरणाच्या

कोनाकोपऱ्यात शिरून ते जाणून घ्यावयाचे असेल तर त्याच्या व्यक्तीमत्वाचा आदर ठेवला पाहिजे. सारे जग त्याला तुच्छ मानीत असले तरीही व्यक्तिकार्यकर्त्याने त्याला आदरपूर्वक जवळ केले पाहिजे. म्हणजेच त्याची अडचण समजून घेता येईल व त्यातून मार्ग कसा काढावा हे त्याला शिकविता येईल.

## २) अभ्यास व्यक्तीने सांगितलेल्या माहितीबद्दलची गुप्तता

संपूर्ण विश्वास निर्माण झाल्याशिवाय कोणतीच व्यक्ती आपल्या मनांत लपवून ठेवलेली साधी गोष्टसुद्धा इतरांना सांगत नाही. याचे मुख्य कारण आपली गुप्त गोष्ट इतरांना कळेल व त्याचा दुष्परिणाम आपल्या जीवनावर होईल किंवा आपल्याविषयी गैरसमज वाढत जातील ही त्या व्यक्तीला वाटणारी भीति. त्या व्यक्तीचा खरा मित्रच ती दूर करू शकतो. यासाठी खऱ्या मित्राची भूमिका घेणे हे व्यक्तीकार्यकर्त्याला अत्यावश्यक आहे. जेव्हा आपला मित्र एकादी गुप्त गोष्ट आपणाला सांगतो तेव्हा त्या मित्राबद्दलची ही गोष्ट आपण इतरांना सांगत नाही व त्या मित्राच्या हितसंरक्षणाच्या दृष्टीने आपण प्रयत्न करू लागतो. ही भूमिका व्यक्तीकार्यकर्ता घेतो तेव्हाच अभ्यास व्यक्ति विश्वासाने आपले हृदय मोकळे करून त्याच्यापुढे ठेवते.

भिक्षेकरी आदान केंद्रात किंवा प्रमाणित संस्थेत कितीतरी वेगळ्या प्रकारचे लोक येतात. प्रत्येकाचे जीवन म्हणजे एक कादंबरीच असते, पण ती एक शोकांतिकाच होय. अशा गोष्टी आपणाला समजल्या आणि जर त्याबद्दल आपण गुप्तता बाळगली नाही तर त्या व्यक्तीच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने मोठा धोका निर्माण होतो. कांही समाजांत तुरुंगात जाणे इतके गैर मानतात की अशा माणसाला ते समाज बाळीत टाकतात. भिक्षा प्रतिबंधक कायद्याखाली अटक, आदान केंद्रात किंवा प्रमाणित संस्थेत कोर्टाच्या हुकुमान्वये रहाणे, या प्रकारास सर्व साधारण माणूस तुरुंगवास असेच मानतो व मग ही बातमी हितशत्रूंना मिळाली तर त्याचे तेथून पुढचे जीवन धुळीला मिळाल्यासारखे होते. ही एक मोठी भीति बहुतेक लोकांच्या मनांत असल्याचे आदान केंद्रात दिसून येते.

## ३) समस्यापूर्ण व्यक्तीस तिच्या समस्येसह समजून घेणे

ज्या व्यक्तीच्या मनांत संभ्रम निर्माण झालेला आहे किंवा जिच्या जीवनांत समस्या निर्माण झालेल्या आहेत ती व्यक्ती एखाद्या प्रमादात गोवली गेलेली असते. प्रमाद गुन्ह्याशी संबंधित असेल किंवा नसेलही. पण सामाजिक प्रमाद तिच्या हातून झालेला असतोच. पुष्कळ वेळा या प्रमादाविषयी योग्य असे ज्ञान त्या व्यक्तीला नसते.

आपण करतो आहोत ते बरोबर आहे अशी चुकीची कल्पना त्या व्यक्तीच्या मनात असते. या बाबतीत प्रसिद्ध उदाहरण वाल्या कोळ्याचे घेता येईल. त्याच्या बाबतीत खून करणे ही किरकोळ व नित्याचीच बाब होती. किडा मुंगी चिरडून टाकावी अशी माणसाची हत्या त्याच्या हातून होत होती. आपण काही गैर करीत आहोत याची कल्पनाच त्याला नव्हती. नारदमुनींनी त्याच्या प्रमादाची किंवा त्याची हेटाळणी केली नाही. पण त्याचा प्रमाद मोठ्या कौशल्याने त्याच्या नजरेस आणून दिला. या प्रकरणापुरते नारदमुनी हे एक उत्तम व्यक्तिकार्यकर्ते होते. असा निर्वाळा कोणी दिला तर ते योग्यच होईल.

याचा अर्थ त्या माणसाच्या हातून झालेल्या गुन्ह्याला किंवा प्रमादाला मान्यता देणे असा नाही. त्या व्यक्तीच्या ठिकाणी असलेले दोष व गुण यांची नोंद घेणे व त्याच्या दोषाबद्दल त्याचा उपहास न करणे, असा त्याचा अर्थ आहे. त्याच्या हातून झालेल्या प्रमादाबद्दल त्याला दूर लोटले तर त्याच्या ठिकाणच्या गुणांची व त्याच्या एकंदर व्यक्तिमत्वाची ओळख होणार नाही व त्याच्या समस्येतून निघण्याकरिता कोणते मार्ग आहेत याची जाणीव आपणाला होणार नाही व त्यालाही ती करुन देता येणार नाही.

## ४) उपचाराच्या स्वरूपाचा निर्णय समस्यापूर्ण व्यक्तीकडूनच करून घेणे

या बाबतीत असा एक प्रश्न विचारला जाईल की जी व्यक्ती समस्यापूर्ण आहे किंवा जी गोंधळात पडलेली आहे तिला मार्ग कसा सापडणार ? व तो सापडला असला तर व्यक्तीकार्यकर्त्याची जरूर तरी काय ? प्रश्न बरोबर आहे व उत्तरही थोडा विचार केल्याबरोबर सापडण्यासारखे आहे. मनात संभ्रम निर्माण झालेली व्यक्ती गोंधळून गेलेली असते. व तिला स्वतःचा मार्ग सापडत नसतो ही पण गोष्ट खरी आहे. या समस्यापूर्ण व्यक्तीला मार्ग सापडत नाही याचे कारण ती व्यक्ती शांत चित्ताने स्वतःच्या परिस्थितीबद्दल विचार करू शकत नसते. या व्यक्तीच्या व्यक्तिमत्वाचा व आजुबाजूच्या परिस्थितीचा अभ्यास व्यक्तिकार्यकर्ता तौलनिक दृष्टीने शास्त्रज्ञाच्या भूमिकेतून करतो. यामुळेच व्यक्तिकार्य करणाऱ्या व्यक्तीची जरूरी आहे. व्यक्तिकार्य करणाऱ्याला सुटकेचे अनेक मार्ग दिसतात, पण या मार्गातून सर्वात सोईचा व कमीत कमी त्रासाचा मार्ग कोणता हे व्यक्तीच ठरवू शकते. याचे कारण ज्या परिस्थितीमध्ये त्या व्यक्तीला जावयाचे असते. तिची सखोल माहिती व अनुभव त्या व्यक्तीलाच असतो. ही माहिती व्यक्तिकार्यकरणाऱ्याला असू शकत नाही. त्यामुळे या समस्येतून निघण्यास सर्वात चांगला मार्ग कोणता याचे ज्ञान समस्यापूर्ण व्यक्तीला काहीशा व्यक्तिकार्यानंतर योग्य तऱ्हेने होऊ शकते. अर्थात हे तावडतोब घडून येत नाही याला जो वेळ लागतो तेवढ्यात समस्यापूर्ण

व्यक्ती व व्यक्तिकार्यकर्ता हे जीवाभावाचे मित्रच झालेले असतात. ही वेळ येण्यापूर्वी समस्यापूर्ण व्यक्तीच्या ठिकाणी एक तऱ्हेचा आत्मविश्वास निर्माण झालेला असतो त्यामुळे त्या समस्येतून सुटण्याच्या मार्गांची स्पष्ट कल्पना तिला येते व अखेरचा निर्णय ती घेऊ शकते.

## ५) अभ्यास व्यक्तीबाबत मत बनविण्याची ( बरे अगर वाईट ठरविण्याची ) प्रवृत्ती टाळणे

समस्यापूर्ण व्यक्ती ही काहीतरी प्रमादामुळेच व्यक्ती कार्यकर्त्यासमोर आलेली असते. दोष प्रत्येक व्यक्तीत असतोच. पण व्यक्तिकार्य करणाऱ्याने जर त्या व्यक्तीला दोष लावून स्वतःकडे न्यायाधिशाची भूमिका घेऊन गुन्हेगार म्हणून ठरवले तर त्याचा अत्यंत वाईट असा परिणाम समस्यापूर्ण व्यक्तीवर होतो व तिच्या पुनर्वसनाचा प्रश्न अधिक गुंतागुंतीचा होत जातो. याच कारणासाठी समस्यापूर्ण व्यक्तीला तिच्यापुढील समस्येसह समजून घेणे अत्यावश्यक आहे. अशा तऱ्हेने मत बनवणे व व्यक्तीस तिच्या समस्येसह समजून घेणे ही दोन्ही तत्वे संलग्न आहेत.

## ६) उपचारांचे निर्धारपूर्वक आयोजन व पालन

कोणत्या मार्गाने जावयाचे याबद्दल एकदा निर्णय घेतला की त्या निर्णयाप्रमाणे आयोजन करणे जरूर आहे. निर्णय पूर्ण विचारांती घ्यावा. समस्यापूर्ण व्यक्तीला पुष्कळ-वेळा ज्या अडचणी येतात त्यातून तिला पार पडण्याचे प्रयत्न व्यक्तिकार्यकर्त्याने करावयास पाहिजेत.

समस्यापूर्ण व्यक्तीबरोबर बोलताना व विचार-विनीमय करताना व्यक्तिकार्य करणाऱ्याने शुष्कवृत्ती ठेवली तर ती व्यक्ती आपले अंतरंग उघडे करणार नाही. अभ्यास व्यक्ती व व्यक्तिकार्य करणारा यांच्यातले प्रेम ( व विचारांची देवाण घेवाण ) त्यांच्या संभाषणातून फुलत असते. त्यातूनच एकाला दुसऱ्याचे अंतरंग समजते व दुसऱ्याला पहिल्याबद्दल विश्वास वाटतो. केवळ, "तुझे नाव काय ? " व "तुझ्या बापाचे नाव काय ? " असल्या प्रश्नातून व्यक्तिकार्य घडून येत नाही. अडचणीत सापडलेल्या व्यक्तीच्या जीवननौकेला बसणाऱ्या मोठ्या लाटांच्या आघाताविषयी या मित्राला माहिती पाहिजे असते, एवढेच नव्हे तर त्या नौकेच्या बनावटीची संपूर्ण माहिती व सुखद हवेच्या योगाने निर्माण होणाऱ्या कंपनांची व तिच्या शिडामधल्या हवेच्या जोराची कल्पना यावी लागते.

या गोष्टी अलिप्तपणे अगर शुष्कपणे काम करणाऱ्याला कशा समजाव्यात! अभ्यास व्यक्तिबद्दल गाढ प्रेम हाच व्यक्ती कार्याचा पाया आहे.

व्यक्तीकार्य करणारा हा अभ्यासव्यक्तीचा मित्र झाला पाहिजे. समाजाला नको असलेल्या दोषी व्यक्तीला कोणीच जवळ करीत नाही. मग प्रेम करणे तर दूरच राहिले. म्हणूनच व्यक्तिकार्याला भावनेचा ओलावा मिळाला की या कार्याचा वृक्ष फोफावतो. मात्र अभ्यास व्यक्तीविषयी आपुलकी दाखवता दाखवता स्वतः व्यक्तीकार्यकर्ता तिच्या भावनेच्या आहारी जाता कामा नये. अभ्यासव्यक्तीच्या दुःखाचा विचार करता करता ते आपलेच दुःख आहे असे या मित्राला वाटू लागले व तो स्वतःच त्या दुःखाच्या ओघात सापडला तर तो वहात जाईल व मार्गदर्शनाच्या कामाला निरुपयोगी ठरेल. भावनेचा ओलावा तर निर्माण झाला पाहिजे पण भावनेला बळी मात्र पडता उपयोगी नाही. ही तारेवरची कसरतच आहे पण ती केल्याशिवाय उत्तम व्यक्तिकार्य होत नाही.

व्यक्तिकार्य हे पुष्कळ अंशी शब्दावर अवलंबून असणारे शास्त्र आहे. शब्द तर सर्वच लोक वापरतात. वाह्यात मुलाला आईबाप सांगतच असतात. चोराला चोरी करू नको म्हणून सारेच सांगत असतात. पण या शब्दांचा उपयोग होतोच असे नाही. म्हणून हे व्यक्तिकार्याचे शास्त्र निरुपयोगी आहे असा काही लोकांचा समज होतो. पण यात किती तथ्य आहे हे आपण एक उदाहरण घेऊन तपासून पाहू. एक तरुण गुन्हेगार आहे. त्याच्या हातून मोठा गुन्हा घडला आहे. गुन्हा झाल्यानंतर त्याला पोलिसांनी पकडले आहे. पोलिसांच्या ताब्यात जाण्याचा त्याचा पहिलाच प्रसंग आहे. त्याला पोलीसस्टेशनात आणल्यानंतर आतल्या खोलीत नेऊन हवालदार कोणताही प्रश्न न विचारता एकदम दोनचार फटके लगावतो. शरिराच्या दोनचार भागातून रक्त वाहू लागल्यावर हवालदार क्रुद्ध मुद्रेने त्याला आईबहिणीवरुन दोनचार शिव्या हासडतो व मग गुन्हा केला काय असे दरडावून विचारतो. कदाचित हे विचारीत असताना आणखी एखाद दुसरा तडाखा बसतो. गुन्हेगाराला विचारण्यात येणारा हा पहिला प्रश्न. त्यानंतर पोलीस स्टेशनमध्ये फौजदार वगैरे हेच प्रश्न थोड्याबहुत फरकाने पण याच पद्धतीने विचारतात. थोड्याच वेळात गुन्हेगाराला मॅजिस्ट्रेट पुढे नेण्यात येते. मारल्याच्या खुणा चेहेऱ्यावर दिसत नसतात. मॅजिस्ट्रेट निर्विकार चेहेऱ्याने विचारतात, 'तुला कोणी मारलं काय ?' या प्रश्नाला नकारार्थक उत्तर द्यावे लागते. पुढे कोर्टात केस सुरू झाली की तितक्याच निर्विकार चेहेऱ्याने व संथ आवाजात विचारतात, 'तुला गुन्हा कबूल आहे काय ? पुढे कोर्टाच्या आवारात झाडाखाली तो गुन्हेगार बसलेला असतो.

त्याच्या हातात बेड्या अडकवलेल्या असतात. बेड्यामधून काढण्या घालून हत्यारी हवालदार काढण्या धरून बसलेला असतो. तेवढ्यात त्या गुन्हेगाराची आई व एक जिवलग मित्र येतो. आईच्या अंतःकरणात धडधड चालू असते. विचारांचे काहूर माजलेले असते. तिला शब्द सुचत नाहीत. मित्राच्या मध्यस्थीने हवालदार आईला भेटण्याची परवानगी देतात. या हवालदाराचा गुन्ह्याच्या तपासाशी संबंध नसतो. आई त्याच्याजवळ जाते. त्याच्या विस्कटलेल्या केसावरून आपला थरथरता हात फिरवते. गुन्हेगाराच्या डोळ्यातून अश्रूंची धार लागते. आई पाठीवरून हात फिरवते. आईच्या पदराने डोळे पुसले जातात. आई विचारते, 'काय केलंस हे?' तो म्हणतो, 'आई चुकलं माझं' शब्दात केवढे सामर्थ्य आहे! दोनच मिनिटात कबुली जबाब होतो. काल रात्रभर शरिराने ताण सहन केलेला असतो तरीही पण हे शब्द पोलीस स्टेशनात किंवा कोर्टाच्या समोर उमटले नाहीत.

शब्दांचे सामर्थ्य मोठे आहे. ते योग्य पद्धतीने उच्चारले तर त्याचा परिणाम चांगला व दूरगामी होतो व्यक्ती कार्य करणारा निरर्थक बडबड करत नसतो. त्याच्या ठिकाणी मानसशास्त्रशाची सूक्ष्म दृष्टी असते. त्यांत अमृताचा गोडवा, प्रेमाच्या रज्जूंचा चिवटपणा व बुद्धिचा प्रकाश असतो. काळोख्या रात्री चमकून मार्गदर्शन करणाऱ्या विद्युल्लतेचे तेज त्या शब्दांत ओथंबून राहिलेले असते व म्हणूनच नवजीवनाच्या अमृताचा झराच त्यातून वाहू लागतो.

आता आपण समाज कार्याच्या सहा तंत्राचा विचार केला. सध्या आणखी दोन नवी तंत्रे मान्यता पावली आहेत. ती १) समाज कार्याचे प्रशासन व २) संशोधन ही आहेत.

प्रशासनाबद्दल माहिती पुढे स्वतंत्र अशा प्रकरणात दिली आहे. संशोधन ही एक अतिशय महत्वपूर्ण कृती मानवाने आत्मसात केली आहे. जगाच्या आरंभापासून आता-पर्यंत ज्या सुधारणा झाल्या आहेत त्या संशोधनातूनच झालेल्या आहेत. सर्व क्षेत्रात संशोधनास अनन्य साधारण असे महत्व आहे. भिकाऱ्यांच्या प्रश्नाबाबत संशोधनास खूप वाव आहे. या बाबतीत संशोधन जवळ जवळ झालेले नाही म्हटले तरी चालेल. संशोधनाचे शास्त्र आहे व त्याच्या पद्धती ठरलेल्या आहेत. या पद्धतीच्या साह्याने अनेक गोष्टींचा अभ्यास घेऊन त्यातूनच नवीन मार्ग दिसू लागतो. या नव्या मार्गामुळे प्रशा-सनाच्याही पद्धतीत बदल घडवून आणावा लागतो. अशा प्रकारे संशोधन व प्रशासन हे एकमेकात गुंतलेले विषय अतिशय महत्वाचे आहेत.

# प्रकरण दहावे

## न्यायालय व भिकारी

मुंबई भिक्षा प्रतिबंधन कायदा १९५९ किंवा त्यापूर्वीचा मुंबई भिक्षेकरी कायदा १९४५ हे दोन्ही सामाजिक कायदे आहेत. १९४५ सालचा मुंबई भिक्षेकरी कायदा रद्बातल झाल्यानंतर, मुंबई भिक्षा प्रतिबंधन कायदा १९५९ हा अस्तित्वात आला व लागू झाला आहे.

भारत स्वतंत्र झाल्यानंतर आपण देशाकरिता घटना तयार केली आहे. तिला अनुसरून प्रत्येक प्रौढ इसमास अनेक हक्क आहेत. तेव्हा एका दृष्टीने त्याला भीक मागण्याची सुद्धा मोकळीक आहे. पण समाजाच्या धारणेच्या दृष्टीने त्या स्वतंत्र व्यक्तिच्या जीवनाच्या दृष्टीने, अभिवृद्धीच्या दृष्टीने तसेच देशाच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने हा कायदा संमत केला आहे. ज्या ठिकाणी हा कायदा लावण्यात येतो तेथे भीक मागणे हा गुन्हा ठरतो व अशा इसमास अटक करता येते. अशा इसमाला अटक केल्यापासून २४ तासात योग्य अशा कोर्टासमोर आणावे लागते. पण या मुदतीमध्ये त्याला इतर गुन्हेगारापासून वेगळे पण योग्य अशा ठिकाणी ठेवण्यात येते.

या कायद्याचा मुख्य उद्देश, अशा भिकाऱ्यांना भीक मागण्यापासून परावृत्त करण्याचा व त्याला सर्वसाधारण उपयुक्त नागरिक बनविण्याचा आहे. गोडीगुलाबीने हे काम होण्यासारखे नाही. म्हणूनच त्याला कायद्याचा आधार देण्यात आला आहे. त्याचा हेतू समाजातील विकृती दूर करण्याचा व समाजसुधारण्याचा आहे. म्हणजेच या कायद्याचे मूळ स्वरुप शिक्षा करण्याचे नसून व्यक्तीमध्ये सुधारणा घडवून आणण्याचे आहे. 'इंडियन पीनल कोड' किंवा इतर कायद्यांचा हेतू ज्या माणसाकडून गुन्हा घडला आहे त्याला शिक्षा करून एक प्रकारची दहशत निर्माण करण्याचा आहे. समाजामध्ये शांतता नांदावी व व्यवहार सुरळीत चालावेत म्हणून इतर कायदे केले आहेत, पण हा कायदा व्यक्तीमध्ये सामाजिक कारणामुळे जी विकृती निर्माण झाली आहे ती दूर करणारा प्रतिबंधात्मक स्वरुपाचा आहे. म्हणूनच त्यात कमीत कमी बंधने व नियम अंतर्भूत केले आहेत. या नियमात सुध्दा आणखी सैलपणा आणावा किंवा कसे याचा विचार समाज योग्य वेळी करील. हा

कायदा राबवीत असताना व्यक्तीची सुधारणा ही गोष्ट सर्वांत महत्वाची मानली पाहिजे व इतर गोष्टी त्या मानाने गौण ठरविल्या पाहिजेत.

कोर्टापुढे भिकारी धरून आणण्याचे काम मुख्यतः पोलिसांनीच करावयाचे आहे. 'कोणताही पोलिस अधिकारी' असा शब्द प्रयोग कायद्यात केलेला आहे. कोणताही पोलीस अधिकारी म्हणजे कोणताही पोलीस. शिपायापासून तो अधिकाऱ्यापर्यंत कोणीही पोलीस अधिकारीच समजण्यात येतो. याशिवाय नियमाच्या पुस्तकाप्रमाणे प्रत्येक स्वीकार केंद्राच्या अधीक्षकास व प्रमाणित संस्थेच्या अधीक्षकास भिकारी पकडण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत.

कोणत्या कोर्टास भिक्षेकऱ्याच्या प्रकरणाची चौकशी करता येईल याबद्दल या कायद्याचे कलम नं. ३ मध्ये माहिती दिली आहे. कोणत्याही पहिल्या वर्गाचे अधिकार असलेल्या कोर्टास व त्यावरील कोर्टास ही प्रकरणें मूळ स्वरूपात किंवा अपीलामध्यें चालविता येतील.

कलम २ मध्ये भिकारी कोणास म्हणावे हे बारकाईने सांगितले आहे. त्याचप्रमाणे भिकारी कोणास म्हणू नये हेहि त्याच कलमाच्या उत्तरार्धात दिले आहे.

मुंबई भिक्षा प्रतिबंधक कायद्याच्या कलम ४ ( १ ) प्रमाणे भिकाऱ्यांना पकडता येते. व कलम ५(२) प्रमाणे रिमांड वॉरंट देता येते. आदान केंद्राच्या अधिकाऱ्यास या संशयित भिकाऱ्यास कच्च्या कैदेत ठेऊन घेण्याच्या व दिलेल्या तारखेस पुन्हा कोर्टात हजर ठेवण्याच्या आशेला रिमांड वॉरंट असे म्हणतात. इतर गुन्हेगारांना त्यांच्या बाबतीत कोर्टात प्रकरण चालू असताना व पोलीस चौकशीच्या वेळी असेच रिमांड वॉरंट देण्यात येते व कच्च्या कैदेत ठेवण्यात येते. आरोपित भिकाऱ्यांना आदान केंद्रात अशा तऱ्हेने कच्च्या कैदेत ठेवण्यात येते. या कच्च्या कैदेची मुदत ७ ते १४ दिवसाची असते. शहरातील भिक्षेकऱ्यांच्या प्रकरणांची चौकशी करण्याचे काम एका किंवा अनेक कोर्टांना देण्यात येते.

कोर्टाने या प्रकरणांची चौकशी कशी करावी याबद्दल आदेश या कायद्यात कलम ७ प्रमाणे दिला आहे. या कलमामध्ये असे सांगण्यात आले आहे की ही प्रकरणे 'समरी' पद्धतीने चालवावीत, 'समन्स' पद्धतीने चालवू नयेत. याला अपवाद म्हणून कलम नं. ११ हे राहील. जे लोक इतरांना भीक मागावयास लावून त्यावर स्वतःचा उदरनिर्वाह चालवितात त्यांना शिक्षा करण्याचे हे कलम आहे.

'समन्स' पद्धतीप्रमाणे कोर्टापुढे आलेल्या प्रत्येक साक्षिदाराचे व आरोपीचे म्हणणे प्रश्नोत्तर पद्धतीने उतरून घेण्यात येते. या पद्धतीप्रमाणे चौकशी करण्यास बराच वेळ

लागतो. या उलट 'समरी' पद्धतीप्रमाणे गुन्हेगाराचे किंवा साक्षिदाराचे म्हणणे कोर्टाने ऐकून घेऊन त्यावर आपला निर्णय लिहावयाचा असतो. या पद्धतीप्रमाणे आरोपीचे म्हणणे काय आहे हे नीट समजू शकते. यामुळे कोर्टात नेहमी चालणारी शाब्दिक झटापट होत नाही.

हा सामाजिक कायदा माणसाच्या मूलभूत सुधारणेसाठी असल्यामुळे शब्दाला महत्व कमी असून सत्य भावनेस व परिस्थितीस अधिक महत्व आहे. या दृष्टीने 'समरी' पद्धत अधिक श्रेयस्कर आहे. या कायद्याचे कलम नं. ५ ( १ ) मध्ये प्रथम गुन्हेगारांची चौकशी 'समरी' पद्धतीने करावी असा आदेश देण्यात आला आहे. कलम नं. ५ ( २ ) प्रमाणे कच्च्या कैदेची मुदत वाढवता येते; ५ ( ३ ) प्रमाणे भिकारी नाही अशा इसमास सोडून देता येते; ५ ( ४ ) प्रमाणे एखादा इसम भिकारी आहे असे दिसून आल्यास तशी नोंद कोर्टाला घ्यावी लागते; व कलम ५ ( ५ ) प्रमाणे भिकारी असलेल्या इसमास प्रमाणित संस्थेत कमीत कमी एक वर्षापासून तीन वर्षे पर्यंत स्थानबद्ध करता येते. इतर कायद्याखाली जेव्हा कोर्ट माणसाला शिक्षा देते तेव्हा त्याला तुरुंगात रहाण्याची सजा दिली आहे असे म्हणते. परंतु या कायद्याखाली प्रथमच सापडलेल्या व भिकारी आहे असे सिद्ध झालेल्या इसमास प्रमाणित संस्थेत बंदिस्त करण्याचा हुकूम देते व यावरून दिसून येते की ही शिक्षा नाही.

याच ५ (५) कलमाच्या पुढच्या भागात भिकारी म्हणून सिद्ध झालेला इसम पुन्हा भीक मागणार नाही असे कोर्टाचे मत झाल्यास कोर्ट त्याला ताकीद देऊन सोडून देऊ शकते. त्याचा स्वतःचा किंवा नातलगाचा किंवा योग्य इसमाचा जात मुचलका घेऊन सोडून देते.

या बाबतीत प्रकरणाची चौकशी करताना कोर्टाने खालील गोष्टी विचारात घ्यावयास हव्यात असेही या कायद्यात सांगण्यात आले आहे.

१) भिकाऱ्याची वर्तणूक व वय.

२) तो कोणत्या परिस्थितीत रहात होता. आणि

३) प्रोबेशन ऑफिसरचा रिपोर्ट.

प्रोबेशन ऑफिसरचा रिपोर्ट गुप्त मानण्यात येईल, परंतु जरूर वाटल्यास कोर्ट त्यांतल्या काही भागाबद्दलची माहिती भिकाऱ्याला किंवा त्याच्या पालकाला सांगेल व या बाबतीत योग्य तो पुरावा सादर करावयास सवलत देईल.

लहान मुलांच्या केसेस ज्युव्हेनाईल कोर्टापुढे पाठवण्याची व भिकाऱ्यांच्या पालकाकडून खर्च घेण्याची तरतूदही कायद्यात केली आहे. त्याचप्रमाणे भिकाऱ्यावर संपूर्णपणे अवलंबून असणाऱ्या इसमाला सुद्धा ताब्यात घेऊन प्रमाणित संस्थेत ठेवण्याचा अधिकार कोर्टास आहे. या अधिकाराचा फार थोडा उपयोग करण्यात येतो, पण या प्रकारच्या कार्याची अधिक जरूर आहे.

ज्या इसमास याच गुन्ह्याखाली पुन्हा पकडण्यात येते त्याला अधिक दिवस बंदिस्त करता येते. ही मुदत १० वर्षे पर्यंत आहे व त्यापैकी २ वर्षे कैदेची शिक्षा सुद्धा देता येते. दोन किंवा अधिक वेळा सापडलेल्या इसमास ठेऊन घेताना ती शिक्षा समजली जाते.

दुसऱ्याला भीक मागावयास लावून त्यावर उदरनिर्वाह चालविणे किंवा भिक्षा मागण्याचा पुन्हा पुन्हा गुन्हा करणे हे कलम ११ व ६ मध्ये दिलेले गुन्हे दखलपात्र गुन्हे समजण्यात आलेले आहेत. म्हणजेच हे गुन्हे किरकोळ स्वरूपाचे मानण्यात येत नाहीत. या ठिकाणीच या कायद्यात शिक्षेचे स्वरूप दिसून येते. दुसऱ्यास भीक मागावयास लावण्याच्या गुन्ह्यास एक ते तीन वर्षांची कारावासाची शिक्षा देण्यात येते.

**ऑनररी मॅजिस्ट्रेटस्** – सदरहू कायदा सामाजिक स्वरूपाचा असल्यामुळे तो सर्वसामान्य कायद्याप्रमाणे अमलात आणावयाचा की काय हा प्रश्न आहे. मुंबई मुलांचा १९४८ हा कायदा भारतातील सामाजिक कायद्यापैकी एक महत्वाचा कायदा मानण्यात येतो. मुलांच्या प्रकरणांची चौकशी ज्युव्हेनाईल कोर्ट करते हे कोर्ट एक ज्यूडिशिअल मॅजिस्ट्रेट व दोन ऑनररी किंवा मानसेवी मॅजिस्ट्रेटस् मिळून बनते, यामुळे या कोर्टाचे वातावरण अगदी वेगळे असते.

नेहमीच्या कोर्टाच्या पद्धतीप्रमाणे येथे गुन्हा तोलून मापून पहाण्याचे काम होत नाही, तर गुन्ह्यापेक्षा गुन्हेगाराकडे अधिक लक्ष दिले जाते. त्याची खोलवर चौकशी केली जाते. या प्रकारच्या कोर्टामुळे न्याय तर मिळतोच, पण कायद्याचा मुलाला सुधारण्याचा मूलभूत हेतू अधिक सांभाळला जातो.

भिक्षाप्रतिबंधक कायद्यात अशी सुधारणा होणे, कायद्याच्या हेतूकडे पहाता अधिक जरूर आहे असे वाटते. गुन्हेगारांच्या प्रकरणांची चौकशी करताना कोर्टांना फारसा वेळ मिळत नाही. त्यामुळे या किरकोळ केसेस समजून झपाट्याने दिलेल्या निकालात एकतर अन्याय होण्याची शक्यता असते, नाहीतर अतिशय दयाळू बुद्धीमुळे बहुतेकांना सोडून दिले जाते.

हे दोन्ही प्रकार न्यायाच्या दृष्टीने व व्यक्तीच्या सुधारणेच्या दृष्टीने अनिष्ट आहेत. शक्य असेल तर स्वीकार केंद्रात ज्युव्हेनाईल कोर्टाच्या धर्तीची किंवा मानसेवी न्यायाधिशांनी चालविलेली कोर्टे असावीत. ज्युव्हेनाईल कोर्टासमोर पुष्कळवेळा गंभीर गुन्हे करून मुले येतात. व त्यात इतर कायद्यांचे ज्ञान असलेल्या न्यायाधीशांची जरूर असते. या कायद्याखाली आलेला माणूस हा भिकारीच असतो. याला अपवाद म्हणून कलम ११ खालील खटले नेहमीच्या कोर्टात चालतात. या संबंध कायद्यात कलम ११ मध्येच मुख्यतः शिक्षा देण्याचे कलम आहे. आपल्या उदरनिर्वाहासाठी इतरांना भीक मागावयास लावण्याच्या गुन्ह्यास या कलमाखाली ३ वर्षेपर्यंत कारावासाची शिक्षा ठेवली आहे. या कलमाखालील खटले नेहमीच्या कोर्टासमोर चालावेत पण इतर सर्व खटले एखाद्या सामाजिक समितीने किंवा मानसेवी न्यायाधीशांनी व ते सुद्धा एकापेक्षा अधिक न्यायाधीशांच्या बेंच कोर्टाने चालवावेत. या प्रकारच्या यंत्रणेमुळे न्याय अधिक चांगला मिळेल व शिक्षा देण्याचे कार्य करणाऱ्या कोर्टावरील कामाचा भार कमी होईल.

**वकिलांची उपस्थिती** – या कोर्टात सुद्धा योग्य कारणाशिवाय वकिलांची जरूरी नसावी अशी सूचना आहे. जामीन स्वीकारण्याचा अधिकार स्वीकार केंद्राच्या अधीक्षकास दिला तर बऱ्याच अडचणी दूर होतील असे वाटते, किंवा उपरिनिर्दिष्ट मानसेवी न्यायाधिशांच्याकडेच हे काम ठेवल्यास कामात सुरळीतपणा पण येईल. या कायद्याखाली येणाऱ्या बहुतेक खटल्यामध्ये वकिलांची जरूरच लागत नाही पण जेथे जरूर असेल तेथे कोर्टाने परवानगी द्यावी. जी सोय आज रोजी मुंबई मुलांचा कायदा १९४८ मध्ये आहे तीच सोय याही कायद्यात आणता आल्यास चांगले वातावरण निर्माण होईल असे वाटते.

# प्रकरण अकरावे

## प्रमाणित संस्था

सरकारी कामकाजात बदल्या इतक्या असतात कीं ठराविक मुदतीत बदल्या झाल्या नाहीत तर चुकल्या चुकल्या सारखे होते. सरकारी कचेऱ्यात जशा बदल्या असतात तशा त्या खाजगी क्षेत्रातही असतातच. पण सरकारी क्षेत्रात व त्यातल्या त्यात काही क्षेत्रात तर निसर्गनियमाप्रमाणे बदल्या होतात. जेलमधील नोकर वर्गाच्या बदल्या होतात. तशीच तेथील कैद्यांची सुद्धा अदलाबदल चालू असते. अर्थात कोणतीही बदली ही कांही विशिष्ट कारणाकरिताच करण्यात येते. याच नियमाप्रमाणे आदान केंद्रात स्थानबद्ध झालेल्या भिकाऱ्यांच्या बदल्या प्रमाणित संस्थात करण्यात येतात. मुंबईत भीक मागण्यास प्रतिबंध करण्याबाबत अधिनियमन १९५९ कलम १२ प्रमाणे आदान केंद्रे स्थापन झालेली आहेत. या आदान केंद्रात नवीन भिकाऱ्यांना पकडून आणण्यात येते. कोर्ट कांही लोकांना जामीनावर किंवा निर्दोष सोडून देते. पण ज्या लोकांना स्थानबद्धतेचा हुकूम देण्यात येतो त्यांना दुसऱ्या प्रमाणित संस्थेत पाठवल्याशिवाय आदान-केंद्रात नव्या लोकांना ठेवायला जागाच रहाणार नाही, व म्हणूनच आदानकेंद्रातून वरचे-वर भिक्षेकऱ्यांना बदली करून इतर प्रमाणित संस्थेत पाठवतात. सध्या महाराष्ट्रात २६ प्रमाणित संस्था व दोन आदानकेंद्रे आहेत. त्यांची माहिती परिशिष्ट नं. 'अ' मध्ये दिली आहे.

यातील प्रत्येक संस्थेचे काहीतरी वैशिष्ट्य आहे. काही ठिकाणी शेती आहे, तर काही ठिकाणी बाहेर शेतमजुरी करण्याची किंवा इतर मजुरी करण्याची कामे आहेत. काही प्रमाणित संस्थात सुतार काम, विणकाम, किंवा इतर उद्योग आहेत. काही प्रमाणित संस्था अपंग व वृद्धांचा प्रतिपाळ करतात. कांही संस्थात अंधांची सोय आहे.

कोणत्याही गुन्हेगाराला शिक्षा देताना त्याला कोणत्या तुरुंगात ठेवावे याबद्दल कोर्ट आदेश देत नाही. पण या कायद्याप्रमाणे कोर्टाला तसा आदेश देता येतो. पुष्कळवेळा त्या संस्थेत जागा नसते. मग त्याने कोठे रहावे अशी अडचण निर्माण होते. असे

प्रसंग टाळता यावेत म्हणून आदान केंद्रात त्यांने विशिष्ट मुदतीत रहावे अशी आज्ञा कोर्ट देते किंवा असा आदेश कोर्टाकडून प्रोबेशन ऑफिसर मिळवितात.

आदान केंद्र हे मागे वर्णन केल्याप्रमाणे वर्गवारी केंद्र आहे. या ठिकाणी येणाऱ्या भिकाऱ्यांना कोठे पाठवावे म्हणजे त्यांना योग्य तऱ्हेची सोय उपलब्ध होईल हे आदान केंद्रात ठरविले जाते व त्याप्रमाणे त्यांना पाठविले जाते. हा बदली करण्याचा अधिकार सदरहू कायद्याप्रमाणे फक्त मुख्य निरीक्षक, प्रमाणित संस्था यांनाच आहे. मुख्य निरीक्षकांची नियुक्ती या कायद्याच्या कलम १७ प्रमाणे होते. त्याच प्रमाणे निरीक्षक, सहाय्यक निरीक्षक व परिवीक्षा अधिकारी [ प्रोबेशन ऑफिसर ] यांच्या नेमणुका सुद्धा याच कलमाप्रमाणे होतात. मुख्य निरीक्षक हे या कायद्याखालील महाराष्ट्र राज्याचे मुख्य चालक म्हणून नियुक्त झालेले असतात. या कायद्याखालील महत्त्वाचे अधिकार त्यांना देण्यात आलेले आहेत. भिक्षेकऱ्यांची दुसऱ्या योग्य अशा संस्थेत बदली करण्याचा अधिकार त्यांना देण्यात आलेला आहे.

आदान केंद्राचे अधीक्षक हे भिक्षेकऱ्यांचे वर्गीकरण करतात, व त्यांना योग्य अशा संस्थात पाठवून देतात, असे करताना जे पत्र प्रमाणित संस्थाप्रमुखांना लिहिले जाते त्याची एक प्रत मुख्य निरीक्षकांना पाठवण्यात येते व या पत्रानुसार अधीक्षकांनी केलेली बदली ही कायम करण्यात येते. भिक्षेकऱ्यांच्या बदल्या फक्त आदान केंद्रातून प्रमाणित संस्थातच होतात असे नाही. त्याच्या बदल्या एका प्रमाणित संस्थेतून दुसऱ्या प्रमाणित संस्थेमध्ये सुद्धा होऊ शकतात. अर्थात अशा बदलीला विशेष कारण असावे लागते. आजारीपणामुळे, पुनर्वसनाच्या दृष्टीने, एकादा उद्योग-धंदा शिकण्याचे दृष्टीने किंवा एकादे व्यंग ( शारीरीक अथवा मानसिक ) दिसून आल्यास ही बदली होत असते. अशी बदली करण्यापूर्वी सर्वसाधारण परिस्थितीमध्ये मुख्य निरीक्षकांचा निर्णय आधी घ्यावा लागतो.

आदान केंद्रातून बदली हा एक महत्त्वाचा प्रसंग असतो. वैद्यकीय अधिकारी या सर्व भिक्षेकऱ्यांची प्रकृती ठीक आहे किंवा नाही याची खात्री करून घेतात. वैद्यकीय पत्रावर "आज प्रवासास योग्य" असा शेरा मारतात. भिक्षेकऱ्याला पकडल्यावेळी त्याच्या अंगावर असलेले बऱ्यापैकी कपडे असतील ते पुन्हा त्यांना घालण्यात येतात. ज्यांच्या जवळ असे कपडे नाहीत त्यांना अर्थातच संस्थेचा गणवेश देण्यात येतो. ज्यांच्याजवळ अटक करताना जे पैसे सापडलेले असतात त्यांची नोंद त्यांच्या बदलीच्या पत्रांत करून ते पैसे त्या प्रमाणित संस्थेकडे पाठविण्यांत येतात. त्याच प्रमाणे त्याच्या सर्व मौल्यवान

वस्तूही पाठविण्यात येतात. आदान केंद्राचे अधीक्षक आगगाडीने प्रवास करण्याकरिता वॉरंट देतात. त्यामुळे प्रत्यक्ष रोख पैसे खर्च न करता लोकांची मोठ्या प्रमाणावर नेआण करता येते. पोलीस पथक बोलाविण्यात येते व त्यांच्या स्वाधीन करून या भिक्षेकऱ्यांना दुसऱ्या संस्थेत पाठविले जाते. काही वेळेस केंद्राच्या किंवा प्रमाणित संस्थांच्या राखणदारांनासुद्धा असे पाठविता येते. पोलिसांचे पथक बोलावणे, भिक्षेकऱ्यांचे कपडे बदलणे, व्यक्तिचिकित्सकांनीं बनविलेल्या त्यांच्या पुस्तिका तपासून पहाणे व त्यातील स्थानबद्धतेचे अनुज्ञापत्रक व वैद्यकीय पत्रक आदि व्यवस्थित आहेत किंवा नाहीत हे पहाणे, तसेच प्रत्येकास त्याच्या मौल्यवान वस्तू मिळून त्याबद्दल त्याची स्वाक्षरी घेतली किंवा नाही हे पहाणे, या गोष्टी निरनिराळ्या लोकांना बारकाईने कराव्या लागतात. यामुळे सर्व कर्मचाऱ्यांची एकच धमाल उडून जाते. पोलिसपथकाने त्या सर्वांना सामानासह व कागदपत्रासह त्यांच्या ताब्यात घेतले की कर्मचारी व अधिक्षक हे सारेच एक सुटकेचा निश्वास टाकतात.

म. रा. स्था. सं. मं. ग्रंथालय
स्था/११०
७
ग्रंथालय.

# प्रकरण बारावे

## प्रमाणित संस्थेतील व्यक्तिकार्य व पुनर्वसन

ज्या प्रमाणे आदान केंद्र हे या भिक्षा प्रतिबंधक कायद्याच्या कलम १२ प्रमाणे प्रस्थापित झाले आहे. तसेच कलम १३ प्रमाणे प्रमाणित संस्था प्रस्थापित झालेल्या आहेत. मागील प्रकरणात सांगितल्याप्रमाणे शासकीय व खाजगी अशा एकूण २५ संस्थाना प्रमाणित म्हणून शासनाने, कलम १३ प्रमाणे मान्यता दिली आहे. सुदृढ, अपंग, अंध, मनोदुर्बल, वृद्ध, क्षयी व महारोगी अशा वेगवेगळ्या प्रकारच्या भिक्षेकऱ्या-करिता या प्रमाणित संस्था आहेत. शरीराने व मनाने धडधाकट असेच लोक मुख्यतः निरनिराळे उद्योगधंदे करू शकतात. इतरांना हलकी व सोपी कामे देतात.

प्रमाणित संस्था चालविण्यामागे पुनर्वसन हा जरी मुख्य हेतू असला तरीसुद्धा या संस्था सामाजिक संस्था म्हणून स्थापन झालेल्या आहेत. यातील फक्त २६ संस्था प्रमाणित आहेत. (शासकीय व खाजगी) व दोन संस्था स्वीकार केंद्रे आहेत. या २६ प्रमाणित संस्था-तील १४ संस्था खाजगी आहेत, ९ सरकारी आहेत व ३ मेंटल हॉस्पिटलस् आहेत. वेड्या भिकाऱ्यांना ठेवण्याच्या दृष्टीने महाराष्ट्रातील तीन वेड्यांचे दवाखाने हे प्रमाणित म्हणून ठरविण्यात आलेले आहेत. खाजगी संस्था समाजसेवेचा हेतू पुढे ठेवूनच जनतेने निर्माण केलेल्या आहेत व म्हणूनच त्यांच्यामागे जनतेतील समाजसेवकांची तळमळ आहे.

सामाजिक संस्था कशा निर्माण झाल्या हा प्रश्न फार महत्वाचा आहे. व या दृष्टीने विचार केला म्हणजेच सामाजिक संस्था कशा असाव्यात हे समजते. सरकारी संस्था या नियमास अपवाद नाहीत.

मागील एका प्रकरणात भारतातील सध्याची सामाजिक स्थिती कशी आहे व कशा-प्रकारे बदलत आहे याकडे वाचकांचे लक्ष वेधले आहे. पूर्वी आपल्या समाजात जीवन फार संथ होते. शेकडो वर्षे ते जवळ जवळ तसेच होते. त्या सामाजिक जीवनात फारसा फरक झालेला नव्हता. भारतात यंत्रयुग व स्वातंत्र्य आल्यापासून त्या जीवनात एक प्रकारचे चैतन्य निर्माण झाले आहे. व्यापारीवृत्ती अधिक निर्माण झाली आहे. यंत्रसज्ज कारखाने निर्माण झाले आहेत व माणूस त्यात एका यांत्रिक भागासारखा काम करु लागला

आहे. वेगवान वाहने भारतातही आली आहेत. वेळ मौल्यवान झाला आहे. राहण्याला जागा नाही, अशी स्थिती झाली आहे. पैशाची चणचण फार. कोणालाच पैसा पुरत नाही. ज्यांना पोटभर खायला मिळत नाही अशा कुटुंबांचीच संख्या भारतात अधिक आहे. विशेषतः खालच्या व मध्यम वर्गांतील कुटुंबांची ही स्थिती झाली आहे. फार दिवसांचे आजारी, वृद्ध, अपंग, अंध, मूकबधिर, कुष्ठरोगी, क्षयरोगी व आळशी या साऱ्यांना कुटुंबात प्रेमाचे स्थान नाहिसे झाले आहे. अपराधी व पतिता यांची सुद्धा हीच स्थिती झाली आहे. ज्यांना आज कुटुंबात स्थान आहे अशी वरील यादीतील फारच थोडी मंडळी आहेत. मग ही सारी मंडळी काय करतात. कुणी दवाखाने, कुणी कुष्ठरोगाच्या संस्था, कोणी क्षयरोगाचे दवाखाने, कुणी मोठे दवाखाने, अशा ठिकाणीं तर कोणी इतरत्र मिळणारे हलके फुलके काम करून किंवा अखेरीस भीक मागून आपला चरितार्थ चालवितात. थोड-क्यात असे म्हणता येईल की ज्यांना कुटुंबातील ऊब व निवारा मिळत नाही ते बाहेर पडून भटकत आहेत व अखेरीस निराशेने निरनिराळ्या प्रकाराने भीक मागून आपले पोट जाळीत आहेत.

याचाच अर्थ असा की अशा लोकांसाठी ज्या संस्था काढल्या आहेत त्या संस्थांनी घराची उणीव भरून काढली पाहिजे. भिक्षेकरी गृह किंवा प्रमाणित संस्था तिथे येणाऱ्यांना घरासारख्या वाटल्या पाहिजेत. म्हणजे प्रथम आपण घरात काय सोय असते ते पाहू.

घर हा निवारा आहे. आसरा आहे घराला बाजूने अडोसा व वरून छप्पर असल्या-मुळे ऊन, थंडी, पाऊस व वारा या नैसर्गिक त्रासापासूनच नव्हे तर इतर वन्यपशूप्राणी व कीटक या पासून घरात संरक्षण मिळते. हवा तेव्हा सूर्यप्रकाश, वारा, थंडी व ऊन घ्यावे पण नको तेव्हा दरवाजे बंद करून साऱ्या जगापासून कोंडून घ्यावे ही सोय घरात आहे.

घरात ताजे अन्न आहे. जे काही थोडे फार मिळते, ते ताजे व स्वच्छ असते. घरात अंथरूण व पांघरूण पण मिळते. ऐपतीप्रमाणे ते कमी अधिक चांगले असते. औषधोपचार घरात मिळतो. प्रकृती बिघडली की डॉक्टर किंवा वडिलधारी माणसे औषध देतात. कपडा-लत्ता मिळतो. शक्य असेल तर पायात घालायला चप्पल किंवा बूट मिळतो. अशा तऱ्हेने घरामध्यें अन्न, वस्त्र, आसरा, निवारा व वैद्यकीय मदत मिळते. व यामुळे शरिराची जपणूक घरात होते.

या शिवाय घरात आणखी एक गोष्ट मिळते व ती म्हणजे कोणी तरी प्रकृतीची किंवा परिस्थितीची विचारपूस करतात, कोणी प्रेमाने अंगावरून हात फिरवून धीर देतात. कोणी संकटाच्या काळी मार्गदर्शन करतात. कोणी नवे ज्ञान देतात. अशा तऱ्हेने कुटुंबात

बुध्दीची व भावनेची भूक भागते. या शिवाय कुटुंबातील वडीलधारी माणसे लहानाचे चुकत असेल तर त्याने तसे करू नये म्हणून परोपरीने सांगत असतात. घरात एकमेकात प्रेम असते, थोडी असूया असते, राग असतो. पण या सर्वात मोठी उपकारक भावना जर कोणती असेल तर ती म्हणजे प्रेम. इतर सर्व त्रासदायक भावनांवर पांघरूण घालून त्यांचा उद्रेक थांबविणारी ही महत्वाची भावना कुटुंबाच्या चार भिंतीत सदैव असते. प्रेम व सुरक्षितता या भावना जोपर्यंत तेथे आहेत तोपर्यंतच ते कुटुंब या नावास योग्य असे ठिकाण आहे. नाही तर त्याला खाणावळीचे किंवा धर्मशाळेचे स्वरूप येते.

घराचे हे चित्र मी मुद्दामच आपणापुढे ठेवले आहे. आपल्या प्रमाणित संस्था किंवा सार्वजनिक संस्था माणसाच्या या गरजा जितक्या प्रमाणात पूर्ण करू शकतील तितक्या त्या उत्तम संस्था मानावयास हव्यात. कुटुंबाची जागा पूर्णपणे घेणाऱ्या संस्था असू शकणार नाहीत, पण संस्था चालकांचा यत्न त्या दृष्टीने असावयास हवा.

प्रमाणित संस्थात ताजे अन्न, निवाऱ्याची जागा, अंथरुण, पांघरुण, कपडे, वैद्यकीय मदत या सर्व गोष्टी असतातच, पण याशिवाय तेथे परिवीक्षा अधिकारी किंवा व्यक्तिकार्यकर्ते असतात व त्यांनी या अतिथींची भावनिक भूक भागवावयाची असते. हे भिक्षेकरी सर्व साधारण माणसाप्रमाणे न वागता ज्याअर्थी स्वाभिमान व लज्जा सोडून भीक मागतात व ज्याअर्थी त्यांना कुटुंबात स्थान नाही त्याअर्थी त्यांच्या ठिकाणी कांही तरी अडचण आहे हे नक्की. ही अडचण पूर्णपणे किंवा कांही अंशाने तरी व्यक्तिकार्यकर्त्याला समजली पाहिजे व त्याने त्या व्यक्तीच्या जीवनात आधार निर्माण केला पाहिजे. कुटुंबातील वडील भावाची किंवा कुटुंबातील शहाण्या माणसाची जबाबदारी व्यक्तीकार्यकर्त्याला घ्यावी लागते. अशा तऱ्हेने कुटुंबात जे कांही असते ते शक्य तेवढे संस्थेत मिळेल असा प्रयत्न करण्यात येतो. अधीक्षकाचे हेच काम आहे. या मोठ्या कुटुंबात शांतता व सौख्य नांदावे याची जबाबदारी त्यांच्यावर असते. भिक्षेकरी असो नाहीतर कर्मचारी असो या सर्वांनी योग्य मार्गाने जावे हे चालकाचे किंवा घरातील मुख्य माणसाचे काम अधीक्षक करीत असतात. ही मोठाली प्रतिकुटुंबे अशा तऱ्हेने चालविली जातात.

समाजातून फुटून निघालेले व कुटुंबाना नकोसे झालेले हे लोक आदान केंद्रातून प्रमाणित संस्थांत येतात. तेथे त्यांच्या जीवनाचा अभ्यास केला जातो. त्यांच्या गत आयुष्यातील सुखदुखांचा चित्रपट व्यक्तिकार्यकर्त्यांच्या डोळ्यांपुढे येतो. कोणत्या परिस्थितीमुळे काय अडचण निर्माण झाली हे त्याला समजते. व्यक्तीचा स्वभाव, त्यावर झालेले आघात, त्याची सद्यःस्थिती व त्याच्या भोवतालचा समाज याचा अभ्यास करून व्यक्तिकार्यकर्ता

तिच्या कल्पनांचा आधार घेऊन तिला स्वतःच्या अडचणीतून बाहेर निघण्याचा मार्ग शोधून काढण्यास मदत करतो. असा मार्ग सापडला की मग तो तिला त्या मार्गाचे निर्धारपूर्वक आयोजन व पालन करावयास लावतो. या प्रयत्नांना पुष्कळवेळा चांगली फळे येतात. सुधारलेले हे लोक पुन्हा भेटले तर केवढा आनंद होतो, पण हे सुधारण्याचे काम वाटते तेवढे सोपे व थोड्या वेळात होणारे नाही.

मुलांच्या संस्थांमध्ये कोवळ्या मनाची मुले असतात. प्रेमाचा ओलावा लाभला की त्यांची मने बहरून जातात. सुगंधाने दरवळून जातात. त्यांच्या स्वभावात झालेली विकृती बदलू लागते. समाज विघातक कृत्याकडील कल बदलू लागतो. अशा मुलांचे जवळचे नातलग त्याला कंटाळलेले असले तरी त्यांच्या प्रेमाला अवाहन करून आटलेल्या झऱ्या-तही पुन्हा जिवंत जळ लागण्याची शक्यता असते. कारण कुटुंब किंवा समाज त्याला फार कंटाळलेला नसतो. त्या नावडतेपणालाही मर्यादा असतात. या दृष्टीने भिकाऱ्यांच्या बाबतीत या गोष्टी अगदी दुसऱ्या टोकाला गेलेल्या असतात. तो वयस्कर माणूस असतो. जीवनातील सुख दुःखे पाहून व उपभोगून त्याच्या स्वभावाचा साचा जवळ जवळ पोलादी झालेला असतो. त्यात फारच थोडा बदल होण्याची शक्यता असते. दुसरे असे की समाज व घरची माणसेसुद्धा त्याला एवढी कंटाळलेली असतात कीं त्याला पाहिल्याबरोबर त्यांचे डोके फिरते. त्यापाठीमागे त्याचा समाजाशी आलेला मोठा संघर्ष कारणीभूत असतो. या कारणामुळे समाजावर व त्याच्या स्वतःच्या मनावर असे अनिष्ट परिणाम झालेले असतात की ते सुधारणे हे सर्वसाधारण व्यक्तीकार्यकर्त्याला जमण्यासारखे नसून त्यासाठी एकाद्या प्रभावी व्यक्तीत्वाच्या हुषार कार्यकर्त्याची जरुर असते. तरीसुद्धा पुष्कळवेळा हा योग जुळून येतो व हा कोंदणातून निखळलेला खडा पुन्हा कोंदणात थोड्याफार फरकाने बसतो. असे प्रसंग थोडे असतात पण त्यातून निर्माण होणारा आनंद मन भारून टाकणारा व पुढच्या कार्यास अभूतपूर्व अशी प्रेरणा देणारा ठरतो. आपल्यासमोर दोन कथा निवेदन करतो, ऐका तर . . . .

माधव हा जळगांव जिल्ह्यातला रहाणारा. घरची अतिशय गरीबी. सर्वांत मोठा मुलगा माधवच होता. बाप कर्जबाजारीपणात व सावकाराच्या फेऱ्यात सापडलेला. माधव ७ वी पर्यंत शिकला व नशीब काढायला म्हणून मुंबईमध्ये आला. मुंबईत रहायला जागा नव्हती. घरून आणलेले पैसे संपत आले पण सुदैवाने चौपाटीवरच्या एका भेळवाल्याने त्याला नोकरी दिली. चांगली सहा महिने नोकरी केली. या सुमारास त्या भेळवाल्याच्या मदतीने माधव एका मोठ्या चाळीच्या जिन्याखाली झोपू लागला. आजूबाजूला खूप घाण होती. माधव थोड्या पैशात आपले भागवीत असे.

पोटाला चिमटा घेऊन, रहाणारे सर्व पैसे–आई–बापांना पाठवू लागला. पण या काळात त्याला नकळत अशक्तपणा येऊ लागला. त्याच्या पलीकडेच एक खोकणारा रहात असे. त्याचे शरीर पांढरेफट्ट पडलेले होते व त्याच्या हातापायांच्या काड्या झाल्या होत्या. थोड्याच दिवसांत माधवला खूप अशक्तपणा वाटू लागला व अखेरीस त्याला खूप ताप येऊ लागला. काम करणे अशक्य झाले. काम करता येत नाही असे पाहून मालकाने त्याला कामावरून काढले. यापुढे तर परिस्थिती एकदम बिघडली. पैसा नाही व आजार वाढला. कोणी मदतीला नाही. कोणीतरी जिन्याखालून त्याला रस्त्यावर आणून टाकले. माधव मरणाची वाट पहात थंडीवाऱ्यात पडून होता. पण एवढ्यांत बेगर्सस्काडच्या पोलिसांनी त्याला उचलून आदानकेंद्रात नेले. तेथे डॉक्टरांनी तपासले. माधवला क्षय झाला होता. ताबडतोब दवाखान्यात ठेऊन इंजेक्शने दिली. माधवला वाटत होते, 'काय हा त्रास, लोक सुखाने मरू सुद्धा देत नाहीत.' औषधे व उपचार यांचा परिणाम हळू हळू झाला शक्ति थोडी थोडी येऊ लागली. पण माधवने आपल्या घरचा पत्ता बरोबर दिला नाही. त्याच्या मनात भीति होती, माधव बेगर होममध्ये आहे असे घरी समजले तर सारे लोक काय म्हणतील ? त्यापेक्षा येथेच मेले तर काय हरकत ? हळू हळू त्याला बरे वाटू लागले. माधव आता प्रमाणित संस्थेत आला होता. तेथील दवाखान्यात फाटक सिस्टर काम करीत असत. सिस्टरांना त्याचा गरीब स्वभाव आवडला. त्यांनी त्याला दवाखान्यात मदतीस घेतले. वॉर्ड बॉयसारखे काम तो करू लागला. व्यक्ति कार्यकर्त्यांजवळ रात्रीचा तो इंग्रजी शिकत होता. त्यांच्याशी त्याचा बराच परिचय झाला. त्यांनी त्याला बाहेर जाऊन येण्याची परवानगी दिली. तो बाहेरची किरकोळ कामे करू लागला. एवढ्यात सिस्टरांचे लग्न झाले. त्यांचे पती डॉक्टर होते. त्यांच्याच दवाखान्यात त्याला नोकरी मिळाली. तेथे तो कंपौंडिंग शिकला. दवाखाना स्वच्छ करण्यापासून तो औषधे बनविण्यापर्यंत सर्व कामे तो करीत होता. त्याच्या छातीचे ऑपरेशनसुद्धा झाले व जेव्हा पगार मिळू लागला तेव्हा माधवने घरचा पत्ता सांगितला व व्यक्तीकार्यकर्त्यांच्या पत्त्यावरुन घरी पैसे पाठविले. सुमारे अडीच वर्षानंतर पहिल्यांदाच घरचा संबंध प्रस्थापित झाला होता. घरून पत्रे येऊ लागली. आनंद ओसंडत होता. रजा घेऊन दिवाळीसाठी माधव घरी जाऊन आला. डॉक्टरांनी घरी नेण्यासाठी माधवला काही पैसे दिले होते. माधव परत आला. किती आनंदी दिसत होता. डॉक्टरांनी अर्ज करून त्याला आपल्या ताब्यात सोडवून घेतले. त्याच्या नाजूक तब्येतीची ते योग्य काळजी घेत. माधवला कुटुंबातला ओलावा लाभला होता. . . . .

हा पहा जान. फक्त ४० वर्षांचा आहे. सडपातळ व उंच फार शिकलेला नाही, पण

तो अहमदाबादच्या एका उत्तम गिरणीमध्ये सूत काढण्याच्या विभागात काम करीत असे. अगदी बारीक १४० कौंटचे सूत तो काढीत असे. भुऱ्या रंगाचे पाणिदार डोळे आहेत त्याचे. तो पहा कसा रोखून पहात आहे आपल्याकडे. त्याच्या नजरेत काही झेप आहे असे वाटते. डोळ्यातून अंतःकरणात शिरण्याचे कसब असावे त्या नजरेत–पण...

पण जॉनला दिसत नाही. अजिबात दिसत नाही. म्हणूनच मुंबईच्या प्रमाणित संस्थेत त्याला खास उपचाराकरिता पाठविले आहे.

जॉन माझा मित्र झाला होता. त्याच्याशी एक दिवस मी बोलत होतो. आम्ही दोघेच होतो ऑफिसात. मी जॉनला विचारलं, "जॉन तुझं लग्न झालं होतं किंवा नाही ह्याबद्दल खरं काय ते सांग ना." माझ्यासमोर टेबलावर हळू हळू हात सरकावीत जॉननं माझ्या समोर त्याची फाईल आहे की काय ते चाचपून पाहिले. सुदैवाने टेबल मोकळे होते. मग थोडे मागे सरकून जॉन म्हणाला, "साब, मैने तो पहिले ही बताया है की मेरी शादी नही हुई थी, आप इसपर विश्वास नही करते क्या?" मी म्हणालो, 'नही जॉन, मै इसपर विश्वास नही कर सकता."

'क्यों नही?' जॉन म्हणाला.

'देखो जॉन, आपके बाये हाथपर लाल अक्षरोमे रूथ नाम लिखा था, लेकिन ये पहिले नाम-पर नीली शाहीसे अभी फूल और पत्ते निकाले है. इसका इतिहास मुझे बताओ. तब मै आपपर विश्वास करूंगा.'

जॉनच्या चेहऱ्यावर झालेला फरक मला दिसला पण धिटाईने जॉन म्हणाला, 'इसका मायना मेरी शादी हो गयी थी ऐसा नही है. एज्डमे लिखके लियाथा.'

'हां, तो इसपरसे मालूम होता है कीं आप पहिले नेव्हीमे काम करते थे.' मी म्हणालो.

'साब, आपसे बात करना मुष्कील है. आपसे दिलकी बात छिपाना मुष्कील है, हां मेरी शादी हुयी थी. और औरत का नाम रूथही था. लेकिन शादीके बाद एक सालमे गुजर गयी.'

'जॉन, रूथ कैसी गुजर गयी, क्या हुवाथा उसको?'

'कुछ नही, बीमारीसे मर गयी.'

"जॉन, मै नही विश्वास करता इस बातपर. गुजरी हुवी औरत का नाम कोई मिटाता नही, आप झूट बताते है."

जॉन गप्प झाला. त्या निश्चल व अवकाशात पहाणाऱ्या डोळ्यात आर्द्रता वाढली. पापण्यांची उघडझाप झाली व डोळ्यातून मोठाले थेंब ओघळून बाहेर आले. मी खुर्चीवरून उठलो. जॉनच्या जवळ गेलो. बाजूला खुर्ची घेऊन बसलो. जॉनच्या पाठीवर हात ठेवला. माझा डावा हात त्याच्या हातावर ठेवला. जॉनने डाव्या हाताने माझा हात घट्ट धरला व त्याच्या डोळ्यातून वेगाने अश्रु वाहू लागले. त्याच्या मनाचा आवेग ओसरेपर्यंत आम्ही शब्द बोललो नाही. शब्दांची जरूरच संपली होती. जॉनने आपले अंतःकरण माझ्याजवळ उघडे केले. रूथबरोबर त्याचे लग्न झाले होते. पण एक वर्षाच्या संसारानंतर ती शेजारचा त्याचा जानी दोस्त गोम्स बरोबर निघून गेली. ती परत आली नाही. रूथवर त्याचे खूप प्रेम होते. जॉनला वाटले रूथच काय पण साऱ्या जगाचाच निरोप घ्यावा. कामधाम सोडून २-३ महिने भटकला. त्यानंतर त्याची स्मृति गेली. तो थोडे दिवस कोणत्यातरी दवाखान्यात होता. त्याला डॉक्टरांनी खाटेस बांधून विजेचे धक्के दिले होते. आता त्याला बरे वाटत होते. पण दृष्टी हळू हळू गेल्यामुळे भीक मागण्याशिवाय त्याला दुसरा मार्ग उरला नव्हता. कोणाही नातलगास भेटण्याची त्याची इच्छा नव्हती. रूथ जरी पुढे आली तरी तिच्याकडे पहाण्याची त्याची इच्छा नव्हती. शिवाय त्याला ती दिसणार तरी कशी होती ? तो तर आंधळा झाला होता.

आमच्या प्रमाणित संस्थेत एक निष्णात नेत्रवैद्य आठवड्यातून एकदा येत असत. त्यांनी जॉनला तपासून व बारकाईने परिक्षा करून सांगितले की जॉनचे डोळे उत्तम आहेत. त्यात दोष नाही. यानंतर आम्ही त्याची केस एका मोठ्या दवाखान्यातील मानसचिकित्सा विभागाकडे पाठविली. त्यांनीही जॉनची बारीक चौकशी केली. "मेस्मेरिक" औषधांचा उपयोग करून त्याच्या अप्रत्यक्ष मनाचा अभ्यास केला. या औषधामुळे माणूस बेशुद्ध होतो किंवा झोपतो पण तो बोलू शकतो. यावेळी तो जे जे बोलतो त्यावर त्याच्या बाह्य मनाचा ताबा नसल्यामुळे तो अनेक वर्षापूर्वी मनात साचून राहिलेल्या गुप्त गोष्टी बोलू शकतो. त्यांच्याकडील एक मानस चिकित्सक संस्थेत आले. त्यांच्याशी मी जॉनच्या केसबद्दल बोललो. जॉनची अशी खात्री होती कीं त्याच्या डोळ्याचे ऑपरेशन झाल्याशिवाय त्याला दिसणार नाही. शेवटी आम्ही एकत्र विचाराने त्याच्यावर 'खोटीच शस्त्रक्रिया' करण्याचे ठरविले. मग आम्ही त्याला सांगितले की पुढच्या महिन्यात त्याच्या डोळ्याचे ऑपरेशन होणार आहे. ऑपरेशनचा दिवस ठरला. आदल्या दिवशी त्याला दवाखान्यात दाखल केले. दुसऱ्या दिवशी त्याला स्ट्रेचरच्या गाडीवरून ऑपरेशनच्या खोलीत नेले. त्याला पूर्णपणे भूल देण्यात आली. डोळ्यात मामुली औषधे घालून दोन्ही डोळे बांधून टाकले. आठ दिवस डोळ्याची पट्टी तशीच ठेवली. 'ऑपरेशन चांगले झाले'

असे डॉक्टर व नर्सेस यांनी त्याला सांगितले. आम्हीही त्याला जाऊन भेटलो. या मुदतीत ऑपरेशन झालेल्या रोग्यांची जी काळजी घेतात ती सर्व काळजी कसोशीने घेतली. नवव्या दिवशी त्याच्या डोळ्याची पट्टी पुन्हा ऑपरेशन थिएटरमध्ये नेऊन काढण्यात आली. टाके काढण्याचे नाटकसुद्धा झाले, व आश्चर्य झाले. जॉनला उजेड दिसू लागला. सुमारे २१ दिवसानंतर त्याच्या एका जुन्या चष्म्याची फ्रेम बदलून नवा चष्मा जॉनला दिला व या नव्या चष्म्याने जॉनला फारच चांगले दिसू लागले. जॉनला फारच आनंद वाटला व आम्हा कार्यकर्त्यांना कितीतरी अवर्णनीय आनंद झाला. आता त्याला नोकरी लावून देणे शक्य झाले होते. जॉनच्या मनावर त्याच्या कौटुंबिक जीवनाचा कितीतरी विपरित परिणाम झाला होता. रूथच काय पण जगच पाहू नये ही भावना इतकी प्रबळ झाली की या भावनेचा त्याच्या मनावर परिणाम होऊन त्या "हिस्टेमिक अंधत्व" आले होते. त्याच्या पुनर्वसनातील सर्वांत मोठी अडचण आता दूर झाली होती.

प्रमाणित संस्थेत अशा प्रकारे भीक मागणाऱ्या माणसांच्या ठिकाणी असलेले दोष जास्तीतजास्त प्रमाणात घालविण्याचा प्रयत्न केला जातो. पण जीवनाच्या खाचखळग्यांनी भरलेल्या रस्त्यावरून लांबची सफर करावयास निघालेल्या या समाज परित्यक्ताला एवढीशी शिदोरी कशी पुरणार ! ज्या कुटुंबातून तो निघाला किंवा जेथून तो बाहेर पडला तो दरवाजा बहुतेक बंद झालेला असतो. प्रमाणित संस्थेत राहून, मानसिक, भावनिक, शारीरिक, प्राकृतिक किंवा अशा कितीतरी अडचणी दूर केल्या जातात. काम करण्याची गेलेली सवय परत लावून दिली असली किंवा जीवनाकरिता एखादा नवा उद्योग जरी शिकवला तरी कुटुंबात व समाजात त्याला पुन्हा स्थान देण्याचे काम जिकिरीचे आहे. आज रोजी मुंबई भिक्षा प्रतिबंधक कायद्यात सुधारणा होणे जरूर आहे. संस्थेतून सुटलेल्या इसमाच्या पाठीशी कोणाची तरी शक्ति असणे जरूर आहे. या कार्याला 'आफ्टर केअर' असे म्हणतात. संस्थेमध्ये जे उपचार केले जातात त्या कार्याला "काळजी" असे म्हणतात. पण हे कार्य किंवा काळजी त्या व्यक्तीच्या पुढच्या जीवनाच्या दृष्टीने अपुरे असते म्हणून त्या व्यक्तीवर संस्थेतून सुटल्यावर जी देखरेख ठेवणे जरूर आहे या कार्याला "नंतरची काळजी" असे म्हणतात. ही "नंतरची काळजी" पुष्कळच व्यक्तींच्या जीवनात आत्यंतिक जरूरीची असते. व्यक्ती समाजाच्या संबंधात आल्यावर तिला मार्गदर्शन व सहाय्य करणे आवश्यक असते. त्या दृष्टीने कायद्यात सुधारणा होणे जरूर आहे.

कोर्टापुढे चौकशी झाल्यावर सोडून देताना सुध्दा कोणीतरी मदत करणारी किंवा मार्गदर्शन करणारी संस्था असणे जरूर आहे. या कार्याला "परिवीक्षा" असे म्हणतात. अडचणीत सापडलेल्या व्यक्तीला आपला मार्ग सापडत नाही. ती गांगरून गेलेली असते.

अशा वेळी त्या व्यक्तीला हळू हळू आपल्या परिस्थितीची योग्य अशी जाणीव करून देणे व त्यातून स्वतःच्या अभ्युदयाचा मार्ग त्या व्यक्तीला शोधावयास लावणे, त्या व्यक्तीच्या आड येणाऱ्या समाजातील विरोधी शक्तिंना कसे तोंड द्यावे याचे ज्ञान तिला करून देणे व सामाजिक अडचणी दूर करण्याकरिता स्वतः मध्यस्थी करणे, असे हे अवघड काम आहे. हे तत्व काही प्रमाणात संस्थेपुरते व भिकाऱ्यापुरते कायद्यात मान्य झाले आहे. पण जेव्हा त्याला कोर्ट सोडून देते किंवा संस्थेतून तो सुटून पुन्हा समाजात जातो तेव्हा त्याला मदत देण्यास स्वतंत्र यंत्रणा असण्याची जरूरी आहे. समाजाने पुढे येऊन अशा संस्था निर्माण केल्या पाहिजेत. तुरुंगातून सुटलेल्या कैद्यांना मदत करणाऱ्या व नवजीवन देण्याचे व्रत घेतलेल्या संस्था तांत्रिक दृष्टीने हे कार्यसुद्धा करू शकतील. पण हा प्रश्न पूर्णपणे हाताळण्यास स्वतंत्र अशा संस्थांची गरज आहे. हे कार्य केले नाही तर भिकाऱ्यांच्या पुनर्वसनाचे कार्य अपुरेच राहील.

# प्रकरण तेरावे

## प्रमाणित संस्थेतील नैमित्तिक कार्य

**शासकीय व खाजगी संस्था** :– प्रमाणित संस्थांचे दोन प्रकार आहेत. एक सरकारी किंवा शासकीय प्रमाणित संस्था व दुसरा खाजगी संस्थांनी चालविलेल्या व शासनाने मान्यता देऊन प्रमाणित गणलेल्या संस्था. खाजगी संस्थांना प्रमाणित संस्था म्हणून मान्यता म्हणून दिल्यानंतर त्यांना अनुदान दिले जाते. खाजगी संस्थांपैकी बहुतेक संस्था कुष्ठरोगी, वृद्ध, अपंग व अंध या लोकांच्या उपयोगाच्या आहेत. अनुदान कमीत कमी दर व्यक्तीस दररोज एक रुपया या प्रमाणात दिले जाते. क्षयरोगाचे उपचार करणाऱ्या संस्थांचे बाबतीत हे प्रमाण दरमाणसी ५–६ रुपये सुद्धा होते. कुष्ठरोगी लोकांच्यासाठी ज्या संस्था आहेत त्यांना सुद्धा दरमाणशी रोज रुपया या हिशेबाने अनुदान मिळते.

**शासकीय संस्थामधील खर्च** :– शासकीय संस्थांमधील सर्व खर्च सरकारी खजिन्यातून होतो. येथे दर माणशी दर दिवशी अन्नखर्च १९४६–४७ साली १ रु. ४ आ. ० पैसे एवढा होता. सध्या हा खर्च थोडासा वाढला आहे. शासकीय संस्थामध्ये होणाऱ्या खर्चात नोकर वर्गावर बराच खर्च होतो असा एक दावा आहे. नोकर वर्गावर जो खर्च होतो तो खर्च गैरवाजवी आहे असे नाही. संस्था चांगल्या प्रकारे सांभाळण्याकरिता नोकरवर्गाची जरूरी असते व चांगला नोकरवर्ग अधिक प्रमाणात असला तर सुधारसंस्थेतील व्यक्तीवर चांगले परिणाम होतात असे पाश्चात्य संस्थांत दिसून आले आहे. संस्था चालविण्याचे दृष्टीने पाहिले असताना संस्थामधून ठेवण्यात आलेला नोकरवर्ग बिलकूल जास्त नाही तो अगदी जरूरी पुरताच व पुष्कळवेळा जरूरीपेक्षा कमीच आहे असे दिसून येते. प्रमाणित संस्था, घराची किंवा कुटुंबाची उणीव भरून काढण्याकरिता समर्थ व्हाव्यात म्हणून संस्थामधून कुटुंबातील सर्व अडचणींची अपेक्षा केली आहे. तसेच समानता ही गोष्ट विशेष काळजीपूर्वक पाळावी लागते. सर्वांना सारख्या प्रेमाने समान कायद्याने वागावे लागते. या करिताच प्रत्येक व्यक्तीस किती प्रमाणात अन्न द्यावे व तेही कोणत्या प्रकारचे द्यावे याबद्दल सरकारी परिपत्रके आहेत. या बाबतचे अद्यावत प्रमाण अखेरीस परिशिष्ट ब मध्ये दिले आहे. अन्नाच्या बाबतीत सर्वसामान्याकरिता, आजाऱ्याकरिता, शक्तीची कामे करणाऱ्याकरिता, कुष्ठरोग्याकरिता व कच्या

कैदेतील इसमाकरिता अशी निरनिराळी प्रमाणे दिली आहेत. परिशिष्टामध्ये सर्वसामान्याचे अन्न प्रमाण दिलेले आहे. कपड्यांचे बाबतीतही प्रत्येक इसमास किती कपडे द्यावेत हे प्रमाण देण्यात आलेले आहे. हे प्रमाण परिशिष्ट 'क' मध्यें दिलेले आहे.

**दिनचर्या —**

शासकीय संस्थामध्यें दैनंदिन कार्यक्रम वेगवेगळे असतात. हे कार्यक्रम त्या संस्थेच्या प्रकारानुरूप ठेवण्यात येतात. परंतु सर्वसाधारणपणे दिसून येणारा दैनंदिन कार्यक्रम खालीलप्रमाणे असतो.

१. सकाळी ६ वाजता संस्था उघडणें व सर्वांना उठविणे.

२. स्वच्छता ( स्वतःची व डॉर्मेटरींची ).

३. प्रार्थना.

४. गंजी.

५. अंगण व इतर भागातली स्वच्छता.

६. सकाळी ८-३० वाजतां कारखान्यांची सुरवात ते ११-३०.

७. भोजन ११-३० वाजता.

८. विश्रांती १२ ते १-३० पर्यंत.

९. १-३० दुपारी ते ५-३० सायंकाळी कारखाने चालू.

१०. ५-३० सायंकाळी प्रार्थना व भोजन ६ पर्यंत.

११. ६ वाजतां टाळेबंदी.

१२. ६-३० ते ९ पर्यंत रेडिओ, कॅरम, वाचन किंवा प्रौढ शिक्षणाचा वर्ग ( डॉर्मेटरीमध्ये ).

सायंकाळी ४-३० ते ५ मैदानी खेळ.

## सुपरिंटेंडेंट यांचा कार्यक्रम

९ वाजतां संस्थेची तपासणी फेरी.

१० ते १२ ऑफिस.

३ ते ५ ऑफिस.

५ ते ६ तपासणी फेरी.

८ वाजतां जमादारांच्याकडून एकूण संख्येबद्दल रिपोर्ट.

## प्रोबेशन ऑफिसर्स यांच्या कामाच्या वेळा

कारखान्याच्या वेळांप्रमाणेच. शिवाय त्यांनी संस्थेमध्ये मधून मधून फेरी मारावी. वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या कामाच्या वेळा सकाळी ८–३० ते १२–०० व सायंकाळी ३ ते ५–३० पर्यंत. हॉस्पिटल वॉर्ड अटेंडंट्स् अधिक असल्यास त्यांना दिवस–रात्रीच्या कामाच्या पाळ्या वैद्यकीय अधिकारी यांनी द्याव्या. सर्व हवालदार व सिनीअर केअर टेकर्स यांच्या कामाच्या वेळांचा तक्ता जमादारांनी दर रविवारी अधीक्षकांच्या सहीने काढावा. त्यातच आठवड्याच्या सुट्टीचा अंतर्भाव होतो. या रक्षकांच्या पाळ्या रात्रंदिवस असतात, पण एका वेळेस एका रक्षकाला, ४ ते ५ तासापेक्षा जास्त प्रत्यक्ष कामगिरी देऊ नये. मात्र २४ तासांत ती एकंदर ८ तास असावी. अधीक्षकांचे ऑफिस १०–३० ते ५–३० इतर शासकीय कचेऱ्याप्रमाणेच चालू असते. दवाखाना व हॉस्पिटल विभागांत काम करणाऱ्या परिचारिका, कंपाऊंडर्स, ड्रेसर्स यांच्या कामाच्या वेळा मेडिकल ऑफिसर यांनी बसवून द्याव्यात. त्या मासिक किंवा साप्ताहिक असतात.

## तुरुंगाशी थोडे साम्य

तुरुंगामध्ये सर्व कैद्यांना ज्याप्रमाणे सायंकाळी ६ ते सकाळी ६ पर्यन्त कुलुपे लावून बंद करुन ठेवण्यात येते, त्याचप्रमाणे आदान केंद्रांत व सरकारी प्रमाणित संस्थांमध्ये करण्यात येते. या संस्थांमधील शिस्त ही साधारण जेलप्रमाणेच परंतु कमी सक्तीची असते. तुरुंगातून कैदी पळून जाणे हा गुन्हा मानण्यात येतो. तसा गुन्हा प्रमाणित संस्थेच्या बाबतीत मानण्यात येत नाही किंवा या गुन्ह्यासाठी शिक्षाही ठेवण्यात आलेली नाही. भिकारी हे खरोखरीचे गुन्हेगार नसल्यामुळे त्यांना पूर्णपणें कैद्यांसारखे वागविले जात नाही. तुरुंगामध्ये मनुष्याला त्याच्या नावाने कमी ओळखतात. त्याला तुरुंगामध्ये दाखल होताच रजिस्टर नंबर देण्यात येतो. व या नंबरानेच त्याला ओळखले जाते. भिक्षेकऱ्याच्या आदान केंद्रांत किंवा प्रमाणित संस्थांमध्ये आलेल्या नव्या माणसाला रजिस्टर नंबर दिला जातो. पण त्याला त्या नंबराने ओळखले जात नाही. त्याला त्याच्या किंवा त्याने सांगितलेल्या नांवानेच ओळखले जाते. तरीसुद्धां पुष्कळ बाबतीत तुरुंग व या कायद्याखालील संस्था यांचेमध्ये साम्य ठेवण्यात आले आहे. तुरुंगामध्ये वापरण्यात येणारी बहुतेक सर्व रजिस्टर्स येथेही ठेवण्यात येतात. तुरुंगामध्ये येणाऱ्यांना 'कैदी' म्हणतात. व प्रमाणित

संस्थेमध्ये येणाऱ्या किंवा आदान केंद्रात येणाऱ्या व्यक्तिला 'इनमेट' म्हणतात. 'इनमेट' ही संज्ञा या संस्थेमध्ये फार रुढ झालेली आहे.

## संस्थेत झालेले मृत्यू

आदान केंद्रात किंवा प्रमाणित संस्थेत कच्च्या कैदेत असताना, स्थानबद्ध असताना, कांही व्यक्ती मरण्याची शक्यता नेहमीच असते. पुष्कळ वेळा रस्त्यावर शेवटच्या मार्गावर असलेल्या भिकाऱ्यांना पकडून आदान केंद्रात आणण्यांत येते. केंद्रात भरती झाल्याबरोबर डॉक्टरांचेकडून त्याला योग्य ती वैद्यकीय मदत देण्यांत येते. परंतु पुष्कळ वेळा परिस्थिती आधीच हाताबाहेर गेलेली असल्यामुळे मृत्यू हा अटळ असतो. अशा तऱ्हेने ज्या इसमाची तब्येत अतिशय नाजूक झाली आहे त्याच्या नातेवाईकांना किंवा हितचिंतकांना त्याच्या परिस्थितीबद्दल खबर देण्यात येते. दुर्दैवाने त्याचा मृत्यू झाल्यास ती ही बातमी तारेने किंवा टेलिफोनने त्वरीत देण्यात येते, नातेवाईक किंवा हितचिंतक शेवटचे कार्य करण्यास सिद्ध असतील तर मृतदेह त्यांच्या ताब्यांत देण्यात येतो. सदरहू मृत इसम जर कच्च्या कैदेत असेल तर कोर्टास मुख्य व निरीक्षकांस ही मृत्यूची खबर द्यावी लागते. कोर्ट किंवा मुख्य निरीक्षक जरुर असल्यास त्याचे मृत्यूसंबंधी चौकशी करू शकतात. परंतु मृतदेह कोणाचेही ताब्यांत देण्यापूर्वी अधीक्षकाने त्याबाबतीत संस्थेतील मेडिकल ऑफिसर यांचेकडून 'हा मृत्यू नैसर्गिक किंवा अनैसर्गिक' यासंबंधी एक सर्टिफिकेट घेतले पाहिजे. नैसर्गिक मृत्यू ही चिंतेची बाब नाही. पण अनैसर्गिक मृत्यू असेल तर शेजारच्या पोलिस स्टेशनावर खबर देऊन मृतदेहाचा पंचनामा करून घ्यावा लागतो. खरे पाहिले असता कोणत्याही 'इनमेटचा' मृत्यू झाला कीं पोलीस किंवा पोलीस पाटील यांना खबर दिली पाहिजे, व पंचनाम्यानंतर मेडिकल सर्टिफिकेटसह मृतदेह पोलिसांच्या ताब्यात दिला पाहिजे. मुंबईमध्ये असल्या कोणत्याही संस्थेत इनमेटचा मृत्यू झाला कीं मेडिकल ऑफिसरच्या रिपोर्टसह कॉरोनर कोर्टाला रिपोर्ट व प्रेत पाठवावे लागते. प्रेते सांभाळण्याची सोय तेथे आहे. जरूर असेल तेथे प्रेताची उत्तरीय तपासणी डॉक्टरांचे मार्फत करवून घेतली जाते. संस्थेत कोणताही अपमृत्यू झाल्यास त्याचा पंचनामा पोलिसांमार्फत होणे व त्या शवाची उत्तरीय तपासणी ही अतिशय जरूरीची गोष्ट आहे. सर्व संस्थांमधून एकूण मृतांची संख्या वर्षामध्ये सुमारे २०० तरी असते. याच कारणामुळे मृतांच्या बाबतीत माहिती देण्यात आली आहे. सर्व शहरात बहुतेक धर्मांच्या संस्था असून त्या बेवारशी मृताचे अखेरचे कार्य धार्मिक पद्धतीने करतात. या संस्थांचा खूप उपयोग होतो. एका परिपत्रकाप्रमाणे अशा मृतांचा अंत्यसंस्कार संस्थेस पार पाडता येतो व त्याकरिता रु. ५०/– पर्यन्त खर्च करता येतो.

## आत्महत्त्येस प्रवृत्त असे लोक

मानसिक विकृती असलेले, अडचणीत सांपडलेले, कांही लोक संस्थेत येतात व अतिशय थोड्या कारणावरून भडकून जातात. कांही वेळेस त्यांच्या ठिकाणी आत्महत्त्येची भावना जागृत झालेली असते. ते कांचा व ब्लेडसूचे तुकडे खातात. किंवा छोट्याशा दोरीचा उपयोग करून जरासा एकांत सांपडताच आत्महत्येचा प्रयत्न करतात. अशा लोकांवर उत्तम देखरेख ठेवून योग्य ते औषधोपचार होण्याची जरूर असते. या लोकांना शक्य तितक्या लवकर मेंटल हॉस्पिटल किंवा सिव्हिल हॉस्पिटलमध्ये प्रवेश द्यावा. औषधोपचाराने त्यांच्यामध्यें तात्पुरती सुधारणा होणे शक्य असते. या प्रकारच्या लोकांच्याकडे दुर्लक्ष झाल्यास अनैसर्गिक मृत्यूच्या प्रकारांत व जाबजबाबात अडकण्याची शक्यता असल्यामुळे या लोकांची विशेष काळजी त्वरित घेणे जरूर असते.

## वेडे भिकारी

आदान केंद्रांत किंवा प्रमाणित संस्थांत आत्महत्या करण्यास प्रवृत्त झालेल्यांची नोंद होते. मानसिक विकृती झालेल्यांची ही संख्या बरीच मोठी आहे. त्यातील कांही मंडळी संस्थामधून व्यवस्थित राहू शकत नाहीत. ते स्वतःला अपाय करून घेत नसले तरी इतरांना धोका देण्यासारखी किंवा खूप त्रास देण्यासारखे असतात. या सर्व वेड्या लोकांना मेंटल हॉस्पिटलसूमधून घालणे अवघड आहे. कोणत्याही इसमास वेड्याच्या इस्पितळात पाठवावयाचे असल्यास योग्य त्या न्यायाधिशाच्या परवानगीशिवाय ही गोष्ट शक्य नाही. वेड्यांच्या इस्पितळांची योजना इंडियन ल्यूनसी ॲक्ट १९१२ प्रमाणे करण्यात आली असल्यामुळे प्रत्येक वेड्याला तेथे घालण्याकरितां पोलीसांचा, नातलगांचा किंवा हितचिंतकाचा अर्ज पाहिजे. आपल्या संस्थेतील रोग्याचे बाबतीत सुपरिंटेंडेंटचा अर्ज छापील फॉर्मवर असावा. त्या अर्जाप्रमाणें मॅजिस्ट्रेटसमोर सुनावणी होते. त्यानंतर सिव्हिल सर्जन यांना एक पत्र मॅजिस्ट्रेट देतात व १० दिवसात मानसिक चिकित्सा करून रिपोर्ट मागतात. असा रिपोर्ट मिळाल्यानंतर मॅजिस्ट्रेट वेड्याच्या इस्पितळात जागा आहे काय अशी तेथील अधीक्षकाकडे चौकशी करतात. जागा असेल तेव्हां या रोग्याला तेथे पाठविण्यात येते. पुढे जरूर असेल तर विजेचे झटके देण्याकरितां किंवा शस्त्रक्रिये करिता दवाखाना परवानगी मागतो. नातलग असल्यास त्यांची लेखी परवानगी घ्यावी व नसतील तर रोग्याला हिताच्या दृष्टीने तशी पवरानगी द्यावी.

मुंबई भिक्षा प्रतिबंधक कायदा १९५९ च्या कलम २६ प्रमाणे वेडे व कुष्टरोगी यांना योग्य त्या दवाखान्यात पाठविण्याची सोय कशी करावी हे सांगण्यात आले आहे.

वेड्या भिकाऱ्याला वेड्याच्या इस्पितळात ठेवण्याचा सरकार सदरहू कायद्याच्या कलम २६ ( ३ ) प्रोव्हिजोप्रमाणे करते, परंतु कोर्टाकडून हे काम करून घेणे त्वरित होते. परंतु तसे करण्यास परवानगी दिली आहे.

कुष्ठरोग्यांचे बाबतीत परिस्थिती वेगळीच आहे. या कायद्याप्रमाणे प्रमाणित केलेल्या संस्थांपैकी दोन शासकीय संस्था व सुमारे ७ खाजगी प्रमाणित संस्था कुष्ठरोग्यांना सांभाळण्याचे कार्य करतात. स्थानबद्ध करण्यात आलेल्या कुष्ठरोग्यांना या संस्थामधून पाठविले जाते. तसेच प्रमाणित संस्थेत असलेल्या एकाद्या इसमास कुष्ठरोग आहे असे दिसून आल्यास त्याला वरील संस्थांमध्ये पाठविले जाते. १८९८ च्या लेपर्स ॲक्टप्रमाणे सध्या भिकाऱ्यांच्या दृष्टीने हुकूम घेण्याची जरुर पडत नाही. शिवाय या कायद्याप्रमाणे प्रमाणित केलेल्या संस्था फारच थोड्या असून, ज्या आहेत त्या संपूर्णपणे भरलेल्या असतात. तेथे प्रवेश मिळणे अवघड होते.

## पळून जाणारे भिकारी, त्यांचे पैसे व मौल्यवान वस्तू

प्रमाणित संस्थामधून सरासरी २००-३०० इसम दरवर्षी पळून जातात. भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणें पळून जाणे हा गुन्हा होत नसला तरी इं. पी. कोडच्या कलम २२४ प्रमाणे खटला भरता येतो. या बाबतीत अधीक्षकाने वादी होणे जरुर आहे.

पळून जाणाऱ्या माणसाचे पैसे किंवा मौल्यवान वस्तू असल्यास त्या वस्तू त्या इसमाच्या सुटावयाच्या तारखेपासून पुढे १ वर्षपर्यंत सांभाळून ठेवाव्यात. तो इसम या मुदतीत पुन्हा न आल्यास त्या वस्तू पोलीस अधिनियम १९५१ च्या कलम ८२ व ८३ प्रमाणे विल्हेवाटीसाठी पोलिसांच्या स्वाधीन कराव्यात.

## मृताचे पैसे व मौल्यवान वस्तू

मृत पावलेल्या इसमाची अशी रकम किंवा मौल्यवान वस्तू शिल्लक असतील तर योग्य तो वारस उपस्थित होऊन त्याने क्षतिपूर्ती बंधपत्र करून दिल्यास त्याच्या ताब्यात द्याव्यात. या वस्तू अधीक्षकाने मृत्यूपासून १ वर्ष पर्यन्त स्वतः सांभाळाव्यात. व तोपर्यंत वारस उपस्थित न झाल्यास वरील पोलिस अधिनियमन १९५१ प्रमाणे पोलिसांचे ताब्यांत द्याव्यात.

## श्रेणी पद्धत व उपदाने

संस्थेमध्ये रहाणाऱ्या इनमेटस्ना कामामध्ये व चांगल्या वर्तणुकीमध्ये प्रोत्साहन

देण्यासाठी उपदान देण्यात येते. अशी उपदाने देण्याचा अधिकार अधीक्षकास देण्यात आला आहे. वर्तणूक व काम जसे सुधारेल तशी उपदानात वाढ करून देण्याचा अधिकार अधीक्षकास आहे. पण ही रकम रु. ५/– पेक्षा अधिक होता कामा नये.

शासनाने मंजूर केल्यास मुकादमाच्या जागावर कांही चांगल्या काम करणाऱ्या व्यक्तींना नेमता येते. व त्यांना उपदान म्हणून दरमहा रुपये १५/– देता येतात. या जागा शासनाने मंजूर करणे जरूर असते. नवीन संस्थामधून अशा तऱ्हेची मंजुरी एक वर्षापुरती देण्यात येते.

दहा मुकादमावर एक मुख्य मुकादम नेमता येतो. पण त्याच्या व इतर मुकादमांच्या उपदानात फरक नसतो.

## रजेवर सोडणे

स्थानबद्ध झाल्यानंतर कांही वेळेस नातलग किंवा हितचिंतक येतात, व अशा इसमास रजेवर घेऊन जाण्याची इच्छा प्रगट करतात. अधीक्षकास रजा देता येते. या रजेची मुदत कायद्यात किंवा नियमावलीत ठरविलेली नाही. या रजेचा चांगला उपयोग करून कांही स्थानिक किंवा जवळ रहाणाऱ्या व्यक्तीचे पुनर्वसन करता येते. यासाठी तिला ८ किंवा १५ दिवसांच्या रजेवर सोडून त्या मुदतीत वागणूक कशी होते याकडे लक्ष ठेवावे. पुन्हा मुदत वाढवून लक्ष ठेवावे. या कायद्यांत देखरेखीचे जे तत्त्व देण्यात आलेले नाही ते अशा प्रकारे प्रत्यक्षात निर्माण करता येते अशा तऱ्हेने प्रोबेशनचा प्रयोग करता येतो. असे प्रयोग ठिकठिकाणी यशस्वी झालेले आहेत.

## लायसेन्सवर सोडणे

लायसेन्स याला मराठीत अनुज्ञप्ती असा प्रतिशब्द आहे. मुख्य निरीक्षक यांना एकादा इसम पुन्हा भीक मागणार नाही असा संभव दिसून आल्यास चांगल्या वर्तणुकीच्या शर्ती-वरती त्याच्या कोणत्यातरी नातलगाच्या किंवा हितचिंतकाच्या ताब्यांत त्याला देता येते. अर्थात सर्वसाधारण परिस्थितीत त्या इसमाने स्थानबद्धतेच्या मुदतींपैकी $\frac{1}{3}$ मुदत प्रमाणित संस्थेत घालविलेली असावी विशेष परिस्थितीत ही अट शिथिल करता येते. हा इसम दुसऱ्यांदा स्थानबद्ध झालेला असेल तर त्याने संस्थेत $\frac{2}{3}$ मुदत घालविली पाहिजे. मगच त्याला अनुज्ञप्तीवर सोडता येते. हे भिक्षा प्रतिबंधक कायद्याच्या कलम २२ प्रमाणे करता येते. अनुज्ञप्तीवर सोडलेल्या इसमास वागणुकीच्या शर्ती घालून देण्यात येतात व त्या शर्तींचे

उल्लंघन केल्यास अनुज्ञप्ती रद्द करण्याचा व त्या इसमास पुन्हा संस्थेत स्थानबद्धतेत आणून ठेवण्याचा अधिकार मुख्य निरीक्षकांना कलम २३ प्रमाणे मिळालेला आहे.

## स्थानबद्धतेची मुदत कशी मोजावी

स्थानबद्धतेचे हुकूम बहुधा १ वर्ष मुदतीचे असतात. कांही प्रसंगी ते २ किंवा ३ वर्षांचे असतात ही मुदत केव्हांच अर्धवट नसते. तेव्हां एक वर्षाकरिता स्थानबद्ध झालेला इसम पुढच्या वर्षी स्थानबद्धतेच्या तारखेच्या आदल्या दिवशी सोडून द्यावा लागतो. सोडण्याच्या दिवशी रविवार किंवा सार्वजनिक सुटी आल्यास एक दिवस आधी सोडून देण्यात येते प्रमाणित संस्थेमध्ये "**सुटकेची रोजनिशी**" ठेवण्यात येते. कोणताही इसम संस्थेत आला कीं त्याच्या सुटकेची संभाव्य तारीख काढून त्या तारखेच्या पानावर त्याने नांव व नंबर घालण्यात येतो. प्रत्येक महिन्याच्या अखेरीस पुढच्या महिन्यात सुटणाऱ्या इसमांची यादी करून ती अधीक्षकांच्या सहीने जमादार, व्यक्तिकार्यचिकित्सक, मुख्य दरवाजावरील चौकीत ठेवण्यात येते. कामावरील रक्षकाच्या नजरेखाली ही गोष्ट नेहमीच राहते व एखाद्या इसमास अधिक काळ स्थानबद्धतेत ठेवण्याच्या कटकटी निर्माण होत नाहीत. सुटकेची रोजनिशी यासाठी अतिशय महत्त्वाची असते. मोठ्या संस्थेत तर ती फारच आवश्यक असते.

संस्थेतून पळून गेलेल्या इसमाची मुदत संस्थेबाहेर घालवलेल्या अनधिकृत काळामुळे पुढे जाते. परंतु तो इसम त्याच्या मूळ स्थानबद्धतेच्या मुदतीनंतर सापडल्यास त्याला अटकाव करता येत नाही.

अनुज्ञप्तीवर किंवा रजेवर बाहेर असलेला काळ हा अधिकृत स्थानबद्धतेचा काळ समजला जातो. अनुज्ञप्तीचा हुकूम रद्द झाल्यास अनुज्ञप्तीतील बाहेरच्या काळाने स्थान-बद्धतेची मुदत पुढे जात नाही.

## स्थानबद्धतेची मुदत वाढविणे

स्थानबद्धतेतून सुटण्याची तारीख नेहमीच आगाऊ काढून ठेवावी लागते. परंतु कांही प्रसंगी त्या इसमास त्या दिवशी सोडून देता येत नाही. तो खूप आजारी असतो, अपघातामुळे जखमी झालेला असतो. अशा प्रसंगी मुख्य निरीक्षकांना त्याची मुदत गृहखात्याच्या परिपत्रक नं. ६७३०/५ दिनांक १८–१२–४८ प्रमाणे वाढविता येते.

## पूर्णपणे सोडून देणे व बेमुदत स्थानबद्ध करणे

तीन महिन्यापेक्षा अधिक काळ अनुज्ञप्तीवर असलेल्या इसमाच्या बाबतीत मुख्य

निरीक्षकांनी शासनाला कळविले पाहिजे कीं हा इसम पुढे भिक्षा मागण्याचा संभव नाही. व त्याला पूर्णपणे सोडून द्यावे. तर शासनातर्फे त्या इसमाला पूर्णपणे सोडून देण्यात आल्याचा हुकूम देण्यात येतो. व तेथून पुढे त्या इसमाची स्थानबद्धतेची मुदत संपली असे मानले जाते. ही गोष्ट सदरहू कायद्याच्या कलम २४ प्रमाणे होते.

त्याचप्रमाणे संस्थेमध्ये एकादा इसम पूर्णपणे निराधार असेल व त्याचे व्यंग किंवा आजार केव्हांच बरा न होणारा असेल तर या कायद्याच्या कलम १० प्रमाणे शासनाला त्या इसमास बेमुदत स्थानबद्ध करता येते. ही गोष्ट अधीक्षकाने मुख्य निरीक्षकांच्या मार्फत शासनाकडे पाठविल्यास असा निर्णय मिळू शकतो.

## मुदतीनंतर सोडून देणे

स्थानबद्धतेची मुदत संपण्यापूर्वी २–३ महिने अगोदर अधीक्षकांनी किंवा तेथील व्यक्तिकार्यचिकित्सकांनी त्या इसमाच्या नातलगांना पत्रे लिहून सुटण्याच्या तारखेची कल्पना द्यावी व नातलग किंवा हितचिंतकांना योग्य वेळी बोलावून घेऊन स्थानबद्धाला त्यांच्या ताब्यांत द्यावे. तसेच त्या नातलगाचा येण्या-जाण्याचा आणि स्थानबद्धाचा त्याच्या घरापर्यंतचा प्रवासाचा खर्च द्यावा. त्या इसमाचे कोणी नातलग न आल्यास संस्थेच्या रक्षकाबरोबर त्याला त्याच्या रहाण्याच्या मूळगांवी पाठवून योग्य व्यक्तीच्या ताब्यात द्यावे.

सदरहू सोय या कायद्याखाली केलेल्या नियमावलीमधील नियम नं. २५ [२] मध्ये देण्यात आली आहे. कोर्टाने निर्दोष सोडलेल्या किंवा जामिनावर सोडलेल्या इसमाच्या बाबतीत ही सोय नाही. ही सोय स्थानबद्धाला मुदत पूर्ण झाल्यावर सोडतानाची आहे.

## पोलिसांचा पहारा

आदान केंद्रातील आरोपी भिक्षेकरी किंवा प्रमाणित संस्थेतील स्थानबद्ध हे कोर्टाच्या हुकुमाप्रमाणे ठेवलेले लोक असल्यामुळे त्यांनी पळून जाऊ नये हे फार अगत्याचे असते. म्हणूनच या लोकांकडे विशेष लक्ष द्यावे लागते. त्यांना संस्थेबाहेर नेताना बरोबर रक्षक द्यावे लागतात. तसेच सरकारी किंवा इतर दवाखान्यांत त्यांना ठेवण्यात आल्यास त्यांच्या-वर देखरेख करण्यासाठी पोलिसांचा २४ धंटे पहारा ठेवावा लागतो.

संस्थेच्या मुख्य दरवाज्यावर रक्षक २४ धंटे जागता पहारा देतो. व कोणाही बाहेरच्या इसमास आत सोडीत नाही. सायंकाळी ६ वाजता संस्थेतील सर्व खोल्यांना कुलुपे

लावली जातात व सकाळी ६ वाजता ती उघडली जातात. संस्थेमध्ये ठिकठिकाणी दिवसभर खडा पहारा देण्यासाठी रक्षकांची नेमणूक केलेली असते.

## गणवेष व अंथरुण-पांघरुण

प्रत्येक पुरुष इनमेटला सहा महिन्याकरितां २ अर्धे शर्ट व २ चड्ड्या देतात. एक गणवेष प्रत्येकाच्या अंगावर असतो तर एक गणवेष संस्थेच्या परीट विभागांत धुतला जातो. याशिवाय वर्षाकरितां १ टोपी, १ लंगोट, १ टॉवेल देण्यात येतो. अंथरुण व पांघरुण म्हणून १ सतरंजी, २ चादरी (१ जाड व १ पातळ) व एक ब्लँकेट देण्यात येते. कांही लोक स्वतः आपले कपडे धुतात. त्यांना धुण्याचा साबण दिला जातो. स्वच्छतेसाठी आंघोळीचा साबण, खोबरेल तेल दिले जाते. त्याचे प्रमाण शेवटी परिशिष्ट 'ब' मध्ये दिले आहे. स्त्री व पुरुष यांचे कपडे, अंथरुण-पांघरुण, साबण व तेल यांचे प्रमाण परिशिष्ट 'क' मध्ये दिले आहे. इनमेटला देण्यात येणारे बहुतेक सर्व कपडे खादीचे किंवा संस्थेत तयार झालेल्या कापडाचे असतात. त्यामुळे ते कपडे जाडे भरडे असतात, तलम असत नाहीत.

शासकीय प्रमाणित संस्थांमधून जे धान्य किंवा कडधान्य विकत घेतले जाते ते सर्वसाधारणपणे दुसऱ्या दर्जाचे असते. इनमेटस्नी जेवण चांगले बनवावे म्हणून त्यांच्यावर देखरेख स्वयंपाकी करतात. जेवण तयार करण्याचे काम इनमेटस् करतात.

तयार अन्न संस्थेतील मेडिकल ऑफिसर व स्वतः सुपरिंटेंडेंट यांनी तपासून मान्य केल्यानंतरच वाढण्यात येते. याशिवाय संस्थेत मेडिकल ऑफिसर व सुपरिंटेंडेंट फेरी मारतात त्यावेळी अन्न कसे बनविले जाते यावर लक्ष देण्यात येते.

त्याचप्रमाणे अन्नाचे वाटप होत असताना कोणीतरी जबाबदार अधिकारी तेथे असतो व अन्न सारख्या व योग्य प्रमाणात दिले जाते आहे किंवा नाही हे पाहिले जाते. रोज दोन्हीवेळेस ताजे अन्न दिले जाते. राष्ट्रीय सण व इतर कांही सणांचे वेळी या अन्नाच्याच किंमतीचे दुसरे योग्य असे चांगले अन्न दिले जाते.

संस्थेला लागणारे अन्नधान्य व इतर वस्तू कंत्राटदाराकडून घेण्यात येतात. विभागीय अधिकारी हे निविदा निवेदन काढून कंत्राटदार नेमतात. त्यांच्याकडून पुरविण्यात येणाऱ्या अन्नधान्याचे नमुने संस्थेत ठेवण्यात येतात. व त्याप्रमाणे रोजचा लागणारा माल कंत्राटदाराकडून घेण्यात येतो. लागणारा माल न पुरविणे, माल खराब किंवा खालच्या दर्जाचा देणे

वगैरे गोष्टी कंत्राटदाराने करू नयेत म्हणून त्याला रुपये १० पर्यन्त दंड करण्याचा अधिकार अधीक्षकांना देण्यात आलेला असतो. या अधिकाराचा उपयोग नाठाळ कंत्राटदारांच्या बाबतीत चांगला होतो.

## अधीक्षकांचे अधिकार

बहुतेक सर्व प्रमाणित संस्थांचे अधीक्षक हे राजपत्रित अधिकारी असतात व प्रत्येक संस्थेत कमीत कमी ३५ ते ४० लोकांचा नोकरवर्ग असतो. या सर्व नोकरवर्गाकडून योग्य तऱ्हेने काम करुन घेता यावे म्हणून कोणत्याही नोकरास रु. १० इतका दंड करण्याचा अधिकार अधीक्षकांना देण्यात आला आहे.

## करमणूक व खेळ

संस्थेतील जीवन हे रुक्ष वाटू नये व मनःस्वास्थ्यही मिळावे म्हणून करमणुकीचे खेळ मधूनमधून दाखविले जातात. यातच सिनेमाचा अंतर्भाव होतो. तरुण लोकांच्यासाठी व्हॉलिबॉल, आट्यापाट्या, खो-खो सारखे खेळ किंवा बसून खेळण्याचे कॅरम, बुद्धिबळे किंवा पत्ते हे खेळ देण्यात येतात. जुगारी प्रवृत्ती येऊ नये याची काळजी घ्यावी लागते. कारण अशा संस्थांमधून ही वृत्ती फार लौकर निर्माण होते. विड्या, भाकरी वगैरे गोष्टी जुगारात पैशाच्या बरोबरीने येतात. म्हणून काळजी घ्यावी लागते.

## प्रौढ शिक्षण

प्रौढ शिक्षण ही फार उत्तम कल्पना आहे. आपल्या देशातील सर्व प्रौढांना साक्षर करणे जरूर आहे. आदान केंद्रामध्ये माणूस त्याची चौकशी कोर्टापुढे संपे-पर्यन्त म्हणजे फारच थोडे दिवस रहातो. त्यानंतर त्याची बदली एकाद्या प्रमाणित संस्थेत होतें. साधारणतः आदान केंद्रात माणूस २ महिन्यापेक्षा जास्त राहत नाही. तेव्हा अशा संस्थेत प्रौढ शिक्षणाचा वर्ग चालविणे कितपत फायद्याचे होईल हे सांगवत नाही. प्रमाणित संस्थेमध्ये सुद्धा या बाबतीत कांही अडचणी असतात. व त्यातली मुख्य अडचण भाषेची. अनेक प्रदेशातली माणसे तेथे असतात. त्यातल्या पुष्कळांना आपल्या भाषेशिवाय दुसरी भाषा समजत नाही. आदान केंद्रांत चौकशीचे काम दुभाषा-मार्फत करावे लागते. अशा लोकांना कसे व काय शिकवावे हा प्रश्न त्या शिक्षकासमोर उभा रहातो. दक्षिणेकडून आलेल्या पुष्कळ लोकांना हिंदी येत नाही. त्यांना त्यांच्या मातृभाषेंतून शिकवणे अशक्य असते त्यात वयस्कर, जीवनास विटलेले, अपंग या

साऱ्यांची एकत्र मोट बांधून प्रौढ शिक्षणाचे वर्ग चालविले जातात, त्यामुळे त्यांचे यश मोजता येणार नाही.

## झेंडावंदन व सलामी

राष्ट्रीय दिनानिमित्त आनंदाचा सोहळा पाळण्यात येतो. त्या दिवशी शर्यती लावणे, चांगले अन्न देणे वगैरे गोष्टी ठेवल्या जातात. तसेच अधीक्षक किंवा बाहेरच्या एकाद्या पाहुण्यांच्या हस्ते ध्वजारोपण होते. संस्थेतील शिपाई कर्मचाऱ्यांची कवायत व सलामी होते. तसेच सांस्कृतिक कार्यक्रम होतात. संस्थेतील जीवनांत हा एक आनंदाचा दिवस असतो.

## अभ्यागत समिती

प्रत्येक प्रमाणित संस्थेकरितां एक 'अभ्यागत समिती' नेमलेली आहे. मुंबई शहराकरितां कमिशनर ऑफ पोलीस व इतर ठिकाणी कलेक्टर हे या समितीचे अध्यक्ष असतात. व संस्थेचे अधीक्षक हे या समितीचे पदसिद्ध चिटणीस असतात. या समितीची स्थापना सदरहू कायद्याच्या कलम १४ प्रमाणे करण्यात येते. या समितीच्या कार्याबद्दलची संपूर्ण माहिती सदरहू कायद्याचे बाबतीत केलेल्या नियमामधील नियम नं. १९ व २२ मध्यें दिली आहे.

## सल्लागार समिती

सदरहू कायद्याच्या कलम १५ प्रमाणे महाराष्ट्रांतील कोणत्याही शहरात अशी समिती शासनाला नेमता येईल. समितीची कार्यकक्षा त्याच कलमामध्ये पूर्णपणे देण्यात आली आहे.

## कल्याण निधी

या कायद्यावरील नियमावलीच्या पुस्तकामधील नियम नं. १७ व १८ प्रमाणें 'कल्याण निधी' ची स्थापना करता येते. या दोन्ही नियमामध्यें वरील निधीसाठी पैसे कसे मिळवायचे व त्यांचा विनियोग कसा करायचा या विषयी माहिती दिली आहे. या निधीतील पैशांचा उपयोग संस्थेमधून अनुज्ञप्तीवर मुक्त करण्यात आलेल्या व संस्थेत असलेल्या इसमांच्या कल्याणासाठी व आरामासाठी करता येईल. अभ्यागत समितीच्या परवानगीने व विशेष प्रसंगी मुख्य निरीक्षकांच्या पूर्व संमतीने अधीक्षकास या निधीमधून खर्च करता येईल.

# प्रकरण चौदावे

## प्रमाणित संस्था व उद्योग

भिक्षा मागणारा माणूस म्हणजे एक निरूद्योगी माणूस असे आपण समजतो, व ते खोटेही नाही. भिक्षा मागणारा माणूस जीवनास उपयोगी असे स्वतः पुरते काम करीत असतो. कारण भिक्षा मागणे हे सुद्धा एक तऱ्हेचे कामच आहे, इतकेच नव्हे तर ते करताना विचार करावा लागतो. व मनाची एक तयारी व्हावी लागते. सर्वसामान्य भिकारी आरंभी भिक्षा मागणे हे निषिद्ध मानत असतो. याला अपवाद म्हणजे धार्मिक हक्क म्हणून किंवा रूढी म्हणून भीक मागणारे लोक या लोकांना भीक मागण्याचा सामाजिक हक्क प्राप्त झालेला असल्यामुळें त्यांना भीक मागण्याबद्दल बिलकुल लाज वाटत नाही. उलट त्यांना भीक मागण्यापासून परावृत्त करणे म्हणजे त्यांच्या सामाजिक हक्कावर गदा आणणे असा अर्थ होतो व असे झाल्यास सरकारी दरबारी अर्जफाटे होऊ लागतात.

भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणें कमिशनर ऑफ पोलिस यांना मुंबईमध्ये व जिल्हा मॅजिस्ट्रेट यांना इतर ठिकाणीं भिक्षा मागण्याचे परवाने देता येतात. या तरतुदीचा फायदा आपल्या पंथाला मिळावा असे अर्ज आतापर्यन्त झाले आहेत. असे भिक्षा मागणाऱ्यांचे पंथ हिंदू व मुसलमान धर्म यात आहेत. या लोकांना बहुतेक कांही दुसरे उद्योग येत नाहीत. व कांही उद्योग करावा किंवा शिकावा ही प्रवृत्ती त्यांच्यांत सहजासहजी येत नाही. या लोकांच्या बाबतीत समाजातील कांही लोकांच्या मनोवृत्तीसुद्धा हळव्या आहेत. व त्यांना पकडले किंवा बंदीत ठेवले तर पुष्कळवेळा तंग परिस्थिती निर्माण होण्याची शक्यता असते. पण या लोकांना उद्योग शिकविणे हे अवघड आहे. या प्रकारच्या भिकाऱ्यांना परावृत करण्यासाठी कोणते प्रतिबंधक उपाय योजावेत याचा विचार येथे केला आहे.

परिस्थितीच्या फेऱ्यांत सापडून भीक मागणारा इसम हा एके काळी काही तरी काम करणारा इसम असण्याची शक्यता असते अर्थात जन्मापासून अपंग असलेले यातून वगळले पाहिजेत. अपघाताने किंवा आजाराने अपंग झालेले हे सुद्धा एके काळी चांगले काम करणारे नागरिक असण्याची शक्यता आहे. भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणे अटक

होणाऱ्यांत किंवा स्थानबद्ध होणाऱ्यांत किती लोकांना पूर्वाश्रमी कांही उद्योग किंवा काम येत होते व सध्या ते काम त्यांना करता येईल अशी त्यांची शारीरिक व मानसिक परिस्थिती आहे, किंवा काय या बद्दलची माहिती किंवा आकडेवारी उपलब्ध नाही. पण अनुभवावरुन असे म्हणता येईल कीं ज्यांना पूर्वाश्रमी कांही काम येत होते ते संस्थेत येतात तेव्हा त्यांची शारीरिक किंवा मानसिक स्थिती ते काम पुढे करण्यासारखी नसते. फारच थोडी संख्या अशी असते की ज्यांना पूर्वाश्रमीचे काम नीट करता येते.

आज ज्यांना सुदृढ मानण्यात आले आहे त्यांची शारीरिक, मानसिक स्थिती खरोखर ८ तास नियमित काम करण्यासारखी असते काय हा सुद्धा एक प्रश्न आहे. बाह्यतः कोणताही आजार व व्यंग नसलेला हा इसम सुदृढ म्हणून मानण्यात येतो. व तो बराच अशक्त असेल तर डॉक्टर लिहितात कीं त्याला हलके काम द्यावे. वयस्कर माणसाला जड काम होत नाही म्हणून डॉक्टर म्हणतात कीं शरिराने तो सुदृढ आहे पण त्याला हलके काम द्यावे. या दोन्ही प्रकारची व इतरही काही माणसे सुदृढ म्हणून समजण्यात येतात. शरीर सुदृढ असते, पण मन दुबळे झालेले असते किंवा त्यांत विकृती आलेली असते. पुष्कळवेळा ही विकृती चांगल्या वैद्यकीय अधिकाऱ्याला सुद्धा लवकर समजत नाही. कांही वेळेस मानसिक विकृतीचे दर्शन कालांतरानेच होते. असा इसम सुदृढ म्हणून मानण्यात येतो, तरी प्रत्यक्षात तो विकृतीमुळे कोणतेच काम चांगले करु शकत नाही. या शिवाय आळशी लोकांचा एक गट मानता येईल. हे आळशी लोक बाळपणाच्या परिस्थितीमुळें आळशी झालेले असतात. आळशीपणाचे उगमस्थान कोठे आहे हे निश्चित सांगता येणार नाही. हा कदाचित एक संशोधनाचा विषय होईल. पण सध्यातरी आळशी लोकांच्याकडून काम कसे करुन घ्यावे हा एक प्रश्नच आहे. सर्वसाधारण माणूस ज्या परिस्थितीमध्यें व जसें काम करतो तसे आळशी माणूस करीत नाही. आळशीपणा ही एक मानसिक विकृती आहे. या आळशी लोकांची आपणा सर्वांना चांगली ओळख असते. कुटुंबाकुटुंबातून आळशी स्त्री – पुरुष असतात. श्रीमंत कुटुंबातून व थोड्या प्रमाणात मध्यम स्थितीतील कुटुंबात हा आळशीपणा पोसला जातो; व कांही वेळेस तर त्याचे कौतुकही होते. पण आळशीपणा गरीब कुटुंबाला न मानवणारा आहे. आळस हे भिकेचे लक्षण आहे. आळशी माणूस बहुतेक निष्काळजी सुद्धा असतो. तो आपले स्वतःचे जीवन आळसात झोकून देतो. त्याला बरेवाईटपणाची काळजी वाटत नाही. कांही काम करणाऱ्या स्त्रियांचे नवरे असे असतात.

या आळशी, अशक्त, वयस्कर, मनोविकृत लोकांचे मोठे प्रमाण सुदृढ म्हणून

मानण्यात येणाऱ्या लोकांत आहे. ही माणसे कुटुंबांत व समाजात सुरळीतपणे राहू शकत नाहीत. कुटुंबांत त्यांचे तंटे निर्माण होतात व मग हे लोक अनोळखी गावांत रस्त्यावर हात पसरून निर्लज्जपणे भीक मागताना दिसतात.

या सर्व विवेचनाचा अर्थ एवढाच आहे कीं भिकाऱ्यांमध्यें फार मोठे प्रमाण काम करू न शकणाऱ्यांचे आहे. तरीसुद्धा भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणे प्रस्थापित झालेल्या शासकीय प्रमाणित संस्थांत व आदान केंद्रांत उद्योगधंद्याचे उत्पन्न मोठे आहे. १९६३-६४ साली महाराष्ट्र राज्याने वरील संस्थांमधील उद्योगधंदे व शेती विषयक परिस्थिती यांची चिकित्सा करण्याकरिता सौ. कमला वि. निंबकर यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमली होती. या समितीवर खालील सभासद होते.

१] पद्मश्री शिवाजीराव पटवर्धन, अमरावती.

२] श्री. मुळगावकर, सेक्रेटरी, प्रिमिअर ऑटोमोबाईल्स लिमिटेड, मुंबई.

३] डॉ. हजरनविस, उपसंचालक, समाजकल्याण.

४] श्री. राम बेलवडी; विभागीय समाज कल्याण अधिकारी, मुंबई [ को-ऑप्टेड ]

५] श्री. शरश्चंद्र गोखले, चिटणीस, संयोजक व सहाय्यक संचालक समाज कल्याण.

या समितीचा अहवाल १९६६ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यामध्ये सुद्धा असे दाखवून देण्यात आले आहे कीं एका विशिष्ट वर्षी भिक्षा प्रतिबंधन कार्यक्रमाकरिता सरकारने १६ लाख रुपये खर्च केले होते. त्या वर्षी सर्व शासकीय प्रमाणित संस्था व प्रमाणित संस्था यांचे उद्योगधंदे व शेतीचे उत्पन्न सुमारे ५½ लाख रुपये होते .कांही खाजगी, प्रमाणित संस्थेचे उत्पन्न त्यांत मिळविले तर ही रक्कम ६½ लाख रुपये होते. शिवाय त्या वर्षी मुंबई कॉर्पोरेशनने मुंबईतील रहिवाशी भिकाऱ्यांच्या अन्नखर्चाकरिता रु. ३ लाख दिले होते.

या आकडेवारीवरून दिसून येते कीं अशा विकृत व अपंग लोकांचेकडून काम करून घेऊन शासकीय संस्था व इतर संस्था त्यांना कार्यप्रवण करीत आहेत.

शासकीय प्रमाणित संस्थामधून सुमारे ५० प्रकारचे उद्योगधंदे किंवा कार्ये चालू आहेत. या उद्योगामध्ये कांही मूलोद्योग आहेत तर कांही उद्योग तदनुषंगिक आहेत. त्याचप्रमाणे मोठ्या उद्योगांच्या गरजा भागविणारेसुद्धा कांही पोषक उद्योग आहेत. शहरांमधून मोठे उद्योगधंदे सुरू झालेले आहेत, त्या उद्योगांना लागणारा छोटा माल किंवा

सरकारी कामात लागणारा माल तयार करून देणे हे काम या लोकांकडून करून घेतले जाते. तरीसुद्धा या कामांत सुसूत्रता व वेग निर्माण होण्याच्या दृष्टीने वर दर्शविलेल्या समितीने कांही महत्वाच्या सूचना केल्या आहेत. त्यांचा आशय थोडक्यात पुढे दिला आहे.

भिकारी पकडताना अग्र हक्काचा क्रम खालीलप्रमाणे असावा.

१] सुदृढ व बारंवार भीक मागणारे.

२] कुष्ठरोग्यांच्या पुनर्वसनाचा प्रश्न समाज कल्याण खात्याने हाताळावा.

३] पुनर्वसनाचे कार्य करणारे कार्यकर्ते प्रशिक्षित असावेत.

४] या संस्थांतील मनुष्यबळाचा अधिक उपयोग करून घ्यावा.

५] श्रमशिबिरे अधिक प्रमाणात काढावीत.

६] पुनर्वसनाच्या दृष्टीने ' प्रशिक्षण – निर्मिती केंद्रे ' काढावीत.

७] इनमेटस्ला देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाचे सुसंगत अभ्यासक्रम असावेत व त्यात उत्तीर्ण होणाऱ्यांना प्रमाणपत्रे द्यावीत.

८] शेतीच्या कामांचा उठाव करण्याकरिता मध्यवर्ती असा शेती अधिकारी नेमावा.

९] उद्योगांची वाढ होण्याकरिता व मालाचा खप होण्याकरिता असाच मध्यवर्ती अधिकारी नेमावा. या दोन्ही जागी अनुभवी अधिक्षक नेमावेत.

१०] सध्याची "उपदान व मुकादम," पध्दत बंद करून इनमेटस्ना रोजंदारी व काम या प्रमाणात पैसे द्यावेत. त्यामुळे काम अधिक करण्याची प्रवृत्ती निर्माण होईल.

११] लौकर सुटण्याचे अमीष कामास जोडलेले असावे.

१२] हिशेब ठेवण्याच्या पद्धतीत बदल करावा.

१३] वस्तूच्या किंमती ठोकळमानाने न ठरविता वस्तूंची सुबकता, बाजारातील वाण वगैरे गोष्टीवर ठरवावी.

१४] अधिक यांत्रिक धंदे सुरू करावेत.

१५] तेच तेच उद्योग निरनिराळ्या संस्थांत न ठेवता ते वेगवेगळ्या संस्थांतून वेगवेगळे असावेत.

१६] या उद्योगांत धंद्याची तत्वप्रणाली उपयोगात आणावी.

१७] संस्थेतील इनमेटस् व त्यांची पात्रता लक्षांत घेऊन संस्थांमध्ये उद्योग सुरु करावेत.

१८] आदान केंद्रांत मानस शास्त्रज्ञ, ऑक्यूपेशनल थेरपिस्ट व व्यवसाय मार्गदर्शक अधिकारी ठेवावेत म्हणजे तेथून योग्य वर्गीकरण होऊन इनमेटस् प्रमाणित संस्थामध्ये येतील व तेथे त्यांचे पुनर्वसन होण्याची शक्यता वाढेल.

१९] भिकाऱ्यांना शेतीबद्दल आपुलकी असल्यामुळे शेती व्यवसाय मोठ्या प्रमाणात सुरु करावेत. व त्याकरिता ट्रॅक्टरसारखी मोठी यंत्रे वापरली जावीत.

२०] कुष्ठरोगी किंवा इतर अपंग भिकाऱ्याना दैनंदिन जीवनोपयोगी वस्तू [उपकरणे] देण्यात याव्यात.

२१] विकृत मनोवृत्तीच्या लोकांत सुधारणा करण्याची शक्ती उद्योगांत आहे. उद्योग-धंद्यांची वाढ करावी. अधिक माणसे संस्थांत ठेवावी व १०० इनमेटला एक या प्रमाणात व्यक्तिकार्यकर्ते असावे.

२२] सरकारी उपयोगाकरिता खूप माल लागतो. उद्योग संचालक यांना तो माल घ्यावा लागतो. ह्या मालाची जरूरी पाहून आपण आपले कार्यक्रम आखावेत.

२३] धंदे शिक्षकांच्या वेतनश्रेणी बदलून चांगल्या कराव्यात. व प्रशिक्षित शिक्षक नेमावेत. तसेच रु. ६०,०००/– पेक्षा अधिक उत्पादन क्षमता असणाऱ्या संस्थांना व्यवसाय पर्यवेक्षक द्यावेत.

२४] मूलभूत शिक्षणाशिवाय प्रशिक्षण देता येत नसल्यामुळे प्रौढ शिक्षणाची नितांत जरूर आहे.

समितीने केलेल्या या सूचनांचा समाज कल्याण खात्याने विचार केला आहे व त्यातील अनेक सूचनांप्रमाणे कार्य सुरू झाले आहे. त्यांची उपयुक्तता व यश याबद्दल खात्री कालांतराने होणार आहे.

प्रमाणित संस्थेत असलेल्या लोकांची चिकित्सा करण्याचे काम व्यक्तिकार्यकर्त्यास करावे लागते. या सर्व कामाचा मूळ रोख त्या इसमाच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने असतो, परंतु संस्था ही संस्था असल्यामुळे व देण्यात आलेल्या त्या इनमेटला कामाबद्दल पुष्कळवेळा आत्मीयता वाटत नसल्यामुळे संस्थेमध्ये तो स्थिरतेने राहात नाही. त्याला कदाचित कुटुंब किंवा बाहेरचे कांही आकर्षण याची सारखी आठवण होत असते किंवा ओढ लागलेली असते. अशावेळी त्या इसमाच्या मनाचा योग्य तो अभ्यास करून त्याचे मन स्थिर करणे,

तसेच काम करावयास त्याला प्रवृत्त करणे हे तात्कालिक प्रश्न व्यक्तिकार्यकर्त्यांपुढे असतात. पुष्कळवेळा तेथे असलेले इतर इनमेटस् किंवा अधिकारी यांच्याबरोबर त्याचे संबंध बिघडतात व मग निर्माण होणारा संघर्ष नाहीसा केला नाही तर हे प्रकरण येवढे बिघडून जाते की त्याच्या हातून काम तर होत नाहीच पण तो इसम तेथून पळून जाण्याचा विचार करू लागतो. परिस्थिती हळुवारपणे सांभाळून घेणे हे कौशल्यपूर्ण काम व्यक्तिकार्यकर्त्यांस करावे लागते.

श्रमशिबिरे चालविण्याचा प्रयत्न आतापर्यन्त अनेक वेळा करून पाहिला आहे. परंतु या बाबतीत काय झाले आहे याबद्दलची माहिती उपलब्ध नाही. भिकाऱ्यांच्या ठिकाणी असलेला अशक्तपणा, शारीरिक विकृती, मानसिक विकृती व आळस या साऱ्या गोष्टींचा विचार करून त्यांच्याकडून अशी सांघिक कामे करून घेतली पाहिजेत. तुरुंगातील कैद्यामध्ये वरील अडचणी नसल्यामुळे त्यांच्या श्रम शिबिराशी या श्रम शिबिरांची तुलना करता येणार नाही. पण भिकाऱ्यांच्याकडून आतापर्यन्त जी श्रम शिबिरे चालविली ती अगदीच टाकाव झाली नसली तरी धंदा या दृष्टीने त्याचे मूल्यमापन करणे जरूर आहे. ते मूल्यमापन या क्षेत्रातील जाणकार लोकांनी करावे व त्यातून भिकाऱ्यांची योग्य अशी वर्गवारी करून त्यांना कांही दिवस योग्य मार्गदर्शन दिल्यावर विशिष्ट अशा श्रम शिबिरात पाठविल्यास अधिक चांगला परिणाम दिसण्याची शक्यता वाटते.

म. रा. ना. सं. मं. ग्रंथालय
प्र/११० 9.
मंग्रालय.

# प्रकरण पंधरावे

## भिकारी भीक का मागतात

डॉ. एम्. व्ही. मूर्ती यांनी १९५७ मध्ये "Beggar's Problem in Greater Bombay" हा संशोधनात्मक प्रबंध प्रसिद्ध केला आहे. या प्रबंधांत त्यांनी मुंबईमध्यें दिसून येणाऱ्या व भिकाऱ्यांच्या संस्थामध्ये दाखल झालेल्या भिकाऱ्यांच्या मुलाखती घेऊन माहिती मिळविली. तिच्या आधारावर त्यांनी लोक भिक्षा का मागतात या विषयी महत्वपूर्ण लेखन केले आहे. या प्रकरणामध्यें त्यांनी सांगितलेली भिक्षा मागण्याची कारणे येणे प्रमाणे आहेत.

१] जमिनीच्या मानाने वाढलेली लोकसंख्या.

२] इनामदारीने व सावकारीने कुळांची झालेली पिळवणूक.

३] जमिनीची वारसांत झालेली विभागणी, मोठाली कुटुंबे व शेतीच्या किफायतशीर नसलेल्या पद्धती.

४] कर्जबाजारीपणा.

५] दुष्काळ व पुरामुळे बेघर झालेल्या वसाहती व कुटुंबे.

६] गांजणारे व वस्ती सोडून पळावयास लावणारे साथीचे रोग.

७] कुटुंबप्रमुखाचा किंवा मिळवित्यांचा मृत्यू.

८] आई–बापांच्या व्यसनाधीनतेने किंवा अपराधित्वामुळे झालेली कुटुंबाची वाताहत.

९] कुटुंबातील स्त्री किंवा पुरुष निघून गेल्यास दुसऱ्यावर येऊन पडलेल्या सांपत्तिक व भावनिक जबाबदाऱ्या.

१०] बद्धमूल झालेले किंवा संहारक आजार.

११] अपघात, आजार, किंवा वंशपरंपरेने आलेले मानसिक किंवा शारीरिक दौर्बल्य.

१२] मुलामुलींना न शोभणारी वर्तणूक किंवा त्यांचे पळून जाणे.

१३] नोकरी मिळविण्यात आलेले अपयश.

१४] काम न करण्याची इच्छा.

१५] भीक मागायला लावणाऱ्या धार्मिक पद्धती किंवा नवस.

१६] मुलांना पळविणारे किंवा त्यांच्या भिक्षेवर जगणारे समाजकंटक.

१७] आपल्या मुलांना किंवा पाल्यांना भीक मागावयास लावून आपले उत्पन्न वाढविणारे अज्ञानी पालक.

१८] भिकाऱ्यांच्या मुलांना पालकाकडून मिळालेले भिक्षेचे बाळकडू.

१९] एकाद्यास उद्योग शिक्षणास, योग्य नोकरीस किंवा धंद्यास संधी न मिळणे.

२०] अपंग, परित्यक्त किंवा अनाथ यांच्यासाठी योग्य संस्थांची कमतरता.

२१] अपंगांच्या कल्याणासाठी सामाजिक सामर्थ्य एकवटावे लागणे यासाठी लागणाऱ्या सामाजिक जबाबदारीचा व नेतृत्वाचा अभाव.

२२] व्यक्तीस लोभविणारी, शहरी जीवनाची आकर्षणे.

२३] भारतांत कोठेही फुकट व स्वस्त प्रवास करण्याची शक्यता.

२४] संपूर्णपणे नशिबाचे आधीन होण्याची सामाजिक प्रवृत्ती.

२५] जीवनाकरितां भिक्षा मागणे हे फार कमीपणाचे नाही अशी भावना.

२६] कांही प्रकारच्या भिक्षेस, असणारी धार्मिक संमती.

ही खूप मोठी यादी संशोधनामधून निर्माण झाली आहे. या कारणाशिवाय आणखीही पुष्कळ कारणे देता येण्यासारखी आहेत. ती येणे प्रमाणे......

१] कुटुंबातील संघर्ष.

२] शहरातील नातलगांचा पत्ता न मिळणे.

३] चोरट्यांकडून पूर्णपणे लुबाडले जाणे.

४] दवाखान्यात जागा न मिळणे.

५] अस्थिर मन.

६] कुटुंबातील महत्वाच्या व्यक्तीचे मन अस्थिर होणे.

७] आजार, वृद्धत्व, अपंगत्व किंवा मानसिक अस्वास्थामुळे समाजाने व कुटुंबाने झिडकारणे.

८] जागेच्या अभावी कुटुंबियांनी दूर लोटणे.

९] कुसंगतीमुळे घर सोडणे.

१०] स्वतः गुन्ह्यांत सापडणे.

११] सावत्र आईचा त्रास.

१२] बापाचा आत्यंतिक तापटपणा.

१३] कुटुंबियांपैकी कोणाचेही अनैतिक वर्तन.

१४] स्वतःचे अनैतिक वर्तन.

१५] कुटुंबियास अमान्य असा प्रेमसंबंध.

१६] दंगे व जाळपोळ–भूकंप इत्यादी.

या व अशाच कारणांमुळे आज अनेक लोक रस्त्यावर भीक मागताना दिसत आहेत. आतापर्यंत निदर्शनास आणून दिलेल्या कारणांत बहुतेक कारणे सामाजिक व आर्थिक आहेत. कोणत्याही व्यक्तीस अशा विरोधी परिस्थितीत माघार घ्यावी लागते व अपयशामुळे मार्ग न सापडून भीक मागण्यावाचून गत्यंतर रहात नाही.

थोडक्यांत असे म्हणता येईल की बहुतेक भिकारी हे सामाजिक, मानसिक व आर्थिक परिस्थितीमुळे भीक मागत आहेत. समाजाचे ते घटक आहेत व त्यांना घटनेप्रमाणे घटक म्हणून सर्व अधिकार आहेत. मुख्यतः वाढत्या व बदलत्या समाजात योग्य त्या सुखसोयी निर्माण न झाल्यामुळे ते भिकारी आहेत. म्हणून त्यांना चांगले नागरिक बनविण्याचा प्रयत्न करणे ही समाजातील इतर सर्व घटकांची एक नैतिक जबाबदारी आहे. भिकारी हे नुसतेच समाजाचे घटक नाहीत. तर आपले आप्त आहेत. आपल्यासारख्याच कुटुंबाचे ते घटक आहेत. पण त्यांच्या कुटुंबातून ते स्थानभ्रष्ट झाले आहेत. या स्थानभ्रष्ट होण्यामागील कारणे विविध असली तरी त्यांच्यावर ते लोक मात करू शकत नव्हते, म्हणूनच ही परिस्थिती निर्माण झाली आहे. ते आपले देशबांधव आहेत व त्यांची काळजी घेणे हे आपले कर्तव्य आहे.

तरुण मुलगा असतानाच केरळमधील नारायण आपल्या मामाबरोबर ब्रह्मदेशात गेला होता. तेथे मामाचा मोठा उद्योग होता. तेथे काम करीत असताना त्याचे एका मुलीबरोबर प्रेमसंबंध निर्माण झाले. ही गोष्ट मामास समजल्यावर तो रागावेल म्हणून घर सोडून त्या मुलीबरोबर ब्रह्मदेशात इतर ठिकाणी तो राहिला. पण हे नीट चालले नाही. इतर वेश्यांशी संबंध आले व नारायणाला गुप्त रोगाने पछाडले. ही जुनी गोष्ट आहे. त्यावेळी गुप्तरोगांवर आताच्या सारखी रामबाण औषधे नव्हती. रोग खूप वाढला व त्याचा

शेवट म्हणजे नारायणाला अर्धांगवायूचा विकार जडला. जीभ खूप जड पडली व बोलता येईना. अशा परिस्थितीत तेथे भीक मागण्याशिवाय उपाय राहिला नाही. ब्रह्मदेशाने त्याला मद्रासला पाठवून दिले. नारायण लाजेने घरी गेला नाही. भारतात फिरत राहिला व भिकेवरच जगला. एके दिवशी त्याने वर्षानुवर्षे मनांत बाळगलेले हे दुःख एका संस्थेत मला सांगितले. त्याच्या माहितीप्रमाणे त्याच्या कुटुंबातील लोक फार शिकलेले व उत्तम परिस्थितीतील होते. नारायणाची खात्री झाली होती की त्याच्या या माहितीचा दुरुपयोग होणार नाही. त्याच्या घरी पत्र पाठविले. आठच दिवसांत, मामाचे पत्र आले की त्याचा भाऊ लवकरच त्याला भेटावयास येत आहे. व आश्चर्य म्हणजे मद्रासहून त्याचा भाऊ दिल्लीला जात असताना त्याला भेटण्याकरिता मुद्दाम मुंबईस विमानाने आला. त्यांची ती अविस्मरणीय भेट अजून माझ्या डोळ्यासमोर आहे. लायसेन्सवर सोडवून घेतल्यावर नारायणसुद्धा विमानाने घरी गेला.

डिमोलो हा बी. कॉम्. झालेला होता. एका मोठ्या बँकेत वरच्या दर्जाचे काम करीत होता. पण त्याला मधून मधून वेडाचे झटके येऊ लागले. या झटक्यांच्या काळात तो पडून रहात असे. मिळाल्यास खूप पीत असे. बँकेने खूप सांभाळून घेतले. पण एके दिवशी केसांच्या जटा झालेल्या, अंगावर अत्यंत मळके कपडे व तोंडाने सारखी बडबड चाललेली या परिस्थितीत पोलिसांनीं त्याला ताब्यात घेतले. योग्य त्या औषधोपचाराने तो खूप सुधारला व त्याला पुन्हा छोटेसे कामही मिळाले. त्याचेही नातलग खूप वरच्या थरातील होते. याही परिस्थितीत त्याच्या बहिणीशिवाय इतर कोणीच त्याला जवळ करीत नव्हते. बहीण व मेहुणा यांनी मात्र त्याला सहाय्याचा हात दिला.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळातील गोष्ट आहे. रॉड्रिग्ज हा एका युद्धनौकेवर पेटी ऑफिसर म्हणून काम करीत असे. हिंदी महासागरांत जपानी बोटींनी रॉड्रिग्जच्या बोटीवर टॉर्पेडो सोडला. बोट भयंकर मोठ्या स्फोटानंतर समुद्रात विखरून पडली. रॉड्रिग्ज समुद्रात जखमी होऊन पडला. त्याला वाचविले. त्याच्या जखमा बऱ्या झाल्या. पण त्या स्फोटाच्या आवाजाचा व परिस्थितीचा त्याच्या मेंदूवर फारच परिणाम झाला होता. रॉड्रिग्ज सारखा बडबड करीत होता. खोटे बोलून लोकांना बनवत होता व पैसे मागत होता. त्याची विकृती इतकी दृढमुल झाली होती की त्याला सुधारणे शक्य नाही असे मानस चिकित्सकांनी सांगितले.

चंद्रप्पा याचे लग्न आईच्या व मामाच्या इच्छेने त्याच्या मामे बहिणीशी झाले. मामा श्रीमंत व चंद्रप्पा गरीब होता. त्याला मामाकडे जाऊन रहावे लागले. मामाला घर जांबई

पाहिजे होता. चंद्रप्पावर त्याची पत्नी हुकुमत चालविण्याचा प्रयत्न करू लागली. चंद्रप्पा स्वभावाने तिखट होता. त्याला हे सहन झाले नाही. असलेले गिरणीतले काम त्याने सोडून दिले व भगवे कपडे परिधान करुन रुद्राक्षाच्या माळा घालून तो भारतात सर्व ठिकाणी फिरून आला. पूर्वी एकदा तो एका मेंटल हॉस्पिटलमध्यें दोन वर्ष आजारी होता व त्याला विजेचे धके देण्यात आले होते असे समजले. कुटुंबातील संघर्ष चंद्रप्पाच्या दृष्टीने शिगेला पोहोंचला होता म्हणून त्याने घरच सोडले. हा संन्याशी चंद्रप्पा आता पुन्हा उत्तम कामास लागला आहे. त्याचे कौटुंबिक संबंध सुधारत आहेत.

या उदाहरणावरुन दिसून येईल की एक व्यक्ती घर सोडून बाहेर निघण्यास व भीक मागण्यास पुष्कळ कारणे आहेत. पुष्कळदा अशा घटनेमागे एकापेक्षा अधिक कारणे असतात किंवा एका कारणातून दुसरी अनेक कारणे उद्‌भवतात. पण या सर्वांच्या मुळाशी आपली ' सामाजिक स्थिती ' हेच मूलभूत कारण आहे. व त्या कारणामुळेच या सान्या गोष्टी घडून येत असतात.

येथे आणखी एक महत्वाची सामाजिक परिस्थिती लक्षात आणून दिल्याशिवाय हे प्रकरण संपविता येणार नाही. आपल्या येथील लोकांची एकंदर वृत्ती धार्मिक अशीच आहे. धर्मावर श्रद्धा असणाऱ्यांची संख्या भारतात खूप मोठी आहे. 'गरिबांना दिल्याने आपल्याला परमेश्वर अधिक देईल' 'गरिबांची सेवा म्हणजे परमेश्वराचीच सेवा ', ' गरिबांना दिल्याने पुण्यसंचय होतो व पुण्यामुळे स्वर्ग मिळतो', दानाने परमेश्वर प्रसन्न होईल व आपल्या मनांतील इच्छा पुरी करील', अशा अनेक भावनांनी प्रेरित असा भारतीय समाज आहे. मद्रास येथे या बाबतीत घेतलेल्या संशोधनात्मक प्रबंधामध्ये असे आढळून आले आहे कीं मद्रासमध्ये सुमारे ८० टक्के लोक दानधर्म करतात. महाराष्ट्रात हे प्रमाण कदाचित थोडे कमी असेल पण मुंबईमध्ये दानधर्म किती केला जातो याविषयी जे आकडे प्रसिद्ध झाले आहेत ते विचारवंतालाही विचार करावयास लावतील असे आहेत.

बृहन्मुंबईत दरसाल रोख ३५ लाख रुपये दान केले जातात. अन्न, कपडे किंवा इतर वस्तूंचे दान वेगळे. या दानामध्ये संस्थांना दिलेले दान धरण्यात आलेले नाही. हे दान फक्त व्यक्तीना दिलेले आहे. या प्रचंड आकड्यावरून आपल्या दातृत्वाची कल्पना कांही अंशाने खचित येईल.

या परिस्थितीवरून व प्रत्यक्ष अवलोकनावरून असे जरूर म्हणता येईल की आपण भिकाऱ्यांना देत आहोत म्हणूनच भिकारी आहेत. किंबहुना ते वाढत आहेत.

याच संदर्भात असा एक विचार मांडण्यात आला होता कीं देणाऱ्यांना कायद्याने बंदी करावी काय ? अर्थातच देणाऱ्याच्या स्वातंत्र्यावर ही जबरदस्ती करण्याचे कायदा-मंडळाने नाकारले. या बाबतीत सर्वात महत्वाचा विचार मांडण्यात येतो तो म्हणजे योग्य ठिकाणी दान देण्याचे शिक्षण जनतेस देण्याचा, जो पैसा भिकाऱ्यांच्या हाती देण्यात येतो तो संस्थांना दिला तर त्याचा विनियोग अधिक चांगल्या प्रकारे करता येईल या कल्पनेचा.

# प्रकरण सोळावे

## भिकारी स्त्रिया व मुले

आतापर्यन्तच्या वर्णनात स्त्री व पुरुष असा भेदभाव केलेला नाही. सर्वसाधारण लागू पडणाऱ्या गोष्टींची माहिती देण्यात आली आहे. तरी सुद्धा या ठिकाणीं स्त्रियांबद्दल, तसेच त्यांच्याबरोबर सापडणाऱ्या मुलांबद्दल व इतर भीक मागणाऱ्या मुलांच्याबद्दल, कांही माहिती दिली नाही तर या विषयाच्या ज्ञानात अपुरेपणा राहील असे वाटल्यावरून ती येथे देण्यात येत आहे.

### स्त्रिया

आपण आरंभी फक्त स्त्रियांबद्दल विचार करू. आतापर्यंतची आकडेवारी पाहिली तर असे दिसून येईल की या कायद्याखाली सापडलेल्या स्त्रियांना सोडवून घेण्याची प्रवृत्ती अधिक आहे. अटक झालेल्यांपैकी सुमारे ३/४ स्त्रियांना कोणीतरी सोडवून घेते. याची कारणे थोडा विचार केला तर सापडण्यासारखी आहेत.

आपल्या समाजात आरंभापासून घरकाम हे स्त्रीचे क्षेत्र मानले गेले आहे. मुलगी थोडी मोठी झाली की घरकामाचा बोजा आई तिच्यावर टाकीत आली आहे. आता वाढत्या शिक्षणामुळे ही गोष्ट थोडी कमी झाली आहे. पण सर्वसाधारणपणे अजूनसुध्दा मुलीला घरकाम करावे लागते. त्यापुढे जाऊन असेही म्हणता येईल की तरुणपणीच काय पण म्हातारपणीसुद्धा स्त्रियांना घरकाम चुकलेले नाही. ज्या सास्वा किंवा स्त्रिया जहांबाज असतात त्याच बसून खातात. पण एरवी घरात स्त्रियांना नेहमीच काम करावे लागते. यामुळेच स्त्री ही घरात उपयोगाची वस्तू आहे. म्हातारी झालेली स्त्री घरात पुष्कळ कामे करु शकते, पण म्हातारा पुरुष घरात काम फारसे करीत नाही. अशा परिस्थितीत कोणत्याही वयाची स्त्री उपयुक्त वस्तू असल्यामुळे तिला सोडवून घेण्याचा प्रयत्न होत असावा असे वाटते. कदाचित हा मातृत्वाचा सन्मान असेल. ही स्त्री तरुण असेल तर तिच्याकडे पहाण्याचा दृष्टिकोन वेगळाही असण्याची शक्यता आहे. पण या कायद्याखाली पकडलेल्या स्त्रियांपैकी तीन चतुर्थांश स्त्रिया जामिनावर सुटून जातात हे एक सत्य आहे. या उलट असे निम्मे पुरूष जामिनावर सोडवून घेतले जातात.

आता अशा तऱ्हेने सर्व उपयुक्त स्त्रिया सोडवून घेतल्यानंतर कायद्याप्रमाणे स्थानबद्ध करण्यात आलेल्या स्त्रियांची आकडेवारी पाहिली तर असे दिसून येईल की त्यांतील सुमारे निम्म्या स्त्रिया वृद्ध किंवा अपंग असतात. सुमारे ७-८ टक्के स्त्रिया पूर्णपणे वेड्या असतात. अपंग, आजारी व बहिऱ्या, मुक्या बऱ्याच आहेत. गुप्तरोगाने पछाडलेल्या स्त्रियांची संख्या पुरुषांच्या मानाने अधिक आहे, हेही आकडेवारीवरून दिसून येईल. याचा अर्थ असा की हा सर्व भाग समाजाला अगदीच नकोसा झालेला असा व निरुपयोगी असतो. या बाबतीत आणखी एक गोष्ट नजरेस आली आहे ती म्हणजे या कायद्याखाली पकडण्यात आलेल्या बहुतेक सर्व स्त्रियांनी जगातील सर्व तऱ्हेच्या दुःखाचा पूर्ण घोट घेतलेला असतो. खंबीर मनाच्या स्त्रिया सोडल्यास बाकीच्या बहुसंख्य स्त्रियांच्या मनावर खोलवर दुष्परिणाम झालेले असतात. कांही पूर्णपणे वेड्या असतात, तर पुष्कळशा अर्धवट वेड्या असतात. याच कारणाने त्या समाजात व कुटुंबात नकोशा झालेल्या असतात.

स्त्रियांना सांभाळणारी शासकीय प्रमाणित संस्था महाराष्ट्र राज्यामध्ये एकच आहे व या संस्थेत एकावेळी सुमारे ३५० स्त्रिया असतात.

स्त्रियांच्या प्रकरणामध्ये चौकशी केली असता जीवनाचे अतिशय काळेकुट्ट चित्र डोळ्यापुढे येते. त्यांचे पुनर्वसनही पुरुषांचे मानाने जास्त अवघड असते.

कांही स्त्रियांजवळ लहान मुले असतात. ती त्यांचीच मुले असतात, पण त्यांच्या बापाचा पुष्कळवेळा तपास लागत नाही व लागला तरी त्याचा फारसा उपयोग नसतो. ही मुले जवळ जवळ अनाथ म्हणूनच सांभाळावी लागतात.

## भीक मागणारी मुले

स्वतंत्रपणे भीक मागणारी मुले खूप आहेत. मोठ्या शहरातून आगगाड्यातून वगैरे भीक मागणारी ६ ते १६ वयाची मुले दिसतात. त्यांना पूर्णपणे ताब्यांत घेवून सांभाळण्याची शक्ती कोणत्याच एका सरकारजवळ नाही. याचे कारण म्हणजे त्यांची अफाट संख्या.

आज रोजी भीक मागणाऱ्या मुलाला ( तो स्वतंत्रपणे भीक मागणारा असो किंवा आई बापाबरोबर भीक मागणारा असो ) मोठा झाल्यावर भीक मागायला लाज वाटणार नाही. ९९ टक्के तो भीक मागेल व त्याला होणारी मुले सुद्धा भीकच मागतील, अर्थात काही अपवादात्मक लोक सोडून असा हा अतिशय भेडसावणारा प्रश्न आज समाजापुढे उभा आहे. या विषयाबद्दल जनता फारसा विचार करीत नाही, पण सध्याची भिक्षेकऱ्यांची

संख्या कमी करण्यासाठी या भिकारी मुलांचा प्रश्न तातडीने हातात घेतला पाहिजे. हेही उद्याचे नागरिक आहेत. त्यांची काळजी घेतली गेली पाहिजे.

कोणी असे म्हणतील की मुंबई मुलांच्या कायद्याप्रमाणें अशी मुले पकडली जात आहेत व त्यांचे करिता हा कायदा प्रयत्नशील आहे. पण सत्य परिस्थिती अजूनही अशी आहे की या मुलांची संख्या खूप मोठी असून त्यातील अगदीच थोड्या मुलांची सोय या कायद्याप्रमाणे होत आहे.

गुन्हेगार प्रवृत्ती माणसात निर्माण होण्याची अनेक सामाजिक कारणे आहेत, असे गुन्हेगार शास्त्राने मान्य केले आहे. अशी कारणे या भिक्षा मागणाऱ्या मुलांच्या जीवनात खूप मोठ्या प्रमाणावर असतात. गुन्हेगारीस अत्यंत पोषक अशा वातावरणात लहानाची मोठी होणारी ही मुले पुढे गुन्हेगार झाली तर काहीच आश्चर्य नाही. अर्थात याबाबतीत प्रत्यक्ष काय झाले आहे किंवा आताचे गुन्हेगारांपैकी किती लोक पूर्वी भिक्षा मागणाऱ्या मुलांच्या वेशात फिरत होते या विषयी संशोधन करण्यासारखे आहे. पण हे गुन्हेगारीचे मुक्तद्वार आहे व या विषयी समाजाने काहीतरी करणे जरूर आहे. भिक्षेकऱ्यांची वाढती संख्या कमी व्हावी व पुढील गुन्हेगारीला आळा बसावा म्हणून या छोट्या भिकाऱ्यांना समाजाने वेळीच जवळ केले पाहिजे. शिक्षण देऊन समाज जीवनांत स्थान देऊन या मुलांच्या मनावर होणाऱ्या अनिष्ट परिणामापासून त्यांना वाचविले पाहिजे. मुंबई मुलांच्या कायद्यामध्यें हे कार्य करण्याची शक्ती जरूर आहे, पण या शक्तीचा उपयोग करून समाजातील पुढील आपत्ती टाळण्याचा दूरदर्शीपणा कार्यकर्त्यांच्या व प्रशासनाच्या ठिकाणी जाणकारांनी आणून दिला पाहिजे. प्रशासकांनी कार्याची योग्य दिशा दाखविली पाहिजे. एकंदर विचार करता असे जरूर वाटते की ही परिस्थिती निर्माण होण्याची वेळ जवळ आली आहे व या दृष्टीने पावलेही पडू लागली आहेत. मुलांचा प्रश्न खूप मोठा आहे. मुंबईमध्ये ३० टक्के १८ वर्षाखालील भिकारी मुले आहेत, असा डॉ. मूर्ती यांच्या पुस्तकात उल्लेख आहे. याचा अर्थ मुंबईत सुमारे १० वर्षापूर्वी ५–६ हजार भिकारी मुले होती. व या साऱ्यांना सांभाळणे शासनाला अवघड आहे. तरीही या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून भागणार नाही. जास्तीत जास्त मुलांना कायद्याचा फायदा देणे ही जरूरीची गोष्ट आहे.

या मुलांची संख्या किती आहे ? ती कशी जगतात ? त्यांना काही आजार आहेत काय ? त्यावर ते काही उपाय करून घेत आहेत काय ? ही मुले कोठून येतात ? लहान मुले घरदार सोडून कां आली आहेत ? या लहान मुलांना राज्य सरकार सांभाळण्यास समर्थ

आहे काय ? या साऱ्या व इतरही बाबीसंबंधी माहिती करून देईल अशी पहाणी केली जावी व या प्रश्नाबद्दल समाजाने काय केले पाहिजे, याचा विचार व्हावा.

भीक मागणाऱ्या मुलांचा प्रश्न अतिशय गंभीर आहे. समाज त्याबद्दल तितकासा जागा नाही. यांत्रिक युगाच्या आरंभी असा उद्रेक सहाजिकच आहे. आपल्या देशाच्या सांपत्तिक स्थितीचे हे हृदयद्रावक दृश्य आहे. हे लक्षात घेऊन या गोष्टीकडे विचारवंतांनी आपल्या शोधक नजरेने पाहिले पाहिजे. समाजशास्त्रज्ञांनी व राज्यकार्यकर्त्यांनी मार्ग शोधून काढले पाहिजेत.

# प्रकरण सतरावे

## तृतीयपंथी भिकारी

### ( हिजडे )

हिजडे हे नाव उच्चारल्याबरोबर एक विलक्षण आकृती डोळ्यापुढे दिसू लागते. संपूर्ण स्त्रीवेष परिधान केलेला पुरुष दिसू लागतो. भारतात या तऱ्हेचे लोक नेहमीच पहावयास मिळतात व आपण लहानपणापासून अशा व्यक्तींना पाहिले असल्यामुळे आपणाला त्यांच्याबद्दल विशेष असे फारसे वाटत नाही, पण खरोखरीच विचार करावयास लावील अशी ही व्यक्ती आहे.

कशासाठी हे पुरुष अशा तऱ्हेने स्त्री वेष धारण करतात ? केव्हापासून ही पद्धत सुरू झाली असावी ? कशामुळे ही रीत सुरू झाली असावी ? असे अनेक प्रश्न डोक्यात येतात.

या सामाजिक विषयावर फारसे लिखाण प्रसिद्ध झालेले नाही. तरी जे थोडे फार लिहिले गेले आहे व जे थोडेसे अनुभवाने गोळा झाले आहे त्याच्या आधारे थोडा विचार करू. हिजड्यांच्या व्युत्पत्तीचा विचार करू लागल्यास नाना तऱ्हेच्या गोष्टी मनात येतात. प्रत्येक मुलाची मानसिक वाढ होत असताना आरंभी ते मूल स्वतःवर प्रेम करू लागते, नंतर ते आपल्या आईवर प्रेम करू लागते, मग ते समलिंगी व्यक्तीवर प्रेम करू लागते व शेवटी मूल भिन्नलिंगी व्यक्तीवर प्रेम करू लागते. कांही मुलांच्या बाबतीत असे होते की या भावनिक वाढीमध्ये काही तरी व्यत्यय येतो व त्याच्यापुढे त्यांची भावनिक वाढ होवू शकत नाही. कांही लोकांची शारीरिक वाढ होता होता मध्येच काही व्यत्यय येतो व त्यापुढे ती होऊ शकत नाही. बौद्धिक वाढीचे सुद्धा असेच आहे. भावनिक वाढ थांबल्यामुळे कांही पुरुषांना स्त्री वेषांत रहाण्याची इच्छा होते. लहान मुलामध्ये ही भावना आपण अनेक वेळा पाहतो, पण त्याच मर्यादेवर भावनिक वाढ थांबल्यामुळे कांही पुरुष स्त्रीवेष धारण करतात. प्रत्येक देशात अशा तऱ्हेचे कांही पुरुष आहेत की ज्यांना स्त्री–वेष धारण करण्यात आनंद वाटतो तर अशा काही स्त्रिया आहेत की त्यांना पुरुषाप्रमाणे पेहराव करावयास आवडतो. या प्रकारच्या लोकांना इंग्रजीमध्ये Transvestites ( ट्रान्सव्हेस्टाइटस् ) असे म्हणतात.

स्त्री पुरुषांचे कपडे वेगळे झालेल्या वेळेपासून अशा तऱ्हेचे मानसिक विकृतीचे लोक निदर्शनास येऊ लागले असले पाहिजेत. अशा या पुरुषाला नुसता स्त्रीचा पोषाख घालून आनंद वाटतो असे नाही तर स्त्रीसारखे बोलावे, हालचाल करावी किंवा स्त्रियांच्या सारखे हावभाव करावेत अशी ही इच्छा होते. कांही पुरुषांना आपण स्त्री आहोत याची इतक्या उत्कटतेने व भावपूर्ण जाणीव झाली आहे की त्यांनी डॉक्टरांच्याकडे जाऊन ऑपरेशन करून घेऊन आपले जननेंद्रियसुद्धा काढून टाकले आहे.

या प्रकाराप्रमाणेच गर्भाची वाढ होत असताना कांही तरी गफलत होते. जन्माला आलेले मूल पुरुषासारखे दिसते पण ते पुढे वाढू लागले कीं त्याला स्त्रैणपणा येऊ लागतो. पुढे ऑपरेशन करून त्याला पूर्णपणे स्त्रीचे स्वरूप देता येते. तसेच बाह्यतः स्त्री म्हणून जन्मास आलेले मूल पुरुष होऊ शकते. याच प्रकारच्या लोकांना इंग्रजीमध्यें Hermofrodite असे नाव आहे. वर्तमान पत्रातून पुष्कळवेळा वरील दोन्ही प्रकारच्या लोकांचे बद्दल विस्मयकारक बातम्या प्रसिध्द होतात व जगाचे लक्ष कांही वेळ त्यामुळे या विषयाकडे वेधले जाते.

कांही पुरुष मुले जन्मतः अतिशय लहान किंवा कमकुवत जननेंद्रियाची असतात. हा दोष पुढेही तसाच कायम राहिल्यास अशा मुलांना काही भारतीय आईबाप हिजड्यांना देऊन टाकतात. पूर्ण पुरुष नसल्यामुळे ते पुढे संसार करू शकत नाहीत. या मुलांना आरंभापासून स्त्रीवेष देऊन हिजडे लोक आपल्या टोळीतून फिरवतात.

वरील विवेचनावरून असे दिसून येईल की पुरुष असून स्त्री वेष धारण करणारे लोक जगाच्या पाठीवर सर्व देशात आहेत पण स्त्रीच्या भूमिकेशी संपूर्णपणे समरस होण्याकरिता मर्यादा आहेत. या मर्यादेतील महत्वाची अडचण म्हणजे पुरुषाचे जननेंद्रिय. अर्थातच त्याचा त्याग किंवा विच्छेदन हाच त्याच्यातील शेवटचा उपाय. अशाच तऱ्हेने पूर्णपणे स्त्रीत्व जरी नसले तरी नपुंसकत्व लोकानी प्राप्त करुन घेतले असावे.

भारत व मध्य आशिया खंडात मध्यंतरीच्या काळात जे अनेक राजे लोक होते त्यानी मोठमोठाले जनानखाने ठेवलेले होते. हे जनानखाने सांभाळण्याकरिता अशा नपुंसक लोकांचा उपयोग करून घेतला जाई. पण पुढे हे जनानखाने नाहिसे झाले व अशा लोकांच्या चरितार्थाचे साधन काय असा प्रश्न पडला. मध्य आशिया प्रदेशात धर्म ही महत्वाची संस्था प्रस्थापित झाली. भारतामध्यें ज्या धार्मिक कल्पना होत्या त्यानुसार या तऱ्हेच्या लोकांनी स्वतःचे कांही आचार ठरवून घेतले व दैवतेही ठरविली. जनतेने अर्थातच या कार्यात साथ दिली. या प्रकारातूनच आजचा "हिजडा" हा प्रकार जन्मास

आला असावा असे वाटते. अशा एकट्या-दुकट्या प्राण्यास जीवन असह्य झाले असावे व म्हणूनच त्यातून संघ निर्माण झाला असावा.

त्या काळात आपल्या देवतेला स्वतःला सर्वांत प्रिय गोष्ट अर्पण करणे जरूर असे. या पंथात पूर्णपणे सामील होण्याकरिता जननेंद्रिय देवतेला अर्पण करण्याची पद्धत निर्माण झाली असावी. भक्तिभावाचा हा परमोच्च बिंदू मानण्यात आला. प्राचीन संस्कृती असलेल्या सर्व देशात निरनिराळी दैवते होती. मुख्यतः पंचमहाभूतांनाच देवता मानण्यात येत असे. या देवतांना खूष करण्याकरिता अनेक वस्तू देण्यात येत असत. प्राचीन इतिहासावरून दिसून येते की जिवंत प्राणी किंवा मानवाचे सुद्धा बलिदान करण्यात येत असे. अशा पुरुषांनी आपले जननेंद्रिय पूर्णपणे कापून अर्पण करण्याची पद्धत सुद्धा त्याच जुन्या विचारसरणीतून निर्माण झाली असावी. गुजरात राज्यात बेचराजी म्हणून दैवत आहे. बेचाराजी देवी समोर हिजड्याची पूर्णपणे दीक्षा घेणाऱ्यास आपले जननेंद्रिय अर्पण करावे लागते. डॉ. मिस्. प्राईस यांनी त्यांच्या निबंधामध्ये या प्रसंगाचे थोडक्यात वर्णन केले आहे ते असे.

"आरंभी त्यांना काही काळापर्यंत या पंथातील विचारसरणीचे शिक्षण देण्यात येते. मग आरंभीच ठरविलेल्या दिवशी त्यांना वेदना कमी करणारे द्रव्य पेयातून व खाण्याच्या पानातून देण्यात येते. धार्मिक मंत्रपठनामुळे बुध्दिभ्रंश ( Brain washing ) करण्यात येतो. तो मातादेवीकडे तोंड करून उभा असतो, त्याचे पाय अलग असतात, त्याने बाजूला आधार घेतलेला असतो व तो एका विलक्षण देहातील परिस्थितीत प्रार्थना करीत असतानाच त्याचे जननेंद्रिय अंडा-सकट कापण्यात येते."

पण आपल्याकडील सध्याचे हिजडे हे स्वतः होवून या प्रकारास प्रवृत्त होत नाहीत हे निश्चित. सर्वच हिजडे हे स्वतः आंतरिक इच्छेने हिजडे झालेले नसतात. बालपणापासूनच, त्यांनी तसे व्हावे म्हणून त्यांच्यावर संस्कार केले जातात व आता यातून उपाय नाही म्हणून ते पुढे जन्मभर हिजडेच राहतात.

महाराष्ट्रात जे हिजडे आहेत त्यात मुख्यतः दोन प्रकार मानता येतील. पहिला प्रकार हे बेचराजी देवीचे भक्त व दुसरा प्रकार म्हणजे खंडोबा, तुळजापूर भवानी व यल्लम्मा देवीचे भक्त. पहिल्या प्रकारात गुजरात किंवा राजस्थानातील लोक असतात, त्यापैकी बरेच लोक मुसलमान स्त्रियासारखा वेष करतात. दुसऱ्या प्रकारातील लोकांना मराठी नाव आराधी व जोगी असे आहे. हे भाषा मराठी बोलतात व वेष महाराष्ट्रीय पद्धतीचा करतात.

बेचराजी देवीचे भक्त हे अर्थातच मधून मधून गुजरात राज्यात बेचराजी देवीच्या दर्शनाला जातात. महाराष्ट्रातील आराधी व जोगी हे खंडोबास जेजुरीला व अंबाबाईच्या दर्शनाला तुळजापूरला जातात. कधीकाळी यल्लम्मा देवीलासुध्दा जातात.

आता यातल्या पहिल्या प्रकारच्या हिजडे लोकांची परंपरा कायम कशी रहाते किंवा वाढते आहे या विषयी विचार करू. लहान चांगली दिसणारी मुले पळविणे हे या लोकांचे एक काम आहे. नपुसक मुले पालकांनी दिली नाहीत किंवा मुले पळवून आणली नाहीत तर हा पंथच नाहीसा होईल. हिजड्यांना मुले होत नाहीत. घर सोडून पळून गेलेल्या मुलांना हे लोक आधार देतात. शक्यतो चांगल्या व नाजूक दिसणाऱ्या मुलांच्यावर यांचा डोळा असतो. अतिशय चांगल्या कुटुंबातील मुले सुद्धा अशा रीतीने या पंथात सामील झालेली दिसून आली आहेत. हा पंथ फार भयानक आहे व त्यात एकदा अडकलेला प्राणी बाहेर ओढून काढणे फारच अवघड आहे. आरंभी अशा मुलांना आपल्या गाण्याच्या ताफ्यात बरोबर नेतात. गाणी गायला लावतात. ढोलके वाजवायला व नाचायला पण शिकवतात. पुढे स्त्रियांच्या पद्धतीने मुद्दाम हालचाल करावयास लावून हळू स्त्रियांचे कपडे घालतात. कांही पुरुषांना समलिंगी संभोगात रस वाटतो व अशा पुरुषांचे भक्ष्य ही मुले ठरतात. मुंबईमध्ये तर स्त्रीविक्रया प्रमाणे पुरुष विक्रयही चालू आहे. लखनौ वगैरे भागात हा शौक विशेष आहे असे म्हणतात. काहीही असो पण अशा अनैसर्गिक स्त्रीजीवनात ही मुले खेचली जातात. हिजड्यांच्या या ताफ्यांना मुसलमान समाजात लग्नसमारंभात गाण्याचे निमंत्रण देण्यात येते. गाणे, नाच व अंगविक्षेपाकरिता चांगली बिदागी मिळते. असा आहे हिजड्यांचा जीवनवृत्तान्त. वृध्दाना काही काळ पर्यंत हा संघ सांभाळतो. तरी वेडेपणा किंवा अती वृध्दत्व आल्यावर इतर भिकाऱ्याप्रमाणे भिक्षा मागण्याशिवाय गत्यंतर नसते. हे लोक तरुणपणी सुध्दा भीक मागत असतात. पण ही भीक पुरुषांनाच काय पण स्त्रियांना सुध्दा अवघडच होते. हे कोणत्याही पुरुषाचा हात पकडून दुसरा हात तोंडापुढे वेळावून पैशाची मागणी करतात. तोंड पानाने लालभडक झालेले. तोंडावर पावडर व रूझ सारख्या प्रसाधनांची लयलूट झालेली. पण न लपणारी निबर कातडी. दाढीमिशी खरडून काढलेली व डोळ्यातील काजळाने नाजुकपणा ओढून ताणून आणलेला. पैसे देण्याशिवाय उपायच नाही. उघडा आपले पाकीट . . . . पैसा दोन पैसा नाही. दहा पंधरा पैसे देऊन आपली सुटका करून घेणे प्राप्त आहे. असे आहे हे वेगळे भीक मागणे. भीक कशाची! एक प्रकारची दरोडीखोरीच! पण काय आरडा ओरडा सुध्दा करता येत नाही.

मुंबईमध्ये अशा प्रकारच्या सुमारे १०० हिजड्यांना भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणे

पकडण्यात आले होते व त्यांच्या विषयी सर्व चौकशी करण्यात आली. त्यांना निरनिराळ्या प्रमाणित संस्थात पाठविण्यात आले. त्यांच्या शारीरिक तपासणीत आढळून आले की ते सर्वच्या सर्व पूर्ण पुरूष म्हणून जन्मास आले होते; पण यातील कांही लोकांची जननेंद्रिये कापलेली आढळली.

बेचराजी देवीच्या पुढे जो जननेंद्रिय कापण्याचा समारंभ करतात त्यात मृत्यू सुध्दा येण्याची शक्यता आहे. भारतीय दंड विधाना प्रमाणे या गुन्ह्यास विशेष शिक्षा देता येईल काय ? याचा विचार झाला आहे. मृत्यू आल्यास कलम ३०२ प्रमाणे व मृत्यू न आल्यास ३२६ प्रमाणे कोर्टात फिर्याद दाखल करता येईल.

या हिजड्यांच्या जीवनात गुरफटलेला पुरूष स्त्रियांच्या चालीने व रीतीने चालू लागतो. ही सवय एवढी दृढ होऊन जाते की. त्यांना रोज कवायत करावयास लावून सुद्धा फारसा फायदा होत नाही. शिवाय पुरूष समागमाची सवय झाली असल्यामुळे त्यांना पुरुषांच्या संस्थातून किंवा स्त्रियांच्या संस्थातून सांभाळणे मोठे अवघड असते. त्यांचाच एक मोठा विभाग असेल तर वेगळे अशा २–४ जणांना इतराबरोबर सांभाळणे म्हणजे एक मोठे दिव्य आहे. या साऱ्यांचे पुनर्वसन बालवयातच केले तर जमण्यासारखे आहे. पुढे हे अवघड आहे.

हिजड्यांच्या दुसऱ्या प्रकाराबद्दल आता थोडा विचार करू.

आराधी व जोगी हे महाराष्ट्रांत जागजागी आहेत. पुण्यांत यांची संख्या सुमारे १७५ आहे. जोगी पंथात स्त्रियाही आहेत. धार्मिक कार्य म्हणून परड्या भरणे, लिंब नेसविणे वगैरे गोष्टी हे लोक करतात. तसेच एकाद्याला सहजासहजी बरा न होणारा कातडीचा रोग झाल्यास तो देवाचा आजार आहे असे समजून तो भाग समारंभपूर्वक चाटला जातो. या सर्व कामाकरिता त्यांना बिदागी मिळते. याशिवाय बेलभंडार लावून नैमित्तिक भीक मागण्याचे काम हे लोक करतात.

आराधी लोकांच्यामध्ये साडीवाले व बिगरसाडीवाले असे दोन प्रकार पुरुषात आहेत. साडीवाले हे कायम साडी-चोळी नेसतात. तर बिगरसाडीवाले प्रसंगीच साडीचोळी नेसतात. व भीक मागतात. किंवा परडी भरायला अथवा लिंब नेसवायला जातात. बिगर-साडीवाल्यातोला लोक बहुतेक लग्ने करीत नाहीत; पण इतर कष्टाची कामे करून चरितार्थ चालवितात. यातील काही लोक पुण्यात चांगले कारागीर म्हणून कामे करीत आहेत. याच पंथात बाया आहेत त्यांना जोगी म्हणतात. त्यासुद्धा हेच धार्मिक विधी करतात व पैसे मिळवितात. त्याना पाहिजे असल्यास त्या कोणत्याही पुरुषाच्या आश्रयाने रहातात असे

म्हणतात. खरे पाहिले असताना हा उघड वेश्या व्यवसायच आहे. त्यांच्या मुली जोगी होतात तर मुलगे आराधी होतात.

याशिवाय आपल्याकडे खालच्या समाजात नवस मागून झालेली मुले किंवा नपुसक मुले देवाच्या नावाने सोडून देण्याची किंवा आराध्यांना देऊन टाकण्याची पद्धत आहे. अशी सोडून दिलेली मुले आराधी, जोगी, वाघे किंवा मुरळ्या होतात. याच मूळ प्रकारातून आराधी व जोगी यांची वाढ होत आहे. जोगी स्त्रियांची मुले व नवसाने देवाला वाहिलेली मुले, यातून हा पंथ जिवंत राहिला आहे.

अशा तऱ्हेने नवसाने जन्मलेली किंवा नपुसक मुलेसुद्धा सोडून देऊ नयेत अशा प्रकारचा प्रचार खालच्या व अशिक्षित समाजात केला पाहिजे. व त्यांच्यासमोर हिजड्यांची विदारक चित्रे उभी केली पाहिजेत. म्हणजे त्यांच्या मनावर योग्य परिणाम होईल. कोणत्याही आईबापांना आपल्या मुलाची झालेली ही स्थिती आवडणार नाही.

आराधी व जोगी लोक पुण्यात चतुश्रृंगीच्या देवळात बेलभंडार देऊन पैसे मागतात. त्यांना नवरात्रात विशेष प्राप्ती होते. इतर वेळेस घरोघर जाऊन व रस्त्याने दुकानात भीक मागतात. त्यांना पैसे व खाद्य वस्तूंचा जोगवा मिळतो. हिजडे हे सारे भिकारीच आहेत. पण भिकाऱ्यातील एक विशेष पंथ म्हणून त्यांच्याबद्दल ही माहिती दिली आहे. ही माहितीसुद्धा अतिशय त्रोटक आहे पण या विषयाचा पूर्ण अभ्यास करणाऱ्यास सखोल माहिती मिळू शकेल.

या लोकांच्या पुनर्वसनाचा प्रश्न वाटतो तेवढा सोपा नाही. तो आर्थिक, सामाजिक, मानसशास्त्रीय व वैद्यकीय असा आहे. तरी सुद्धा मुलांना देवाच्या नावाने सोडून देणे ही गोष्ट थांबविली पाहिजे. मुले पळविणे यावर विशेष लक्ष दिले पाहिजे. बेचराजीच्या देवळावर व 'दाई' म्हणविणाऱ्या हिजडे धर्मगुरुवर लक्ष ठेऊन शस्त्रक्रिया थांबविल्या पाहिजेत. हिजड्यांच्या ताब्यातील लहान मुलांना ताबडतोब सोडविले पाहिजे. त्या मुलांचे पुनर्वसन केले पाहिजे. ज्या तरुण हिजड्यांना काम करून पोट भरण्याची इच्छा असेल त्यांना कामे उपलब्ध करून दिली पाहिजेत. तसेच ज्यांना व्यापार उदीम करण्याची इच्छा व बुद्धी असेल त्यांना थोडे पैसे कर्जाऊ देऊन ते त्याचा उपयोग नीट करतात किंवा नाही हे पाहिले पाहिजे. तरुण जोगी मुले-मुली ताब्यात घेऊन त्यांचे पुनर्वसन करावे. जी मुले नीट शिकत नसतील त्यांनाही ताब्यात घेऊन बाल सुधार केंद्रामार्फत त्यांच्या जीवनाची दिशा बदलावी.

समाजाने या लोकांचे बाबतीत व विशेषतः मुलांच्या बाबतीत निष्क्रिय व स्थितप्रज्ञ भूमिका सोडून वरील दिशेने हालचाल करावी याची जरूर आहे.

# प्रकरण अठरावे

## कुष्ठरोगी भिकारी

या ग्रंथाच्या शेवटी दिलेल्या आकडेवारीवरून दिसून येईल की आतापर्यंत पकडून स्थानबद्ध केलेल्या भिकाऱ्यांच्या संख्येच्या १० टक्के लोक कुष्ठरोगी होते. तसेच ज्या सरकारी व निमसरकारी संस्था कायद्याने प्रमाणित केलेल्या आहेत त्या संस्था-मधून जास्तीतजास्त ४२३० लोकांना ठेवण्याची सोय असली तरी सुद्धा अनेक कारणांमुळे ही संख्या साधारणपणे ३५०० च्या सुमारास असू शकते. यापैकी सुमारे ८२५ लोक कुष्ठरोगी असतात. परंतु प्रत्यक्षात ५५० ते ६०० लोक कुष्ठरोगी असतात. म्हणजेच एकंदर संख्येच्या १/६ संख्या कुष्ठरोगी भिकाऱ्यांची असते. याचाच अर्थ असा की सध्या जे कार्य चालू आहे त्यातील १/६ लोक कुष्ठरोगी आहेत असे नव्हे.

संपूर्ण भारतात सुमारे २० लाख कुष्ठरोगी आहेत व त्यातील सुमारे १ ते २ लाख भिकारी आहेत. अर्थात त्यातील किती कुष्ठरोगी भिकारी मुंबई पुण्यात आहेत हे सांगता येणार नाही. भारतातील एकंदर कुष्ठरोग्यापैकी १/१० भिकारी आहेत तर इतर सर्व कुष्ठरोगी समाजातच आहेत. समाजातील इतके लोक कुष्ठरोगी आहेत ही गोष्ट सर्वसामान्य जनतेला माहित नाही.

आपल्या शहरात व इतर गावात जे भिकारी आहेत त्यात ह्या भिकाऱ्यांचे प्रमाण मोठे आहे. पुष्कळ वेळा बाह्यतः जे भिकारी सुदृढ वाटतात ते कुष्ठरोगी आहेत असे वैद्यकीय परीक्षेत आढळून येते. इतकेच नव्हे तर वैद्यकीय परीक्षेतही ज्या माणसाबद्दल संशय वाटणार नाही असा माणूस कुष्ठरोगी असल्याचे आढळून आले आहे. एक अनु-भवाचे उदाहरण सांगता येईल. एक तरुण गोरा गोमटा सशक्त मुलगा भिकारी म्हणून पकडला गेला. त्याच्या टाचेला जखम होती म्हणून तो लंगडत असे. अतिशय स्वच्छता बाळगणाऱ्या त्या मुलाला अनेक वेळा सरकारी दवाखान्यात पाठविले. तेथे असे आढळून आले की त्यापूर्वी सुद्धा बरेच दिवस तो मुलगा सरकारी दवाखान्यात त्याच जखमेकरिता दाखल झाला होता व तेथील कर्मचारी त्याला ओळखत असत. २-३ वेळा त्याच्या टाचेचे ऑपरेशन करण्यात आले पण ती जखम भरून येईना. शेवटी कोणाला तरी शंका वाटली व त्याच्या जखमेजवळील कातडीची

परीक्षा करण्यात आली व त्याला कुष्ठरोग असल्याचे आढळून आले. त्याच्या अंगावर एकसुद्धा चट्टा नव्हता किंवा हातापायावरील किंवा शरिरावरील कोणत्याच भागावरील संवेदना नाहिशा झालेल्या नव्हत्या. कांही वेळा हा आजार एवढा छुपा रहातो. अर्थातच हळू हळू तो आपले स्वरूप प्रगट करू लागतो. त्या मुलाला पुढे योग्य उपचार सुरू केले. त्याच्या पायाची जखम हळू हळू भरून आली. हा अल्सर किंवा सतत चरत जाणारा व्रण आहे. हे आरंभी उत्तमोत्तम डॉक्टरांच्यासुद्धा लक्षात आले नाही.

पांढुरक्या रंगाचे चट्टे हे कुष्ठरोगाचे प्राथमिक बाह्य लक्षण आहे. अशाच प्रकारचे चट्टे 'अ' जीवनसत्वाच्या अभावामुळे, कांही त्वचेच्या आजारात किंवा काही अन्य कारणानेही येतात. पण या कारणामुळे ती चट्टयांची जागा स्पर्शशून्य होत नाही. कुष्ठरोगाच्या चट्ठयांच्या ठिकाणी स्पर्शभावना बहुसंख्यवेळा नाहीशी होते व हे चट्टे हळूहळू लहान किंवा मोठे होतात. हे प्राथमिक लक्षण दिसताच ताबडतोब योग्य अशा डॉक्टराकडून तपासून घ्यावे व त्यांच्या सांगण्याप्रमाणे औषधे घ्यावीत.

सुमारे २०–२५ वर्षांपूर्वी कुष्ठरोगावर 'सल्फोन' हे औषध परिणामकारक असल्याचा शोध लागला या औषधामुळे हा आजार पूर्णपणे बरा होतो. पण हे औषध डॉक्टरांचे सल्ल्याप्रमाणे नियमित घेणे जरुर आहे. ४–५ वर्षांत सर्वसाधारण रोगी पूर्णपणे बरा होतो. औषध घेण्यास अगदी आरंभीच्या काळातच सुरुवात केल्यास आजार लौकर बरा तर होतोच, पण शरिरावर व्यंगही निर्माण होत नाहीत. कुष्ठरोग हा असा विलक्षण आजार आहे की त्यामुळे हातापायाच्या बोटावरील व चेहऱ्यावरील विकृती, आजार बरा झाला तरी दुरुस्त होऊ शकत नाही. उदाहरणार्थ हाताची बोटे झडून गेली किंवा आखडून गेली तर ती पुन्हा पाहिल्यासारखी होत नाहीत. अर्थातच आता 'प्लास्टिक सर्जरी' किंवा 'रीकनस्ट्रक्टीव्ह सर्जरी' या शस्त्रक्रियेमुळे पुष्कळ मोठ्या प्रमाणावर विकृत झालेले अवयव दुरुस्त करता येतात पण याला सुद्धा मर्यादा आहेत. तसेच हातापायातील स्पर्शज्ञान मोठ्या प्रमाणावर नाहिसे झाले असेल तर त्यातही फारशी सुधारणा करता येत नाही. चेंबूर येथील भिक्षेकरी स्वीकारकेंद्रात अशा प्रकारच्या अनेक कुष्ठरोगी भिकाऱ्यावर शस्त्रक्रिया करून त्यांना सुखी करण्यात आले आहे व अजूनही हे कार्य अव्याहत चालू आहे.

हजारो वर्षांपासून हा रोग मानवाला त्रास देत आहे. या रोगाबद्दल अनेक गैरसमजुती आहेत. व आजार अनुवंशिक आहे, बापाचा आजार तिसऱ्या पिढीत उद्भवतो. कांही विशिष्ट तऱ्हेचे अन्न सेवन केल्यामुळे तो जडतो, सर्प चावल्यामुळे हा आजार बरा

होतो, हा आजार कधीच बरा होत नाही, अशा अनेक कल्पना जगभर पसरलेल्या आहेत. अनेक वर्षे हा आजार कशामुळे होतो हे न सुटलेले कोडे होते. पण डॉ. हेनसन नावाच्या शास्त्रज्ञाने या रोगाचे जंतू शोधून काढले व तेव्हापासून हा आजार जंतूमुळे होतो हे सिद्ध झाले आहे. कुष्ठरोग्यांच्या क्षेत्रात काम करणारे लोक या आजाराला Hansen's Disease असे म्हणतात, व लेप्रसी असा शब्द वापरीत नाहीत. 'सल्फोन' हे औषध सुमारे २०–२५ वर्षांपूर्वी शोधून काढण्यात आले आहे. या औषधाने हा आजार पूर्णपणे बरा होतो असे अनेक प्रयोगातून सिद्ध झालेले आहे.

कुष्ठरोगाने माणूस तडकाफडकी मरत नाही. पण हळूहळू अपंग होत जातो व अतिशय विद्रूप दिसू लागतो. त्याच्याकडे बघून घृणा निर्माण होते. म्हणूनच या आजाराविषयी भयंकर दहशत मानवाच्या मनात आहे. ही दहशत हजारो वर्षांपासून आहे व ती अजूनही कमी झालेली नाही. या दहशतीमुळेच कुष्ठरोग झालेल्या इसमाला समाज लांब ठेऊ लागतो. या सामाजिक परित्यक्ताचा एक विलक्षण परिणाम या लोकांच्या मनावर होतो. हे लोक समाजातून लांब जातात पण ते सर्व एकत्र येतात व फार लौकर एक स्वतंत्र समाज बनवू शकतात. त्यांच्यामध्ये एक तऱ्हेचे ऐक्य किंवा संघभावना ताबडतोब निर्माण होते. मानवाला गिळू पहाणारे व आत्यंतिक त्रास देणारे अनेक रोग आहेत. पण त्या कोणत्याच रोग्यांचे अशा तऱ्हेचे स्वयंसिद्ध संघ निर्माण होत नाहीत. कुष्ठरोगाचे हे एक वैशिष्टय आहे. या वैशिष्टयामुळे अशा लोकांच्या संस्था चालविणे हे अतिशय जिकीरीचे व त्रासदायक होते. या दुःखितांची सहभागिता ( Felloship of the Sufferers ) फार भक्कम असते व ती आपल्या संस्थेत स्थापन होऊ नये यासाठी जागरूकतेने सारखे प्रयत्न करावे लागतात. थोडेसे दुर्लक्ष झाल्यास ही सहभागिता एकदम उग्र स्वरूप धारण करते हे प्रमाणित संस्थांच्या इतिहासात प्रामुख्याने दिसून आले आहे.

कुष्ठरोग हा संसर्गाने पसरणारा आजार आहे. पण हा संसर्ग दीर्घकालीन व अगदी निकटचा असावा लागतो. सांसर्गिक रोग्याकडून विशेषतः लहान मुलांना अधिक भीति असते.

ज्या समाजाने त्यांना दूर लोटले आहे त्याच्यावर सूड उगविण्याची बुद्धी काही कुष्ठरोग्यांचे ठिकाणी निर्माण झालेली असते व मग आपल्याला असलेला रोग सर्वांना लागावा असा ते प्रयत्न करतात. अर्थातच असा रोग इतरांना सहजा सहजी होत नाही हे एक मोठे भाग्यच समजले पाहिजे.

कुष्ठरोगाबद्दलची सर्वसाधारण माहिती मुद्दामच वाचकांच्या माहितीकरिता दिली आहे. कारण या क्षेत्रांत काम करणाऱ्या कार्यकर्त्यांना या रोगाबद्दल काही प्राथमिक माहिती असणे जरूर आहे.

कुष्ठरोगी भिकारी हा भिकारी असतो व कुष्ठरोगीही असतो. कुष्ठरोगाचे प्रमाण सध्या घटते आहे की वाढते आहे हे सांगणे कठीण आहे. पण एवढे बाकी म्हणता येईल सध्या महाराष्ट्राच्या कांही जिल्ह्यामध्ये कुष्ठरोग्यांचे प्रमाण हजारामागे १० ते १५ इतके मोठे आहे. हजार संख्येच्या गावात १०–१२ कुष्ठरोगी सापडणे ही खरोखरीच काळजी करण्यासारखी परिस्थिती आहे. आरोग्य खाते या दृष्टीने प्रयत्न करीत आहे व त्यांनी ठिकठिकाणी रोगी तपासण्याची व फुकट औषधोपचार करण्याची केंद्रे काढली आहेत. कुष्ठरोगाच्या खाणाखुणा एकाद्याच्या शरिरावर दिसू लागल्या की घरातील बहुतेक सर्व माणसे त्याच्यापासून दूर रहातात व शेवटी सारेच दूर सरू लागल्यामुळे तो घर सोडून जातो. बाहेर त्याला भीक मागावी लागते किंवा मग अशाच रोग्यांनी निर्माण केलेल्या वस्त्यांच्या आधाराला जावे लागते. भारतात कुष्ठरोग्यांना मदत करणाऱ्या २०० वर संस्था आहेत. पण त्या संस्थात प्रवेश मिळणे बरेच अवघड आहे, असे दिसून आल्यावर तो इसम कुष्ठरोगी वस्तीमध्यें राहू लागतो. किंवा मग रस्त्यात भीक मागू लागतो. याचाच अर्थ असा कीं कुष्ठरोगी भिकारी हा आरंभी केवळ रोगी असतो. त्याला रोगी म्हणून आरंभी औषधोपचार मिळणे जरूर असते. पण औषधोपचार व आसरा न मिळाल्यामुळे तो भटकू लागतो व शेवटी भिकारी ही संज्ञा त्याला प्राप्त होते. म्हणूनच असे म्हणता येईल की कुष्ठरोग बरा न झालेल्या भिकाऱ्यांचा प्रश्न हा मूलतः आरोग्य खात्याचा आहे. हा रोग पूर्णपणे बरा झाल्यावर रोग्याच्या पुनर्वसनाचे कार्य समाजकल्याणाचे आहे. एकंदरीत पहाता या कार्यामध्ये आरोग्य व समाजकल्याण खात्यांनी हातात हात घालून काम करावयास हवे. तरच या जटिल प्रश्नाची सोडवणूक करण्याची शक्यता निर्माण होईल.

रस्त्यावरील अपंग व विद्रूप अशा कुष्ठरोगी भिकाऱ्यांची तपासणी केल्यास असे दिसून येते की त्यांच्यातल्या बऱ्याच जणात रोगजंतू नाहीत. या रोग्याचा रोग दुसऱ्याला लागण्याची शक्यता फार कमी असते. रस्त्यातील असे भिकारी पाहून अगदी सहाजिकच सर्वसामान्य नागरिकांना वाटते की या रोग्यापासून इतरांना संसर्ग होईल पण प्रत्यक्षामध्ये परिस्थिती तशी नसते. पुष्कळवेळा औषधामुळे किंवा रोगाचा प्रतिकार करण्याची शक्ति निर्माण झाल्यामुळे या रोग्यामधील रोगजंतू नाहीसे झालेले असतात. पण त्यांच्या शरिरावर विकृती शिल्लक राहिलेल्या असतात. या विकृतीमुळेच ते सांसर्गीक रोगी असावेत असे सर्वसामान्यांना वाटत असते. यातील बरेच दग्धरोगी ( burnt out ) असतात.

कुष्ठरोगी भिकारी पकडून आणणे हे एक जिकीरीचे काम आहे. रोग्यांना पकडून मोटारीत घालणे हे वाटते तितके सोपे नाही. शिवाय पकडणारे पोलीस हे निरोगी असल्यामुळे त्यांना मनातून भीति वाटत असते. कुष्ठरोगी भिकाऱ्यांचपैकी बऱ्याच लोकांना संस्थांचा अनुभव असतो. अनेक संस्थामधून ते फिरून आलेले असतात. त्यामुळे स्थिरप्रवृत्ती त्यांच्यात कमी असते. औषधे घेऊन बरे व्हावे याची फार तीव्र जाणीव कदाचित त्यांच्या ठिकाणी नसावी. शिवाय बरे झालेल्या रोग्यालाही समाज जवळ करीत नाही याची त्यांना कटू जाणीव असते. कदाचित त्यांना भीक मागण्यास कुष्ठरोग हे एक साधन वाटत असावे व हे जीवनाचे साधन गमावण्यास ते तयार नसावेत. किंवा या आजारातून आता मुक्तता नाही, कशाला आता औषधांचा व्याप अशी निराशामय विचारसरणी निर्माण होत असावी. शिवाय जीवनातील आनंद नाहिसा झाला असल्यामुळे वैषयिक जीवनाकडे विशेष ओढ निर्माण होत असावी व त्या जीवनाकरिता किंवा स्वतंत्र जीवनाकरिता ते भटकत असावेत. किंवा संस्थामध्ये सुद्धा त्यांना ओढून ठेवील असे जीवन मिळत नसावे. किंवा या औषधोपचारासाठी एकाच दवाखान्यात ४–५ वर्षे रहाण्याचा व समाजाला आचवण्याचा कंटाळा आल्यामुळे जीवनातील स्थैर्य किंवा मानसिक स्वास्थ सारखे डळमळून ते संस्था सोडीत असावेत. कारणे कोणती हे निश्चित नसले तरी त्या लोकांच्या ठिकाणी एकाच जागी राहून आपला आजार बरा करून घेण्याची फार तीव्र इच्छा नसते हे खरे आहे.

जीवनात लपविण्यासारखे किंवा जतन करण्यासारखे काहीही राहिले नसल्यामुळे हे लोक व्यक्तिकार्यकर्त्यासमोर उभे राहून आपल्या मनातील विचार व खरी परिस्थिती फार लौकर सांगतात असा अनुभव आहे. इतर भिकाऱ्यांच्या मानाने कुष्ठरोगी भिकाऱ्यांची चिकित्सा करण्यास वेळ कमी लागतो व त्यांनी दिलेली माहिती बहुतेक खरी असते असे दिसून आले आहे.

प्रमाणित संस्थामधून कुष्ठरोगी भिकाऱ्यांना प्रथम औषधोपचाराने बरे करणे हे काम करावे लागते. नंतर त्यांच्या शारीरिक विकृती दूर करण्यासाठी हातापायांचे मालिश करणे, योग्य व्यायाम करून घेणे, अग्नी व जखमा यांचेपासून हातापायांची काळजी घेणे, वगैरे, गोष्टींचे ज्ञान त्यांना द्यावे लागते. हातापायातील स्पर्शज्ञान नाहिसे झाले असल्यास त्यावर जखमा होतात व त्या लौकर बऱ्या न झाल्यामुळे त्यांचे चरत जाणारे व्रण तयार होतात. याच कारणामुळे हातापायांची बोटे मुख्यतः झडून जातात. योग्य काळजी घेतल्यास निरोगी होऊन किंवा विकृती दुरुस्त होऊन हे लोक प्रमाणित संस्थेतून बाहेर पडतात. पण 'पुढे काय' हा एक अजून उत्तर न सापडलेला भयानक प्रश्न शिल्लक रहातोच.

या लोकांचे पुनर्वसन कसे करावे ? आजार नाहिसा झाला, विकृती कमी झाली तरी समाज त्या माणसाला जवळ करीत नाही. मग त्याने कुठे रहावे व चरितार्थासाठी काय करावे ? कुष्ठरोगी पुरुष व स्त्रियाही अशाच स्थितीत असतात. ते एकत्र येतात. पूर्वीच्या जीवनावर पडदा टाकतात. नवे जीवन सुरू करतात. पण वरील दोन प्रश्न त्यांच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने महत्वाचे न सुटणारे आहेत. संस्था काढून त्यांचे पुनर्वसन करण्याचे प्रयत्न चालू आहेत. या कार्यातील गुणदोष इतिहास ठरविणार आहे. या अत्यंत अवघड समस्येची उकल करण्याचा प्रयत्न करणाऱ्या कार्यकर्त्यांना परमेश्वराने सुयश द्यावे हीच प्रार्थना आहे.

# प्रकरण एकोणिसावे

## प्रशासन: तंत्र व मंत्र

प्रशासन ही भारतामध्यें नवी गोष्ट नाही. कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्यें प्रशासनाबद्दल मोठ्या प्रमाणावर माहिती देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे भारतातील मोगल व इतर राज्यकर्ते यांनी प्रशासनाच्या तंत्रात अनुभवाने व हुशारीने भर घातली पण ब्रिटिश राज्यसत्तेच्या काळात भारतियांवर राज्य करण्यात आले व या काळात मोठ्या प्रमाणावरील प्रशासन भारतियांना कांही प्रमाणात नाहिसे झाले होते. तरी सुद्धा कॉंग्रेससारखी संस्था वाढवून, तिला गतिमान करून, तसेच शक्तिमान बनवून आपण आपल्या प्रशासनाची चुणूक दाखवून दिली आहे. १९४२ साली गांधीजींनी 'चलेजाव' ची घोषणा करून त्या प्रशासनाची कसोटीच पाहिली. स्वातंत्र्यप्राप्ती हा त्या भारतीय प्रशासनाचा परमोच्च बिंदू होता. म्हणजेच भारतियांना प्रशासन काही नवे नाही, पण शास्त्र म्हणून त्याचा अभ्यास फारच थोड्यांनी केला होता. साऱ्या जगाचा इतिहास हा जगातील प्रशासनाचा गाभा आहे व आता जे प्रशासनाचे शास्त्र बनत आले त्या शास्त्राचे मूळ आधारस्तंभ या इतिहासातून प्राप्त झालेले आहेत.

आता प्रशासन म्हणजे तरी काय हे पाहू. श्री. एम्. रत्नस्वामी यांनी लिहिलेल्या "Principles and Practice of Public Administration" या पुस्तकात प्रशासनाची जी व्याख्या केली आहे तिचा स्वैर अनुवाद पुढीलप्रमाणे... "मानवाच्या एका संघाच्या कल्याणाच्या, स्वास्थाच्या किंवा कामाच्या योजना कार्यान्वित करण्याकरिता एका किंवा अनेक व्यक्तींनी केलेले एक किंवा अनेक कार्ये. या कार्यांच्या मागे एक तऱ्हेची शक्ति असून या कार्यात त्या संघाचे भवितव्य अभिप्रेत असते." प्रशासन हे आता एक शास्त्र झालेले आहे. त्यात आता स्थळ, काळ व वेग या मर्यादांचा गणिताच्या साह्याने अभ्यास झाला आहे. PERT व CPM या प्रशासनाच्या अत्याधुनिक पद्धती शोधून काढण्यात आल्या आहेत. पाश्चिमात्य पुढारलेल्या देशातच नव्हे तर भारतातसुद्धा प्रशासन शिकवणाऱ्या संस्था आहेत. प्रशासनाबद्दल नवी नवी माहिती देणारी मासिकेसुद्धा जगभर प्रसिद्ध होत आहेत.

प्रशासन हे नुसतेच शास्त्र आहे असे नसून ती एक कलाही आहे. भारतात आता पर्यंत लागणारे प्रशासन मुख्यत्वेकरून कायदा व व्यवस्था टिकवून धरण्याला उपयुक्त असे होते. पण आता यांत्रिक युगाच्या वाढीबरोबर मोठमोठाल्या कारखान्यांमध्ये व कंपन्यांमध्ये प्रशासनतज्ञांची खूप मोठी मागणी आहे. शासनात प्रशासनास अनन्य साधारण असे महत्व आहे. विधिमंडळ, न्यायदान व प्रशासन अशी शासनाची प्रमुख अंगे आहेत. ही तिन्ही अंगे एकमेकावर अवलंबून व एकमेकाशी निगडित आहेत. त्यांच्यात तरतम असा फरक करता येणार नाही. असे म्हणता येईल की आतापर्यंतच्या इतिहासात विधिमंडळ नसताना किंवा न्यायदान नसताना देशांचे कारभार काही काळ चालले आहेत. पण प्रशासनाशिवाय देशात स्वास्थ टिकत नाही, प्रशासनावाचून देशात कारभार थोडा काळ-सुद्धा टिकू शकत नाही. प्रशासन जेवढे कार्यक्षम व जनताभिमुख तेवढा समाजातील सर्वात गरीब जनतेला फायदा अधिक. म्हणूनच समाजातील सर्वात खालच्या थरातील व्यक्तीचे सुरक्षित व स्वास्थमय जीवन हे उत्तम प्रशासनाचे गमक होय.

प्रशासनाचे शास्त्र योग्य तऱ्हेने वापरण्यासाठी प्रशासकास इतर बरीच शास्त्रे अवगत होणे जरूर आहे. समाजशास्त्र, मानसशास्त्र, अर्थशास्त्र, जनतेचे मानसशास्त्र व कामगारांचे मानसशास्त्र इत्यादी शास्त्रे, जाणणाऱ्याला प्रशासन शास्त्र लौकर अवगत करून घेता येईल, पण एवढ्याने भागणार नाही. प्रशासकाजवळ जास्तीत जास्त सर्वसामान्य ज्ञान असले पाहिजे. शासनाची जी गुंतागुंतीची प्रशासनव्यवस्था आहे तिचे वरपासून खालपर्यंत ज्ञान प्रशासकास जरूर आहे. प्रशासनाचे शास्त्र अगदी थोडक्यात समजून घेण्यासाठी त्याची मुख्य सूत्रे कोणती आहेत त्याचा आपण विचार करू.

## अधिकाराचे सूत्र

प्रशासन करण्याकरिता प्रशासकाला काही अधिकारांची जरूर असते. हे अधिकार तीन प्रकारचे आहेत आहेत.

१) कायद्याने प्राप्त झालेले.

२) प्रशासकाच्या विशिष्ट स्थानाने प्राप्त झालेले.

३) प्रशासकाचे स्वतःच्या व्यक्तिमत्वामुळे निर्माण झालेले.

प्रशासक असलेल्या प्रत्येक व्यक्तीला काही अधिकार त्या स्थानाबरोबर प्राप्त झालेले असतात. हे अधिकार बहुतेक कोणत्यातरी कायद्याने मिळालेले असतात. हे अधिकार अर्थातच मार्गदर्शक स्वरुपाचे असतात व त्यात प्रत्येक गोष्ट दिलेली नसते. प्रशासकाने

दिलेला हुकूम सेवकाने पाळावा असे जरी असले तरी कोणता हुकूम पाळावा व कोणता हुकूम पाळू नये हे कायद्यात दिलेले नसते. अर्थातच प्रशासक व सेवक यांच्या परस्पर संबंधावर हे पुष्कळसे अवलंबून असते. त्यातील तिसरा भाग म्हणजे प्रशासकाचे व्यक्तिमत्व, त्याचे ज्ञान, त्याचा अनुभव, त्याच्या व्यक्तिमत्वाचे नैतिक मूल्य या सर्व गोष्टींवर प्रशासक व सेवक संबंधातील हुकूम व त्याची अंमलबजावणी ही अवलंबून असतात. पण या करिता खालील तीन गोष्टींची जरूरी आहे. १ ) हुकूम देणारा एकच असणे. २ ) हुकूमाची स्थिरता. व ३ ) हुकुमाचे स्वातंत्र्य.

## १. हुकूम देणारा एकच असणे

हुकूम देणारा प्रशासक हा एकच असावा. एकादी संस्था किंवा मंडळ यांच्याकडून प्रशासकाने माहिती घ्यावी. त्यांच्याबरोबर विचारविनिमय करावा, पण हुकूम मात्र त्याने एकट्यानेच द्यावा. एकट्याने दिलेल्या हुकुमाचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण असेच असते.

## २. हुकूमाची स्थिरता व सातत्य

हुकूम दिल्यानंतर त्या हुकुमात बदल न करणे चांगले. त्यात बदल होण्याची शक्यता असेल तर तो हुकूम पाळण्याचे बाबतीत टाळाटाळ होते. दिलेला हुकुम स्थिर राहील व त्याचे सातत्य टिकून राहील याची काळजी प्रशासकाने आरंभापासूनच घेतली पाहिजे.

## ३. हुकुमाचे स्वातंत्र्य

हुकुम देणाऱ्या प्रशासकावर त्याच्यावरील अधिकाऱ्याचे नियंत्रण असावे परंतु प्रशासकाला आपला अधिकार वापरण्याचे पूर्ण स्वातंत्र्य असावे. त्याच्या अधिकारामध्ये वरिष्ठाने सारखी ढवळाढवळ करू नये. एखाद्या प्रशासकाच्या कामामध्ये वरिष्ठांची सारखी ढवळाढवळ असेल तर प्रशासक चांगले काम करू शकत नाही व त्याच्या प्रशासनाच्या अधिकाराचा बोजा रहात नाही. प्रशासक व त्याच्यावरील अधिकारी यांनी आपल्या मर्यादेबाहेर जाण्याचे प्रसंग टाळल्यास दोघाही प्रशासकांच्या कामाचा बोज राहतो.

आणखी एक गोष्ट आहे. कर्मचारी किंवा हाताखालील लोकांना प्रशासकाबद्दल आदर वाटला पाहिजे. पण आदर मिळवावा लागतो. प्रशासकाचे ज्ञान, दृष्टिकोनाची विशालता, चारित्र्य, केलेल्या सूचनांची उपयुक्तता व हाताखालील सेवकांची खात्री करणे, तसेच त्यांचा विश्वास संपादन करणे, यामुळे आदर निर्माण होतो व टिकून राहतो. या आदरामुळे हुकुमाची अंमलबजावणी चांगली होते. तसेच दिलेला हुकूम हा त्वरित खाल-

पर्यंत गेला पाहिजे. त्यात कोणताच व्यत्यय येता कामा नये. ही यशस्वी प्रशासनाची गुरूकिल्ली आहे.

## आज्ञाधारकपणा व शिस्त ही तत्वे

अधिकाराच्या तत्वातून आज्ञाधारकपणा व शिस्त या दोन तत्वांचा उदय होतो. अधिकाराच्या योग्य वापरामुळे शिस्त निर्माण होऊ शकते, पण दुरुपयोग केल्यास ती मोडली जाते. शिस्तीचे उत्तम प्रकारे पालन होण्याकरिता प्रशासकाने दिलेले हुकूम हे हुशारीने व सर्वसामान्य ज्ञानाचा उपयोग करून दिलेले असावेत. ज्यांच्यावर हुकमत चालवायची त्यांचे बौद्धिक समाधान प्रत्येक हुकमामुळे व कृतीमुळे होणे जरूर आहे. शिस्त उत्तम राहिल्यास आज्ञाधारकपणा चांगला रहातो व शिस्त चांगली रहाण्यास शिक्षेची भीति असणे जरूर असते. शिक्षेच्या भीतिमुळे शिस्त व आज्ञाधारकपणा सदोदित चांगला रहातो.

## कर्तव्य व हित ही तत्वे

प्रशासक अधिकारी किंवा नोकर यांना आपल्या कर्तव्याची जाणीव असावी यासाठी त्यांचे हित पहावयास पाहिजे. काम करणारी किंवा करवून घेणारी ही माणसे आहेत व त्यांना स्वतःचे हित अधिक प्रिय असते. म्हणूनच त्यांनी चढाओढीने आपले कर्तव्य करावे, प्रसंगी स्वार्थत्याग करावा यासाठी बोनस, कमिशन, भत्ते वगैरे प्रलोभने त्यांच्यासमोर ठेवावीत. पण या गोष्टी जनहिताला बाजूला सारून करू नयेत एकाद्या अधिकाऱ्याने चांगले काम केल्यास उघडपणे त्याचा गौरव करावा किंवा त्याच्या हिताची एकादी गोष्ट करावी. परंतु त्याला लाच घ्यायला प्रवृत्त करू नये. ही प्रवृत्ती त्वरित दूर करावी. प्रशासकाचे हित चांगल्याप्रकारे पहावे व त्याच्याकडून उत्तम कर्तव्याची अपेक्षा करावी.

## जबाबदारीचे तत्व

केलेल्या कामाचा जाब देणे म्हणजेच जबाबदारी. आपल्या कामाबद्दल जाब देण्याचा प्रसंग येवू नये म्हणून प्रशासक आपली सर्व शक्ति पणास लावतो. कोणत्याही गोष्टीवर निर्णय देण्यापूर्वी ती गोष्ट बारकाईने पहातो, तपासतो, विचार करतो व नंतरच त्यावर निर्णय देतो. जबाबदारीची भीति तोफेच्या गोळ्याप्रमाणे असते असे एक फ्रेंच प्रशासक व मुत्सद्दी त्येर हा म्हणतो. धडाडीची माणसे पुष्कळवेळा धाडशी निर्णय घेतात तर कमकुवत माणसे जबाबदारीस भितात. ज्या माणसाच्या ठिकाणी स्वयंनिर्णयाची किंवा नेतेपणाची शक्ती आहे अशाच माणसाकडे अधिकाराची कामे सोपवावीत. त्याच्या मर्यादेत त्याला पूर्ण स्वातंत्र्य असावे. ज्याला अधिक अधिकार असतात त्याच्यावर अधिक जबाबदारी

असते. अधिकार जितका मोठा तेवढी जबाबदारी मोठी उत्तम प्रशासनासाठी जबाबदारीची व्यवस्थितपणे विभागणी करावी.

## सुसूत्रतेचे तत्व

सध्याच्या प्रशासनामध्ये खूप प्रकारच्या अनेक विभागावर एकाच व्यक्तीस नियंत्रण ठेवावे लागते. एकाच प्रशासकाला हे नियंत्रण ठेवावे लागत असल्यामुळे या सर्व विभागामध्ये एकोपा निर्माण करणे ही फार महत्वाची बाब आहे. कांही विभाग वरचे व कांही विभाग खालच्या दर्जाचे असतात तर काही विभाग सारख्या दर्जाचे असतात. यातील सर्व अधिकारी व नोकर यांना त्यांच्या दर्जाने वागवून त्यांच्या कार्यात सुसूत्रता, एकोपा, एकमेकाविषयीचा जिव्हाळा, विचारांची देवाण-घेवाण या साऱ्या गोष्टी निर्माण करण्याचे कौशल्य प्रशासकाजवळ असावे लागते. कामाच्या सोईच्या दृष्टीने हे विभाग जरी वेगवेगळे केलेले असले तरी कार्य हे एकच असते. हे विभाग जितक्या सलोख्याने व समजुतदारपणाने कामे करतील तितके कार्य चांगले घडून येते.

## कामाच्या विभागणीचे तत्व

प्रशासनाचे कार्य जेवढे मोठे तेवढे त्यात वैचित्र्य अधिक असते. काम एक असले तरी कामाचे विभाग पाडावेच लागतात. एकाद्या कारकुनाला एकाच वेळी अनेक प्रकारचे काम करावयास सांगितले तर त्याला कोणतेच काम नीट येणार नाही. यासाठी या कामाची नीट विभागणी करून निरनिराळ्या विभागाकडून निरनिराळी कामे करून घेणे क्रमप्राप्त होते.

कामाची विभागणी केल्याशिवाय कामाचा दर्जा वाढत नाही व त्यामुळे एकत्रित कामाचे गोंधळ टाळता येतात.

काही प्रकारचे काम इतर कामापेक्षा थोड्या वेगळ्या प्रकारचे, अधिक किचकट ( उदाहरणार्थ - आकडेमोडीचे ) असते. अशावेळी त्या कामाचा विभाग वेगळाच ठेवणे हे अधिक श्रेयस्कर असते. विशेषतः पैशाच्या देवाणघेवाणीचे व पत्रव्यवहाराचे विभाग वेगवेगळे असावेत. काही वेळेस कामाची विभागणी ही काही तत्वावर केली जाते. उदाहरणार्थ - सर्वसाधारण प्रशासन व न्यायदान ही खाती सत्तेचा दुरूपयोग होऊ नये म्हणून व न्यायदान योग्य व्हावे म्हणून वेगळी केलेली आहेत. काही प्रकारच्या कामात काही वैशिष्ट्ये असतात व ती टिकवून ठेवण्या करिता त्यांची खाती वेगळी ठेवावी लागतात.

उदाहरणार्थ–संशोधनाचे कार्य व रोजचा पत्रव्यवहार. संशोधनाचे कार्य वैशिष्टयपूर्ण असते म्हणून पत्रव्यवहाराशी त्याची सांगड घालू नये.

## अधिकार श्रेणींचे तत्व

एकाद्या मोठ्या ऑफिसमध्ये किंवा फॅक्टरीत सर्वजण सारखेच असले, म्हणजे त्यांच्यात मुख्य कोण व कनिष्ठ कोण हे निश्चित नसेल तर काय होईल याची कल्पनाच केलेली बरी. या सर्व प्रकाराला गोंधळ हेच नाव व या गोंधळात काम केव्हाच होत नाही. तेव्हा सर्व संस्थांमधून, फॅक्टऱ्यांमधून किंवा सरकारी कचेऱ्यांमधून एकाखाली एक अशा क्रमाने माणसे कामावर ठेवली जातात. सर्वांत वर एक प्रशासक असतो व त्याच्या हाताखाली विभागीय प्रशासक असतात. त्यांच्या हाताखाली शाखाप्रमुख असतात. व त्यांच्या हाताखालच्या कर्मचाऱ्यांची उतरती क्रमवारी लावलेली असते. क्रमवारीप्रमाणे अधिकार कमी कमी होत जातात. या श्रेष्ठ कनिष्ठात कोठेही गोंधळ राहिल्यास. त्याचा दुष्परिणाम कामावर होतो व सारावेळ भांडणात जाऊ लागतो म्हणून हे तत्व महत्वाचे आहे.

## न्यायबुद्धीचे तत्व

आपल्या बाबतीत जी काही कारवाई होत आहे ती न्यायबुद्धीवरच आधारित आहे असा विश्वास अगदी वरच्या प्रशासकापासून तो खालच्या कर्मचाऱ्यापर्यंत सर्वांना वाटला पाहिजे. ही भावना सर्वांच्या मनात ठसलेली असली तरच प्रशासकाला उत्तम प्रकारचे कार्य करून घेता येईल. म्हणजेच, त्याने स्वतः न्यायबुद्धीने वागले पाहिजे व इतरांना तसे वागण्यास लावले पाहिजे. या महत्वपूर्ण तत्वाबरोबरच आणखी तीन महत्वाचे भाग प्रशासनात समाविष्ट झालेले आहेत. ते येणे प्रमाणे–

१. नियोजन

२. अर्थसंकल्प

३. प्रतिवेदन

## १) नियोजन (Planning)

भारतात पंचवार्षिक योजना बनत आहेत व त्यातून सर्वांगीण प्रगतीचे प्रयत्न चालू आहेत. म्हणून नियोजन हा शब्दप्रयोग सर्वांना समजणारा झाला आहे. नियोजन करण्याकरिता प्रशासकाला संपूर्ण प्रश्नाची माहिती असणे जरूर आहे. हा प्रश्न सामाजिक असेल तर त्या प्रश्नाच्या व्युत्पत्तीपासून किंवा समस्या निर्माण होण्याच्या कारणाचे त्याचप्रमाणे या

प्रश्नाची सोडवणूक टप्याटप्प्याने कशी करता येईल याचे शास्त्रीय ज्ञान प्रशासकाने करून घेतले पाहिजे. तसेच या नियोजनाचे परिणाम समाजावर कसे होणार आहेत याची तांत्रिक व शास्त्रशुद्ध माहिती प्रशासकाने करून घेतली पाहिजे व मगच नियोजन करता येईल. नियोजन म्हणजे एकादी व्यक्ति कल्याणाची किंवा समाज कल्याणाची योजना हळू हळू प्रसृत करून तीं समाज हितासाठी राबविणे. एकदा विचारपूर्वक केलेले नियोजन अढळ असावे, त्यात बदल करू नये.

## २) अर्थसंकल्प ( Budgetting )

योजना खूप मोठी करता येईल पण आपल्याजवळ त्या कार्याकरिता पैसा पाहिजे. कोणत्या कामाला कसा, केव्हां व किती पैसा लागेल याची कल्पना प्रशासकाने वास्तवपूर्ण विचाराने केली पाहिजे. शेख महंमदी राज्यासारखे हवेतले संकल्प चालत नाहीत. पैसे कोठून व कसे उभे करावयाचे हेहि प्रशासकाला विचारपूर्वक ठरवावे लागते. अर्थसंकल्प तयार करताना मागील परिस्थितीची वास्तववादी कल्पना करावी लागते. इतिहासाचा आढावा घेऊन भविष्य ठरवावयाचे असते. यात समाजाचे अधिकाधिक हित हीच भावना असावी व तो अधिक वास्तववादी बनविण्याचा प्रयत्न असावा. चालू कामाची संपूर्ण कल्पना व नवीन नियोजनास लागणारा खर्च याच्या अभ्यासातून चांगला अर्थ-संकल्प तयार होतो. नियोजन व अर्थसंकल्प हे अशा तऱ्हेने जोडलेले आहेत.

## ३) प्रतिवेदन ( Reporting )

काय घडत आहे याची पद्धतशीर नोंद ठेवणे हे फार महत्वाचे कार्य आहे. कार्य होत असताना काही कार्य अपेक्षेप्रमाणे होते तर काही कार्य अपेक्षेपेक्षा अधिक चांगले किंवा वाईट होते. बऱ्या किंवा वाईट कामाची नोंद करून ठेवावी लागते. आढावा घेऊन चुकांची पुनरावृत्ती होऊ नये इकडे लक्ष द्यावे लागते तसेंच चांगल्या कामाचे बीज कशात आहे हे जाणून घ्यावे लागते. या सर्व गोष्टींसाठी झालेल्या कामाची नोंद करून ठेवणे फार महत्वाचे आहे. शिवाय वेळोवेळी कार्य कोठवर आले आहे व कसे चालले आहे याबद्दल कार्यकारिणीस, मुख्य प्रशासकांस किंवा जनतेस माहिती पुरविता येते. या साऱ्या दृष्टिकोनातून प्रतिवेदन हे महत्वपूर्ण आहे.

प्रशासन ही एक शक्ती आहे व तिचा प्रयोग बोललेले शब्द, लिहिलेले शब्द, वाक्ये, पत्रे, टिपण्या व फाईल्स यांच्या मधून होतो. प्रत्यक्ष बोलण्यामधून त्या शक्तींचा मोठा प्रभाव पडतो. या सर्व साधनांचा प्रशासकाने योग्य उपयोग करून घेतला पाहिजे.

प्रशासनाबद्दल मराठीतून फारच थोडे वाचायला मिळते. प्रशासनाचे काम अजाणतेपणी खूप लोक करीत आहेत. स्वभावाच्या, बुध्दीच्या किंवा व्यक्तिमत्वाच्या प्रभावामुळे पुष्कळ लोकांचे प्रशासन यशस्वी होते. पण प्रशासनाची जगन्मान्य मूलभूत तत्वे कोणती आहेत ती प्रत्येक प्रशासकास माहित असावीत. प्रत्येक प्रशासक म्हणजे खूप मोठा अधिकारी असतो असे नाही. कुटुंबप्रमुख कुटुंब चालवितो ते सुद्धा एक प्रशासन कार्यच आहे. शाळेत शिक्षक किंवा कॉलेजात प्राध्यापक विद्यार्थीना शिकवितात व सांभाळतात हे सुद्धा प्रशासनच आहे. छोट्या छोट्या क्षेत्रात प्रशासन चालू आहे. पण हे प्रशासन असून त्यामागे काही शास्त्र आहे याची जाणीव फार थोड्यांना असते. या दृष्टीने अगदीच थोडक्यात प्रशासनाच्या मुख्य तत्वांचा उल्लेख येथे केला आहे.

समाजकल्याण खात्यातर्फे अनेक तऱ्हेच्या संस्था चालविण्यात येतात. काही संस्था शैक्षणिक स्वरूपाच्या आहेत, तर काही सुधार प्रशासनाच्या आहेत. सुधार प्रशासनात रिमांड होम, प्रमाणित शाळा, भिक्षेकऱ्यांची आदान केंद्रे, प्रमाणित संस्था, इत्यादी संस्था आहेत. आफ्टर केअर हॉस्टेल्स, सराइत गुन्हेगारासाठी वसाहती, टाकून दिलेल्या अर्भकांना सांभाळणाऱ्या संस्था, त्याचप्रमाणे परित्यक्ता, पतिता किंवा अडचणीत सापडलेल्या स्त्रिया व मुलींना सांभाळणाऱ्या संस्था आहेत. या सर्व संस्था चालविण्यासाठी प्रशासन तंत्राची माहिती असणे जरूर आहे. प्रशासन तंत्राचा उपयोग फक्त ऑफिस किंवा फॅक्टरीतच होतो असे नाही तर अशा संस्था चालविण्यातही होतो. या शिवाय या संस्थां-मधून काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांचे प्रश्न हाताळण्याकरिताही या तंत्राचा उपयोग होतो.

## परस्पर संबंधाचे किंवा संपर्काचे तत्व (Communication)

कोणतेही कार्य करीत असतांना प्रशासकाला संस्थेतील कर्मचारी व संबंधित व्यक्ती व बाहेरचा समाज या सर्वांशी सुरळीत व संथ असा संपर्क ठेवणे जरूर आहे. हा संबंध किंवा संपर्क जितका चांगला, अखंडित किंवा न बोचणारा असेल तेवढे प्रशासन चांगले होते. संस्थेमध्ये प्रचार व अपप्रचार हे एक सारखे चालू असतात म्हणून प्रशासकाने स्वतःचे किंवा खात्याचे आदेश हा नेहमी कर्मचाऱ्यांना किंवा संबंधित व्यक्तींना लौकरात लौकर व योग्य शब्दात व योग्य पद्धतीने दिले पाहिजेत. नाहीतर प्रशासनात अडथळे निर्माण होऊ लागतात व प्रशासकाच्या हुकुमांचे वेगवेगळे अर्थ लावण्यात येतात. परिणामी संस्थेतील विश्वासाचे वातावरण बदलू लागते व कामे नीट होत नाहीत. या सर्व दृष्टींनी हे परस्परसंबंधाचे किंवा संपर्काचे तत्वही अतिशय महत्वाचे आहे.

संस्थांमध्ये काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या दृष्टीने हे प्रशासन तंत्र उपयोगी असेल,

पण तेथे रहाणाऱ्या 'इनमेटसूच्या' दृष्टीने कसे उपयोगी आहे? भिक्षेकऱ्यांच्या संस्थांच्या दृष्टीने विचार केला असता दिसून येईल की आतापर्यंत अनेक वेळा या संस्थामधून दंगे झाले आहेत व कांही वेळा ते उग्र स्वरुपाचे सुद्धा होते. भिकारी हा गरीब बिचारा, लुळापांगळा प्राणी आहे, तो दंगा काय करणार असे सर्वसामान्यास वाटेल. परंतु परिस्थिती अगदी निराळी आहे. सुदृढ भिकाऱ्यांनीच नव्हे तर कुष्ठरोगी भिकाऱ्यांनीही दंगा केला आहे. ते काही काळ संस्था ताब्यात घेऊ शकतात. याचाच अर्थ असा की संस्था आंधळ्याची असो, पांगळ्याची असो, कुष्ठरोग्यांची असो किंवा सुदृढ भिकाऱ्यांची असो, जर प्रशासन तंत्राचा उपयोग योग्य प्रकारे केला तर असे अवघड प्रसंग टाळता येतात.

संस्थामधील काही कर्मचारी अर्ध शिक्षित अथवा चांगल्या संस्कारापासून वंचित असतात. पुष्कळवेळा त्यांना स्वार्थ हा प्रमाणापेक्षा अधिक प्रिय होतो व त्यामुळे ते कामामध्ये कुचराई करतात, अप्रामाणिकपणा करतात किंवा एकादी वाईट गोष्ट करण्यास मागे पुढे पहात नाहीत. संस्थेतील 'इनमेटस्' ना चिथावणीसुद्धा दिली जाण्याची शक्यता असते. या सर्व परिस्थितीची जाणीव ठेऊन प्रशासकाने जपावयास हवे व प्रशासन तंत्रांचाच अवलंब करावयास हवा. प्रमाणित शाळात मुलीनीसुद्धा दंगे किंवा उठाव केल्याची उदाहरणे आहेत. या सर्व गोष्टी टाळण्यासाठी विशेष काळजी घेणे जरूर आहे. सर्वसामान्य ज्ञानाच्या जोरावर आपण या गोष्टी टाळण्याचा नेहमीच प्रयत्न करीत असतो. तरीसुद्धा अशा गोष्टी पुष्कळवेळा अपघातासारख्या होत असतात. हे अपघात टाळण्यासाठी या शास्त्राचा जरूर उपयोग होण्यासारखा आहे. संस्थामधून शिस्त कशी ठेवावी, नोकरवर्ग किती अंतरावर ठेवावा, इनमेटस् व नोकरवर्ग यांचे संबंध किती प्रमाणात ठेवावेत, इनमेटस् नोकरांचेकडून कशी वागणूक मिळावी या सर्व गोष्टी व्यक्तीव्यक्तीच्या बाबतीत पाहिल्या पाहिजेत. गैरसमज व मोठ्या उद्रेकाचे कारण पुष्कळवेळा अगदीच क्षुल्लक वेळेवर लक्ष दिल्यास संपूर्ण दुरुस्त होण्यासारखे असते. अर्थातच लक्षात आले तर. पण या गोष्टी लक्षात येण्यास अधीक्षकाने संस्थेतील बारीक सारीक हालचालीवर लक्ष ठेवणे क्रमप्राप्त आहे.

व्यक्तिकार्य चिकित्सकाचे किंवा व्यक्तिकार्यकर्त्यांचे काम करीत असताना प्रशासन करणे कसे शक्य आहे हा ही एक प्रश्न उपस्थित होतो. ज्या संस्थेमध्ये व्यक्तिकार्यकर्ता व अधीक्षक ह्या दोन्ही जागांची कामे एकच व्यक्ति पहात नसेल तर हा प्रश्न उपस्थित होत नाही. कारण अधीक्षकाला प्रशासनासाठी संपूर्ण वाव मिळतो.

ज्या संस्थेमध्ये व्यक्तिकार्यकर्ता व अधीक्षक ही एकच व्यक्ति असेल त्या ठिकाणी अधिकाऱ्याने कोणती भूमिका घ्यावी ? व्यक्तिकार्यकर्त्याची की अधीक्षकाची ? तांत्रिक दृष्टीने पाहिले तरीसुद्धा या दोन्ही कार्यात फारसा फरक नाही. फरक जाणवतो तो म्हणजे अडचणीत सापडलेल्या संबंधित व्यक्तीबरोबर व्यक्तिकार्यकर्त्याला जिव्हाळ्याचे संबंध ठेवावे लागतात व अधीक्षकाला काहीसे अंतर ठेवणे जरूर असते हा. या बाबतीत असे म्हणता येईल की अधीक्षकाने हे अंतर थोडे कमी केले तरी हरकत नाही. जिव्हाळ्याचे संबंध असलेले लोक आपल्या अडचणी अधीक्षकांना जास्त मोकळेपणाने सांगतील व अधिक अडचणीचा प्रसंग उद्भवण्याची शक्यता कमी होईल.

या कार्याची धुरा सांभाळण्याकरिता अनुभवी, प्रशिक्षित व समाजकार्यात बुद्धीने व मनाने रस घेणाऱ्या तसेच आवडीने हे कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांची उणीव आहे हे एक कटू सत्य आहे.

म. रा. ग्रा. सं. म. ग्रंथालय
प्र/१६०
१
ग्रंथालय.

# प्रकरण विसावे

## आकड्यांचे मनोगत

आकडे हे निर्जीव आहेत पण वर्तमान, भूत व भविष्य सांगणारे मानवाचे हेच सच्चे मित्र आहेत. आकड्यामुळे इतिहास सुसंगतपणे मांडला जातो व जिवंत रहातो. वर्तमान काळाची गुपिते आकडेच दर्शवितात तर भविष्याची दूरदृष्टी सुद्धा तेच देऊ शकतात. आकड्यातून गणित निर्माण झाले आहे. मानवाच्या साऱ्या प्रगतीचे बीज गणितातच आहे व याच कारणामुळे महत्वाचे आहेत.

आपण आता भिकाऱ्यांच्या प्रश्नाचा विचार करीत असताना अनुभवातून मिळालेली कांहीं माहिती आकड्यात मांडून ठेवली आहे. तिचा विचार करू.

### भिकाऱ्यांतील स्त्री–पुरुषांचे प्रमाण

१९४६ ते १९६० पर्यंतच्या मुदतीमध्ये या कायद्याप्रमाणे अटक झालेल्यांच्या संख्येचा विचार केला तर असे दिसून येते कीं अटक केलेल्यात सुमारे ७५ टक्के पुरुष व २५ टक्के स्त्रिया असतात. याचा अर्थ हा की भिकाऱ्यामध्यें $\frac{1}{3}$ प्रमाण स्त्रियांचे आहे.

पण हे आकडे अटक झालेल्या लोकांबद्दलचे असल्यामुळे अटक झालेल्या भिकाऱ्यात स्त्री–पुरुषांचे १:३ असे होते एवढेच म्हणता येईल. यावरून अर्थातच एक अनुमान काढता येईल की भिकाऱ्यांच्या संख्येत स्त्रियांचे प्रमाण यापेक्षा फार मोठे नसावे. १९६१ च्या भारतातील लोकगणनेचे आकडे या संदर्भात पाहिले. पुरुष २२·६३ कोटी. स्त्रिया २१·२९ कोटी. व एकूण संख्या ४३·९२ कोटी होती. १९७१ च्या जनगणनेप्रमाणे २८·३९ कोटी पुरुष, २६·४० कोटी स्त्रिया व एकूण ५४·७९ कोटी असे आकडे उपलब्ध आहेत. महाराष्ट्राचे १९७१ चे आकडे सुद्धा २·६१ कोटी पुरुष. स्त्रिया २·४२ कोटी व एकूण ५·०४ कोटी. या सर्वांवरून असे दिसून येते कीं, लोकसंख्येत पुरुषांचे प्रमाण ५१ ते ५२ टक्के आहे म्हणजेच स्त्री-पुरुषांचे प्रमाण साधारणपणे सारखेच आहे. पुरुषांचे थोडे अधिक असून सुद्धा भीक मागणाऱ्यामध्यें स्त्रियांचे प्रमाण बरेच कमी दिसते. याला काही सामाजिक कारणे जबाबदार असावीत.

सामाजिक व कौटुंबिक बंधनातून भारतीय स्त्रीला घर सोडून सहजासहजी बाहेर जाता येत नाही. तिला कुटुंबातील व्यक्तीबद्दल विशेष प्रेम असते. तसेच तिच्यावर कुटुंबातील घटकांचे प्रेम असते. स्त्री ही मोठ्या प्रमाणावर मनोविकृत असेल तर हा प्रेमाचा दुवा एक तर्फी तुटतो. पुरूषाचे असे नाही. तो कुटुंब व समाज सोडून अधिक सुकरतेने जाऊ शकतो. कांही पुरूष कौटुंबिक बंधनांची फारशी तमा बाळगत नाहीत. कुटुंबातील इतर घटकसुद्धा पुरूषांचे बाबतीत अधिक प्रेमाने भारावलेले नसतात.

घर सोडून पुरूष आपला उदरनिर्वाह सहज करू शकतो. स्त्रिया त्या मानाने दुबळ्या ठरतात. पुरुषाला कोणाच्या आधाराची विशेष जरूर नसते, किंवा अपेक्षासुद्धा नसते. स्त्रियांचे बाबतीत गोष्ट वेगळी आहे. तिला आरंभापासून दुसऱ्याच्या आधाराने रहाण्याचे शिकविले जाते. पुरुषाला इतरांचे भय नसते. स्त्रीला आपल्या स्त्रीत्वामुळे इतरापासून फार मोठे भय असते. या व अशाच अनेक कारणांमुळे भिक्षा मागणाऱ्या स्त्रियांची संख्या पुरुषापेक्षा कमी असावी.

आपण अटक केलेल्या भिकाऱ्यांच्याबद्दल विचार केला. आता कोर्टात काय होते याचा विचार करू. परिशिष्ट नं. ४ मधील आकडेवारीवरून दिसून येईल की, स्थानबद्ध करताना स्त्रियांचा आकडा घटला आहे. अटकेच्यावेळी स्त्री–पुरुषांचे प्रमाण १·३ असे होते, तर स्थानबद्ध केलेल्या लोकात ते आता साधारणपणे १·४ असे आहे. म्हणजेच अधिक स्त्रियांना कोर्टातून सोडवून घेतले जाते. किंवा कोर्ट सोडून देते. वरील परिच्छेदात दिलेल्या कारणामुळेच हे होत असावे. याचाच अर्थ असा होईल की साधारणतः पुण्या-मुंबईत रहाणाऱ्या जनतेमध्ये पुरुषापेक्षा स्त्रियांचे बाबतीत भावनेचे मार्दव अधिक आहे. व अडचणीत सापडलेल्या स्त्रियांना मदत करावयास बरेच लोक पुढे येतात. अशा तऱ्हेने सोडवून घेतलेल्या स्त्रियांवर अन्याय केल्याचे निदर्शनास आलेले नाही.

## वृद्ध व अपंग

भिकारी पुष्कळ प्रकारचे आहेत. त्यात एक मोठा भाग वृद्ध व अपंगांचा आहे. ही विभागणी करताना फार तौलनिक किंवा शास्त्रशुद्ध पद्धतीने न केल्यामुळें सामान्याच्या बुद्धीला पटेल अशा प्रकारची आकडेवारी निर्माण झाली आहे. पण एक गोष्ट निश्चित की या आकड्यामुळे वृद्ध व अपंगांची संख्या साधारणपणे २५ टक्के आहे व सुदृढांची संख्या सुमारे ४८ टक्के दिसून येते. त्या दृष्टीने. परिशिष्ट १ व ३ पहावेत. परिशिष्ट नं १ मध्यें १९६२–६३ ते ६५ पर्यंतची आकडेवारी आहे. व परिशिष्ट ३ मध्यें १९४६–४७ ते १९५९–६० पर्यंतचे आकडे दिलेले आहेत. परिशिष्ट नं. ३ मध्ये अधिक विभाग पाडलेले आहेत. व त्यात १४

वर्षांचा आढावा घेण्यात आलेला आहे. परिशिष्ट नं. १ मध्ये चारच वर्षांची आकडेवारी आहे. दोन्ही परिशिष्टात एकच गोष्ट दिसून येते की स्थानबद्ध भिकाऱ्यामध्ये सुदृढांचे प्रमाण शेकडा ४८ आहे व वृद्ध अपंगांचे प्रमाण सुमारे २५ टक्के आहे. प्रत्यक्ष अनुभवा-वरून घेतलेल्या छोट्या चाचण्यांवरून दिसून येते की वृद्ध व अपंगांचे प्रमाण ४५ ते ४८ टक्के असून सुदृढांचे प्रमाण २५ ते २८ येवढेच असावे. समाजातील भिकाऱ्यांपैकी २५ ते २८ टक्के लोक सुदृढ असून सुद्धा भीक मागतात. ही शोचनीय स्थिती आहे. या विभागामध्ये साधारणपणे खालील तीन प्रकारचे लोक असतात.

१) काही प्रमाणात मानसिक विकृती असलेले.

२) सर्व नातलगांचा व भावनिक संबंधितांचा त्याग करून संसारपराङ्मुख झालेले

३) व भीक मागण्याचा हक्क सांगणाऱ्या जमाती व धार्मिक पंथाचे.

मुंबई प्रांतात १९१९ साली सरकारने एक समिती नेमली होती. तिच्याकडे धार्मिक भिकाऱ्या विषयी विचार करण्याचे काम देण्यात आले होते. या समितीत १४ हिंदु, १४ जैन २३ मुसलमान सभासद होते. या शिवाय मुंबई प्रातातील प्रत्येक जिल्ह्यातील ६ प्रतिष्ठित व्यक्ती होत्या. या समितीचा ठराव खाली दिला आहे.

" हिंदू किंवा मुसलमान धर्मांच्या पवित्र ग्रंथातील वचनांचा अन्वयार्थ काहीही असला तरी या ठिकाणी जे मत प्रतिपादन झाले आहे त्या वरून असे निर्विवादपणे दिसून येते की हमरस्त्यावर व सार्वजनिक ठिकाणी धंदा म्हणून भीक मागणे हे धार्मिक पावित्र्याच्या नवीन विचाराशी विसंगत आहे. "

त्याच प्रमाणे म्हैसूर राज्याने एक समिती नेमून या विषयाची चौकशी केली. व हा प्रश्न कसा सोडवावा या विषयी सूचना मागविल्या. या समितीने असे दाखवून दिले आहे की हिंदू धर्मामध्ये संन्याशाला भीक मागण्याची परवानगी आहे, पण त्याने सुद्धा संन्यास घेण्यापूर्वी बायको-मुलांच्या उपजीविकेची पुढची सोय करून ठेवणे जरूर असते. त्यातही काही संन्यासी स्वतःच्या उपजीविकेसाठी सुद्धा भिक्षा मागत नाहीत. जे खुषीने मिळेल त्यावरच आपला उदरनिर्वाह करतात.

मुसलमान धर्मामध्ये महंमद पैगंबराचे खास वारस म्हणतात, 'आपले स्वतःचे ओझे वहाण्याची ताकद असून सुद्धा जो ते इतरांवर ढकलण्याचा प्रयत्न करतो त्याचा धिःकार असो!'

मुसलमान, धर्मात फकिराने स्वतः कष्ट करून स्वतःचा उदरनिर्वाह करावा, असे म्हटले आहे. पारशी धर्मामध्ये म्हटले आहे, 'काम करून समृद्ध होण्यासाठी माणसाचा जन्म आहे, तो निष्क्रिय होऊन गुंतून जाण्यासाठी नाही. काम हा जीवनाचा मंत्र आहे. तो श्रीमंत व गरीब यांस सारखाच लागू आहे ' याचा स्पष्ट अर्थ असा आहे की भारतातील कोणताच धर्म भिक्षा मागण्यास सांगत नाही. पण समाजात कितीतरी लोक या धार्मिक वाटणाऱ्या प्रवृत्तीच्या आधारे जगत आहेत–एक व्यक्तीच नव्हे तर सबंध कुटुंबे सुद्धा धर्मप्रचारकांनी व विद्वानांनी आपल्या धर्माचे निरूपण करताना भक्तगणांना, विशेषतः तरूणांना व लहान मुलांना या प्रकारापासून परावृत्त केले पाहिजे.

परिशिष्ट 'क' मध्ये वृद्ध व अपंगांना सांभाळणाऱ्या प्रमाणित संस्थांची यादी दिली आहे. महाराष्ट्रात अशा १४ संस्था आहेत व त्यात ३०० पेक्षा अधिक स्त्री–पुरूषांना आसरा मिळत नाही. समाजामध्ये ही एक फार मोठी उणीव आहे. आपल्या समाजाने तिची योग्य दखल घेतलेली नाही. अपंगामध्ये मुख्यत्वे पाच प्रकार मानण्यात येतात. १) अंध २) मूक बधिर ३) अस्थिव्यंग असलेले ४) मानसिक दुर्बळ व ५) कुष्ठरोगाने अपंग झालेले. या पाच प्रकारच्या अपंगांकरिता महाराष्ट्रात निरनिराळ्या संस्था आहेत. अपंगांच्या बाबतीत मात्र समाज बराच जागृत झालेला दिसतो, कारण या प्रकारच्या बऱ्याच संस्था महाराष्ट्रात आहेत. व त्यातून मदत मिळणाऱ्या अपंगांची संख्याही मोठी आहे यातील बऱ्याच संस्थांना प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने शासनाची मदत मिळत आहे ही विशेष आनंदाची गोष्ट आहे. वर नमूद केलेल्या प्रकारच्या अपंगांना मदत करणाऱ्या संस्थांची वर्गीकृत यादी त्यांच्या पत्त्यासह क या परिशिष्टामध्ये मुद्दामच दिली आहे. व अखेरीस शासकीय संस्थाचीही यादी दिली आहे.

## भिक्षा प्रतिबंधक कायद्याखाली चालणाऱ्या संस्था

महाराष्ट्रात असलेल्या शासकीय व अनुदानावर चालणाऱ्या भिक्षा प्रतिबंधक कायद्याप्रमाणे चालणाऱ्या संस्थांची यादी परिशिष्ट 'अ' मध्ये दिली आहे. या यादीमध्यें भिक्षा प्रतिबंधक कायदा १९६० प्रमाणे प्रमाणित असलेल्या संस्थांची नावे, पत्ते, तेथे अधिकात अधीक किती लोक ठेवण्याची सोय आहे हे दिलेले आहे. तसेच प्रत्येक संस्थेत कोणत्या प्रकारचे लोक ठेवले जातात व त्यांना तेथे कोणते उद्योगधंदे दिले जातात याचीही तपशीलवार माहिती दिलेली आहे. या माहितीवरून प्रत्येक संस्था कोणत्या प्रकाराचे कार्य करीत असावी हे कळून येईल.

परिशिष्ट ३ मध्यें कोर्टाने ठेऊन घेतलेल्या किंवा स्थानबद्ध केलेल्या भिकाऱ्यांचे त्यांच्या शारीरिक व मानसिक परिस्थितीप्रमाणे केलेले वर्गीकरण आहे. वेडे, अंध, बहिरे, मुके, क्षयी, कुष्ठरोगी, वृद्ध व अपंग असे असुदृढांचे वर्गीकरण केलेले आढळेल.

परिशिष्ट ४ मध्यें स्त्री व पुरुषांचे वयोमानाप्रमाणे वर्गीकरण दिलेले आहे. कोर्टाने ठेऊन घेतलेल्या एकंदर १८,६७८ लोकांपैकी पुरुष १५,२४८ होते व स्त्रिया ३५४० होत्या. म्हणजेच पुरुष स्त्रियांचे प्रमाण ४ : १ असे पडते. याच परिशिष्टामध्यें वयाप्रमाणे वर्गवारी दिलेली आहे. १६ ते २५, २६ ते ४० व ४१ च्या वरच्या वयाचे असे तीन गट केलेले आहेत. पहिल्या गटात पुरुष १८·७९ टक्के आहेत तर स्त्रिया ३·१५ टक्के आहेत. कोर्टाने ताब्यात घेतलेल्या भिकाऱ्यात १६ ते २५ वर्षांचे गटाचे हे वर्गीकरण असे स्पष्ट दाखविते की तरूण स्त्रिया फारशा भीक मागत नाहीत, तरूण पुरुषांचे हे प्रमाण बरेच मोठे आहे. त्याच प्रमाणे स्थानबद्ध केलेल्या स्त्रियांपैकी दुसऱ्या गटातील स्त्रिया पहिल्या गटापेक्षा अंदाजे दुप्पट आहेत. तर तिसऱ्या गटातील म्हणजे ४० वर्षांवरील स्त्रियांचे प्रमाण अंदाजे तिप्पट आहे. स्थानबद्ध स्त्रियांपैकी ४८·५ टक्के स्त्रिया या पोक्त व वृद्ध गटातील आहेत. पुरुषातील दुसऱ्या व तिसऱ्या गटातील पुरुषांचे प्रमाण जवळ जवळ सारखेच आहे. २६ ते ४० च्या गटातील किंवा ४१ च्या पुढच्या गटातील पुरुष जितक्या प्रमाणात घर सोडून बाहेर जातात तितक्या प्रमाणात स्त्रिया बाहेर जात नाहीत. हेच या आकड्यावरून सिद्ध होते.

## महाराष्ट्रातील व बाहेरील भिकारी

परिशिष्ट ७ मध्यें जुन्या मुंबई प्रांतातील आकडेवारी दिलेली आहे. या आकडेवारीवरून दिसून येते की सर्वात जास्त आकडा मुंबई प्रांताबाहेरील लोकांचा आहे. ३५ टक्के लोक मुंबई प्रांताबाहेरील होते. परिशिष्ट ८ मध्यें दिसून येते कीं पहिल्या ४ वर्षांमध्यें प्रांताबाहेरील लोकांचा आकडा सारखा वाढत गेला आहे. पण ६४–६५ सालापासून तो कमी होऊ लागला आहे. ही सर्व आकडेवारी स्थानबद्ध लोकांचीच आहे. कोर्टातून सुटणाऱ्यांमध्यें बहुतेक लोक जवळपासचेच असतात. प्रांताबाहेरील लोकांना सोडवून घेणारे लोक कमी असल्यामुळे व पर प्रांतातून भिकाऱ्यांची संख्या बरीच असल्यामुळे ताब्यात घेतलेल्या लोकांत सहाजिकच पर प्रांतियांचे प्रमाण वाढलेले दिसते. १९६३–६४ साली तर हे प्रमाण ७० टक्के पर्यंत गेलेले दिसून येते. या आकडेवारीवरून ही गोष्ट निश्चितपणे दिसून येते कीं मुंबई शहरांतील भिकाऱ्यामध्ये परप्रांतियांचे प्रमाण खूप मोठे आहे. ही परिस्थिती साहजिकच व समजून येण्यासारखी आहे. मुंबई शहराचे आकर्षण भारतातील सर्व

थरातील लोकांना सारखेच आहे व ते कारणपरत्वे मुंबईस येत असतात. ते येथे आल्यावर भिकारी दशेस येऊन पोहोचतात किंवा भीकच मागण्यासाठी ते इतर प्रांतातून येथे येतात. बरेच परप्रांतीय लोक मुंबईत रहिवासी झालेले आहेत तसेच भिकारीही रहिवासी झालेले आहेत.

पुण्यामध्ये १९६४ पासून भिक्षा प्रतिबंधक कायदा पुणे शहर, खडकीं व पुणे कॅन्टोनमेंट विभागात लागू केला आहे. पुण्यातील भिकाऱ्यात पर प्रांतियांचे प्रमाण फार कमी आहे असे दिसून आले आहे. सुमारे ८० टक्के लोक महाराष्ट्र व पुण्यातील आहेत. यामुळेच १९६४ पासूनच्या एकंदर परप्रांतियांच्या आकड्यावर परिणाम होऊन टक्केवारी घटली आहे. कदाचित काही राजकीय चळवळींचा देखील हा परिणाम असण्याची शक्यता आहे.

परिशिष्ट ९ मध्यें १९६२–६३ पासून ते १९६५–६६ पर्यंत अटक झालेल्यांची व स्थानबद्ध केलेल्यांची संख्या दिली आहे. ताब्यात घेतलेल्यांची संख्या ही सारखी बदलती रहाणार कारण कोर्टाच्या निकालावर हा आकडा अवलंबून असतो. काही वेळा कोर्टाचा लोकांना सोडून देण्याकडे कल असतो. तर काही वेळेस तो या विरुद्ध दिसून येतो. नातलग वगैरे लोकांना बऱ्याच वेळेस या लोकांना सोडवून घ्यावेसे वाटते व याकरिता ते कोर्टात हजर रहातात. सर्व साधारणपणे अशा तऱ्हेने जामिनावर सोडलेल्या लोकांचे बाबतीत फारसा वाईट अनुभव नाही. ही एक प्रकारे सुधारण्याची संधी ( Probation ) आहे. पुन्हा पकडले जाणाऱ्यांची संख्या फार कमी आहे.

# प्रकरण एकविसावे

## प्रतिबंधात्मक उपाय

भिक्षा मागणाऱ्यांची संख्या दिवसें दिवस वाढत आहे. शहरांत भिकाऱ्यांचे जणू पेवच फुटले आहे असे वाटते. 'कोठुनि हे आले येथे काल संध्याकाळी नव्हते' असा प्रश्न जनतेच्या डोक्यात आल्याबाचून रहात नाही. शहरात आता स्वच्छता वाढू लागली आहे. परीटघडीचे भडक कपडे, किंवा चमकणारे स्त्री–पुरुषांचे कपडे ही नित्याचीच बाब झाली आहे. त्यात मुंबईत येणारे परदेशी पाहुणे, त्यांच्या गळयात अटकलेले ते तीक्ष्ण नजरेचे कॅमेरे, कांही वेगळे दिसले की 'क्लिक' व लगेच थोड्याच दिवसात पौर्वात्य किंवा पाश्चिमात्य वर्तमानपत्रांत आलेले ते भारतदर्शन. अगदी रंगीत सुद्धा. परदेशी पाहुण्यांच्या डोळयात भिकारी फार लौकर भरतो व त्यांच्या फिल्मवर तो तात्काळ जशाच्या तसा उतरतो. अधिक पैशाच्या आशेने तो नेमका त्यांच्यासमोर जातो. मग परदेशातील व येथील भारतीयांना ते चित्र पाहून दुःख होते आणि होणे साहजिकच नाही काय? मुंबई पुण्यामध्ये भिक्षाप्रतिबंधक कायदा लावून सुद्धा भिकारी आहेत ते आहेत असेच वाटण्याची वेळ सर्वसाधारण माणसावर येते. पण यात सत्य काय आहे हे समाजाला समजले पाहिजे व याच कारणासाठी ही थोडी तपशीलवार माहिती जनतेपुढे ठेवली आहे. भिक्षा प्रतिबंधक कायद्याचे काम चालू आहे. अगदी खूप जोरात. पण या खूप जोरात याची मर्यादा आपल्याच पैशावर अवलंबून असल्यामुळे हे कार्य मर्यादित प्रमाणात करणे जरूर आहे. मुंबईस ४० ते ५० हजार व पुण्यास ३ ते ४ हजार भिकारी आहेत. त्या साऱ्यांना भिक्षा प्रतिबंधक कायद्याखाली अटक केली तरी कदाचित दोन तीन महिन्यात पूर्वीची संख्या उपस्थित होईल ही भीती साधार आहे. घेतलेल्या भिकाऱ्यांना सांभाळण्याकरिता आतापेक्षा ६ पट खर्च आपल्या खजिन्यावर पडेल. आताचा खर्च सुमारे ३० ते ३५ लाखापेक्षा जास्त आहे. या शिवाय त्यांना सांभाळण्या करिता आता आहेत त्याच्या ६ पट इमारती लागतील. हे सारे एका राज्याला परवडणारे खचित नाही. केंद्राचे किंवा इतर राज्यांचे सहकार्य सुद्धा जवळ जवळ नाहीच म्हटले तरी चालेल.

पुणे व मुंबई या दोनच शहरांना हा कायदा लागू केला असता ही स्थिती आहे.

या हिशेबाने इतर शहरांना हा कायदा लागू केला तर किती लोकांना पकडावे लागेल याचा अंदाज करणे सुद्धा अवघड आहे. महाराष्ट्रात या ना त्या प्रकारचे कितीतरी भिकारी आहेत. त्या साऱ्यांना पकडायचे, खायला प्यायला घालायचे व उद्योगाला लावायचे, फारच मोठे काम आहे.

म्हणूनच हा महाभयंकर प्रश्न कसा सोडवावा याचा विचार करणे जरूर आहे. जे काम होत आहे ते जरी योग्य मार्गाने होत असले तरी ते फार थोडे आहे. ते बंद करावयाचे नाही, पण या साऱ्या प्रश्नाला गवसणी घालण्याचे आणखी काही मार्ग आहेत काय हे पहायला हवे.

रोगाचा प्रतिबंध करणे हे तो बरा करण्यापेक्षा चांगले ही म्हण त्या दृष्टीने विचारात घेऊ.

भीक मागण्याचा धंदा करणारे लोक आहेत. तो आपला सामाजिक हक्क आहे असे सांगणाऱ्या जमाती आहेत, काही पंथ आहेत. या साऱ्यांना चांगल्या शिक्षणाच्या सवलती उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. या लोकांची मुले शिकली म्हणजे त्यांना आपोआपच भीक मागणे किंवा दुसऱ्यांच्या औदार्यावर जगणे आवडणार नाही. जे लोक आज या मार्गाला लागतात त्याला काही कारणे आहेत. या लोकांच्यांजवळ उपजीविका करण्याचे योग्य साधन नाही. त्यांच्या हाती काही कला किंवा उद्योग दिला तर त्यांना या मार्गा-पासून परावृत्त करणे शक्य होईल. काही लोकांना जमीन, काही लोकांना उद्योगासाठी थोडेसे भांडवल, काही लोकांना नोकरी. व त्यातल्या वृद्धास जीवन वेतन दिल्यास या संपूर्ण कुटुंबाचे पुनर्वसन घडवून आणता येईल. आरंभी सांगितल्याप्रमाणे या गोष्टीच्यामागे रूढी व धार्मिक प्रवृत्ती आहेत. समाजातील धर्म जाणकारांनी या लोकांना हळू हळू त्यांच्या या वर्तणुकीपासून वैचारिक दृष्टीने परावृत्त केले पाहिजे. सध्या शिक्षणाचा वेग खूप वाढला आहे. व यापैकी पुष्कळशा मुलांना शिक्षण मिळत आहे. पण अशी कुटुंबे शोधून काढून त्यांना अखेरपर्यंत मदत करणे जरूर आहे. हा कार्यक्रम लांब पल्याचा व कमी खर्चाचा आहे. या लोकांतील तरुण मंडळीला सरकारी किंवा खाजगी क्षेत्रात नोकऱ्या मिळाल्या तर त्यांच्या कुटुंबात नवे विचार आपोआप येतील व त्यांचा चांगला परिणाम कुटुंबातील वाढत्या मुलांच्या जीवनावर होईल.

आणखी काही लोक असे आहेत की जे लग्न करीत नाहीत, ब्रह्मचर्य पाळतात, आणि कफनी घालून देवाच्या नावाने भिक्षा मागतात. त्यातून संचय करीत नाहीत. अशा लोकांसाठी समाजाने अतिथि गृहे बांधावीत त्यांची उतरण्याची व अन्न पाण्याची सोय

करावी. पंढरी व आळंदी या ठिकाणी जाणाऱ्या येणाऱ्या लोकांची अशी सोय करता आली तर किती तरी चांगले होणार आहे. पण काही आळशी लोक यातच मिसळून आपला जीवनक्रम सुरळीत चालवितात. अशा लोकांना शोधून काढून आदानकेंद्रांत दाखल करावे व त्यांना केंद्रामार्फत योग्य त्या ठिकाणी नेऊन सांभाळण्याची किंवा प्रक्रिया करण्याची मुभा द्यावी. असे होत आहे हे समजले म्हणजे पोटभरू वारकऱ्यांचे प्रमाण कमी होईल. हळू हळू समाजाने वारकरी लोकांना आपली शिदोरी बरोबर आणण्याबद्दल शिकवण द्यावी. आळशी व भिकारी या मेळाव्यात शिरून स्वतःच्या उदरनिर्वाह करतात. त्यांचा बंदोबस्त समाजाने केला पाहिजे. हीच परिस्थिती हाजीमलंग किंवा इतर लहानमोठ्या यात्रेत होत असते. स्वतःजवळ पैसे सुद्धा न घेता यात्रेच्या व उरुसाच्या गावच्या लोकांच्या दानावर किंवा पाहुणचारावर आपली २–४ दिवस चंगळ करून घेण्याची प्रवृत्ती समाजाने हळूहळू कमी केली पाहिजे. रेशनिंग सुरु झाल्यापासून शहरातील परिस्थितीत थोडा फरक पडला आहे. मोठ्या माणसासाठी या बाबतचा प्रचार कथा, कादंबरी, लोकनाट्य, सिनेमा इत्यादी माध्यमातून करावा; तर लहान मुलांच्या दृष्टीने शिक्षणक्रमात अशा बऱ्याच गोष्टीचा अंतर्भाव करावा. पाहुण्याकरिता यजमानाने उपाशी रहावे अशी त्यागवृत्तीची आपली भारतीय संस्कृती आहे. पण याचा अर्थ देवाच्या व धर्माच्या नावावर आळशी लोकांनी व भिकाऱ्यांनी यजमानाला नेहमी उपवास घडवावेत हे योग्य नाही. हे सांगताना कोणत्याही धर्मपंथाबद्दल अनादर नाही. फक्त दुसऱ्यांकडून धर्माच्या व रूढीच्या नावावर मानसिक जबरदस्तीने विनासायास अन्न मिळविण्याच्या प्रवृत्तीबद्दल हे बोलणे आहे.

जैन साधू अत्यंत धार्मिक असे आयुष्य कंठतात. या साधूंना रहाण्यासाठी उतारशाळा बांधल्या जातात व उत्तम अन्न देऊन त्यांचा सन्मान केला जातो. अशा उतारशाळा व सामाजिक फंड निर्माण करून इतर धर्मपंथांनी खऱ्या साधुसंतांचे रक्षण केले पाहिजे व त्यांच्या ज्ञानाचा उपयोग करून घेतला पाहिजे. पण त्याचबरोबर आळशी व भोंदू लोकांना शोधून दूर केले पाहिजे.

## धंदेवाईक भिकारी

भिकाऱ्यात धंदा म्हणून भीक मागणारे असे कांही लोक आहेत. अर्थातच अशा लोकांचे प्रमाण फार मोठे नाही. पण प्रवृत्ती या दृष्टीने ती फार घातक आहे. या धंदेवाईक भिकाऱ्यांचा विचार करीत असताना प्रश्न पडतो की धंदेवाईक भिकारी कोणाला म्हणावे. नित्य नियमाने भीक मागणारा प्रत्येक भिकारी हा धंदेवाईक भिकारी आहे काय? एकादा

अपंग माणूस जीवनाचा दुसरा मार्ग नाही म्हणून भीक मागून स्वतःचा उदर निर्वाह करतो त्याचा उद्देश फक्त पोट भरण्याचा असतो, युक्त्या प्रयुक्त्या करून लोकांच्या मनाला पीळ पाडून आपला गल्ला भरण्याचा नसतो. किंवा वेडा माणूस अजाणतेपणी मिळणारी भीक भूक भागविण्याकरिता वापरीत असेल अशा लोकांना धंदेवाईक भिकारी म्हणणे योग्य होणार नाही. या उलट दुसरा एखादा माणूस जर अपंग असेल किंवा नसेल पण विचार-पूर्वक भीक मागून पैसे गोळा करीत असेल व त्यावर स्वतःचा नव्हे तर इतर धडधाकटाचा चरितार्थ चालवीत असेल तर हा त्याचा धंदा असे समजावे. त्यातून स्वतःचा किंवा इतरांचा फायदाही करून देत असेल तर तो खराच धंदेवाईक भिकारी समजावा. काही भिकारी अशा तऱ्हेने पैसे गोळा करून इतरांना व्याजाने देतात. किंवा मुंबईत भाकरी किंवा भात गोळा करून इतर भिकाऱ्यांना किंवा गरिबांना तो विकतात. भीक मागणे हा आमचा सामाजिक हक्क आहे असे सांगणारा सारा वर्ग हा या प्रकारच्या धंदेवाईक भिकाऱ्यांचा आहे असे समजावयास हरकत नाही. अशा लोकांना त्यांचे नातलग किंवा हितचिंतक मदत करीत असतात. त्यांना कोर्टातून किंवा संस्थेतून सोडवून घेण्याचा ते अटीतटीने प्रयत्न करतात. ते पकडले जाऊ नयेत यासाठी सामदामादि मार्गांनी प्रयत्न करतात. असे भिकारी पकडले गेलेच तर ते शेवटी पळून जाण्याचा प्रयत्न करतात.

या प्रकारच्या भिकाऱ्यांना वळवळणाऱ्या सापांची उपमा देता येईल. जरूर पडेल तेथे हा प्राणी धरणाऱ्यास दंश करण्यास बिलकूल मागे पुढे पहाणार नाही. त्यांच्या समाजाचाही त्यांना आसरा मिळतो कारण ते त्यांच्यासाठी द्रव्यार्जन करीत असतात. हे दुष्ट चक्र मोडताना कायद्याच्या तीक्ष्ण हत्याराचे वार केले पाहिजेत. अशा व्यक्तींना दीर्घ मुदतीच्या स्थानबद्धतेत किंवा जरूर प्रसंगी तुरुंगातही ठेवले पाहिजे. पोलीस कोर्ट व समाजकल्याण खाते यांनी सहकार्यानेच हे काम केले पाहिजे.

या नंतर विचार करताना दिसेल की अपंग लोकांचे प्रमाण भिकाऱ्यात खूप मोठे आहे. अपंगता ही अज्ञान, आजार, रूढी, अपघात, लढाया किंवा नैसर्गिक आपत्तीमुळे निर्माण होते. अपंग पाच प्रकारचे मानण्यात आलेले आहेत. १) अंध २) मूकबधिर शारीरिक व्यंग असणारे ४) मानसिक दुर्बळ व ५) कुष्ठरोगामुळे झालेले.

## १. अंध

आंधळेपण हे मुख्यतः देवी व गुप्त रोगामुळे ( सिफिलिस ) येणारे अपंगत्व आहे. देवी टोचून घेऊन व डोळ्यांची स्वच्छता ठेऊन हे अपंगत्व सहज टाळता येण्यासारखे आहे.

पण अज्ञान व देवीबद्दलच्या घातक कल्पना यामुळे अंधांचे प्रमाण देशात वाढले आहे. ट्रकोमा किंवा डोळे येणे ही सुद्धा अंधत्वाची कारणे आहेत. औषधोपचाराने व स्वच्छतेने हे टाळता येईल.

## २. मूकबधिर

मुके लोक मुख्यतः बहिरे असल्यामुळे मुके असतात. दुसऱ्याचा आवाज ऐकू येत नसल्यामुळे स्वतःला आवाज काढता येत नाही. लहानपणापासून जिभेला व घशाला तशी सवय नसल्यामुळे लौकर शिकता येत नाही. कानाचा दोष पुष्कळ प्रमाणात दुरुस्त होण्यासारखा असतो. डॉक्टरकडे योग्य वेळी गेल्यास अधिक फायदा होतो. मूकबधिरांना शिक्षण देणाऱ्या शाळा आहेत. त्यातून मुलांना पुष्कळ प्रमाणात शिकविता येते. व ती बोलू शकतात. तसेच यंत्राच्या सहाय्याने ऐकूही शकतात. त्यामुळे या अपंगत्वावर पुष्कळ प्रमाणात विजय मिळविता येतो.

## ३. शारीरिक व्यंग

शारीरिक व्यंग हे पोलिओ सारख्या आजारामुळे येण्याची शक्यता असते. सध्या पोलिओ या आजारावर लस निघाली आहे. मुलांना वयाच्या १२ वर्षांपर्यंत होणारा हा आजार आहे. मोठ्या वयातही तो क्वचित होतो. तरी लहानपणी ही लस देण्याची सोय केल्याने या आपत्तीतून किती तरी लोक वाचत आहेत. या शारीरिक व्यंगामुळे कितीतरी उमलणारी जीवने उमलण्यापूर्वीच मृतप्राय झाली आहेत.

त्याचप्रमाणे यांत्रिक वाढीमुळे होणारे अपघात हे अपघात टाळण्याचे प्रयत्न सर्वांनी केले तर किती तरी वाईट प्रसंग टळतील व अपंगांची संख्याही कमी होईल. त्याचप्रमाणे देशादेशात किंवा अंतर्गत होणारी युद्धे किंवा दंगे यामुळे आपणच आपल्या इतर बांधवावर ही आपत्ती आणतो. संहारक शस्त्रे व अस्त्रे सारखी वाढत आहेत. मेलेला माणूस एकदाचा सुटतो पण अपंग माणूस पुष्कळदा जन्मभर मेल्यासारखा जगतो.

अपंग माणसाची परीक्षा करून त्याच्या ठिकाणी किती गुप्त शक्ती शिल्लक आहे याचा अंदाज घेता येतो. तसेच योग्य उद्योग दिला तर चांगले काम करून तो स्वतःचाच नव्हे तर कुटुंबाचा उदरनिर्वाह सुद्धा करू शकतो. यासाठी अर्थातच संरक्षित कारखाने (Sheltered Workshops) काढावे लागतील. परदेशात तर काही उद्योगप्रतींनी अपंगांसाठीच कारखाने काढले आहेत. अशा कारखान्यात सारेच अपंग असतात, पण तेथील काम कोणत्याही दुसऱ्या कारखान्याच्या तोडीचे असते. या कारखान्यात अपंगाला

येईल असेच काम दिले जाते. गुड विल इंडस्ट्रिज ( Good will Industries ) नावाचा उद्योगसमूह अपंगासाठीच अमेरिकेत कार्य करीत आहे. अशा तऱ्हेने अपंगांची शक्ती सुद्धा वाया घालविली जात नाही. यामुळे अर्थातच अपंग सन्मानाने जगू शकतात. व इतरांपेक्षा आपण कमी नाही ही जाणीव त्यांच्यामध्ये निर्माण होते.

## ४. मानसिक दुर्बळ

हे दुबळेपण नैसर्गिक किंवा इतर आजाराने येणारे असते. पोलिओचा मारा सामान्यतः माणसाच्या मज्जातंतूवर असतो. पण काही वेळेस हे जंतू मज्जातंतूतून वर मेंदूमध्ये चढतात. यामुळे अधिक नुकसान झाल्यास 'सेरेब्रळ पॅलसी' किंवा मेंदूचा पक्षघात ही विकृती होते. इतरही काही कारणांनी ही विकृती होऊ शकते. ही विकृती असलेल्या माणसाला आपला तोल सांभाळता येत नाही. व हातापायांना थरकाप आल्यामुळे कोणतेच काम करता येत नाही. 'कोरिया' नावाचाही एक आनुवंशिक आजारही आहे. या लोकांना कोणतेच काम करता येत नाही. त्यांना अखेरपर्यंत सांभाळणे या शिवाय दुसरा उपाय नाही.

माणसाची बुद्धी ही ईश्वरदत्त देणगी आहे. कदाचित ती आनुवंशिक गुणातून येणारी असेल तिची औषधाने अगर शस्त्रक्रियेने वाढ करणे माणसास अजून शक्य झालेले नाही. कमी बुद्धीची मुले ही एक नैसर्गिक आपत्तीच आहे. त्या मुलांना लहानाची मोठी करणे, प्रयासाने व सवयीने त्यांना गोष्टी करावयास शिकविणे, हे सर्व आई-बापांना या यांत्रिक युगांत शक्य होत नाही. श्रीमंतांना ही मुले वाढविता येतील, पण गरिबांना हे जमणे फारच अवघड आहे. अशा मुलांच्या शिक्षणासाठी खाजगी संस्था आहेत. पण त्यांचा खर्च गरिबांना परवडण्यासारखा नाही. तरीही त्या संस्थांची माहिती सामान्य नागरिकास असावी म्हणून या पुस्तकाचे अखेरीस अपंग मुलांना शिक्षण देणाऱ्या सर्व संस्थांची एक यादी जोडली आहे.

मनोदुर्बलांना उद्योग लावून देणे किंवा त्यांना संपूर्णपणे आपल्या पायावर उभे करणे हे फारच अवघड आहे. पण त्यातल्या त्यात ज्यांची बुद्धी थोडी बरी आहे अशा लोकांना सरावाने येणारी कामे शिकविता येतात व त्या प्रमाणात ते थोडीशी कमाई करू शकतात. इतरांना संस्थांशिवाय दुसरा आधार नाही.

## ५. कुष्ठरोगाने झालेले अपंग

कुष्ठरोग हा एक मानव जातीला मिळालेला भयानक शाप आहे. आतापर्यंत कुष्ठ-

रोगाची फारशी माहिती डॉक्टरांनासुद्धा नसे पण आता या परिस्थितीत पुष्कळच सुधारणा झाली आहे. हा आजार जंतूंमुळे होतो हे हेनसन नावाच्या जर्मन शास्त्रज्ञाने शोधून काढले आहे. कुष्ठरोगावर डी. डी. एस्. नावाच्या औषधाचाही शोध लागला आहे. या औषधामुळे रोग पूर्णपणे बरा होतो असे निश्चित दिसून आले आहे. या आजाराची प्राथमिक लक्षणे दिसताच उपाययोजना केली तर सुमारे १–२ वर्षांत आजार पूर्णपणे बरा होतो. व शरिरावर कोणतेच व्यंग दिसून येत नाही पण उशीर झाला तर हातापायांतील स्पर्शज्ञान जाणे, हातापायांची बोटे आखडणे वगैरे दोष निर्माण होतात. हा आजार जरी बरा झाला तरी हे दोष नंतर दूर होत नाहीत अधिक उशीर झाल्याने हातापायांची बोटे झडून जाणे नाकामध्ये वाकडेपणा दिसू लागणे हे दोष अधिक येतात. यातील शेवटच्या स्थितीचे वर्णन न केलेलेच बरे. आजार झाल्यावर बऱ्याच वर्षांनी उपाययोजना केल्यास किंवा औषधेच न घेतल्यास शरिराची भयानक स्थिती होते व आजार जरी पुढे बरा झाला तरी अपंगत्व इतके मोठे असते की समाज त्या माणसाला थोडे सुद्धा जवळ करीत नाही. त्याचे पुनर्वसन हे समाजाला एक मोठे आव्हान आहे. माणूस पूर्णपणे बरा झालेला असतो, पण आजारामुळे चेहेरा व शरीर विद्रुप झालेले असते. त्याच्याकडे बघून सामान्य मनाच्या पुरुषाला सुद्धा भीति वाटते. ज्यांनी कुष्ठरोग्यांच्या क्षेत्रात काम केले आहे व त्या कार्यात आपले जीवन खर्ची घातले आहे असे कार्यकर्तेसुद्धा या पुनर्वसनाच्या बाबतीत चाचपडतच आहेत. असे म्हणावे लागेल. या समाजकार्यकर्त्यांच्या प्रयोगातून लौकरच काहीतरी मार्ग सापडेल असा विश्वास वाटत आहे.

सरकारी क्षेत्रातही या बाबतीत प्रयोग चालू आहेत. तसेच आंतरराष्ट्रीय संघटनेमार्फतही काही कुष्ठरोगी पुनर्वसनाचे प्रयोग चालू आहेत. या महाभयंकर व कूट प्रश्नाच्या उत्तराची सारेच समाजसेवक आतुरतेने वाट पहात आहेत.

आतापर्यंत दिसून आले आहे कीं वृद्ध झालेले आईबाप किंवा नातलग यांना सांभाळण्याचे कार्य आपली विभक्त कुटुंबे करू शकत नाहीत. जागेची टंचाई, सांपत्तिक ओढाताण व तरुण आणि वृद्ध यांच्यामध्ये निर्माण झालेले विचारांचे व ज्ञानाचे अंतर यामुळे वृद्धांचे कुटुंबातील स्थान फार अनिश्चित झाले आहे. वृद्धांना अशी अपेक्षा असते वृद्धापकाळी त्यांच्या पुत्रपौत्रांनी त्यांना आदराची व प्रेमाची वागणूक द्यावी. पुत्रपौत्रांच्या ठिकाणी एके काळी हे प्रेम असे, पण उशिरा लग्न होऊन घरात आलेल्या तरुण मुलींना ते असण्याची शक्यता नसते. पूर्वी मुलामुलींची लग्ने बालवयात होत असत. तेव्हा घरात राहून सुनांनासुद्धा सासू-सासऱ्याबद्दल प्रेम व आस्था वाटत असे, पण आता लग्नाचे वय

वाढल्यामुळे सहवासाने येणाऱ्या प्रेमाची दिलजमाई तरुणात व वृद्धात होत नाही. समाजातील दोन पिढ्यातील प्रेमाचा धागा अशा तऱ्हेने क्षीण झाला आहे.

नुकतेच वाचनात आले कीं ब्रिटनमध्यें सुमारे ३ लक्ष मुली आपल्या वृद्ध मतापितरांचा सांभाळ लग्ने न करताना करीत आहेत.

वृद्ध होणाऱ्यांनी तरूणाबरोबर जुळते कसे घ्यावे याचे शिक्षण माणूस पोक्त झाल्यावर त्याला देण्यात यावे यासाठी ललित वाङ्मयामधून प्रचार व्हावा.

या शिवाय स्वतःजवळचे पैसे खर्च करून जगू इच्छिणाऱ्या वृद्धांना व ज्यांच्या जवळ काहीही शिल्लक नाही अशा सर्व वृद्धांना सांभाळणाऱ्या वृद्धाश्रमांची समाजात फार मोठी उणीव आहे. ही सामाजिक गरज महाराष्ट्रीय समाजसेवकांच्या नजरेस आली आहे. त्यांनी त्या दृष्टीने काही केंद्रे स्थापन केली आहेत. पण ही केंद्रे जरूरीच्या मानाने फार कमी आहेत. म्हणून पुष्कळ वेळा खुप शिकलेले विद्वान किंवा एके काळचे वरिष्ठ अधिकारी सुद्धा भिकारी म्हणून पोलिसांच्या जाळ्यात सापडतात. अशी केस उजेडात आली तर चुकीच्याच लोकांना पोलीस पकडीत आहेत असा आरोप करण्यात येतो. परंतु एक गोष्ट पुष्कळ अंशाने खरी असते ती ही की असा माणूस आपले घर सोडून निघालेला असतो किंवा त्याला घरातून घालवून देण्यात आलेले असते. समाजात दुसरीकडे कोठेही आधार नसल्यामुळे मोठ्या, अनोळखी शहरात भीक मागण्याशिवाय उपाय नसतो. एका काळची ही मानी माणसे स्वाभिमानाचा बळी देऊन रस्त्यात भीक मागू लागतात. स्वाभिमानी लोकांना मानाने जगवायचे असेल तर त्यांच्यासाठी वृद्धाश्रमांची नितांत जरूर आहे. पुरुषांसाठीच नव्हे तर स्त्रियांसाठीसुद्धा वृद्धाश्रम हवेत. या संस्थेत सन्मानाने जाता येईल व अखेरच्या दिवसात मानाने जगता येईल. ही सोय फारशी उपलब्ध नसल्यामुळे पोटाची खळगी भरण्यासाठी हे वृद्ध आरंभी नाइलाजाने व नंतर कोडगेपणाने भीक मागताना दिसतात.

## मानसिक विकृत

आधीच्या एका प्रकारामध्ये व परिशिष्ट नं ३ मध्ये दिलेल्या माहितीवरून दिसून येते की सुमारे ४ टक्के वेडे लोक या कायद्याप्रमाणे अटक झालेले असतात. हे तर ताबडतोब ओळखू येणारे वेडे. पण या शिवाय किती तरी अर्धवट वेडे व मधून मधून वेडाची लहर येणारे लोक असतात. त्यातच फेपरे किंवा धुरे (Epliptical fits) येणारे इसमही असतात. सांगण्याचा उद्देश एवढाच आहे की वेड्या लोकांचे प्रमाण अगदीच

दुर्लक्ष करण्यासारखे नाही. या वेड्या लोकांच्यासाठी काय करण्यासारखे आहे हे पाहिले पाहिजे किंवा निदान त्यांनी भिक्षेकऱ्यांच्या आदान केंद्रात येण्याऐवजी योग्य त्या दवाखान्यात जावे या साठी विशेष प्रयत्न करणे जरूर आहे.

आपल्या देशात यांत्रिक युगाचा व इतर सुधारणांचा प्रभाव एवढा प्रखर आहे की अतिसंवेदनाक्षम मानवी मनावर त्याचा परिणाम अटळ आहे. सामाजिक सुधारणा कितीही चांगल्या असल्या तरी त्याचे दूरगामी परिणाम मानवी मनावर होत असतात. मानव जेवढा सुधारला आहे तेवढा त्याच्या मनावरचा ताण वाढला आहे. जगाच्या अगदी कोपऱ्यात असणाऱ्या अर्ध-नग्न किंवा पूर्ण-नग्न मानवांची मनाची स्थिती आपल्यापेक्षा चांगली आहे, हे सत्य खेदाने सांगणे जरूर आहे. त्यांना वेडाचा त्रास कमीत कमी होत आहे व आपणामध्ये दिसून येणाऱ्या मानसिक विकृतींचा त्यांच्यावर परिणाम झालेला नाही. याचे कारण म्हणजे मनात आले ते करण्याची त्यांच्या समाजात मुभा आहे. मनात आलेली भावना वर्षानुवर्षे दाबून ठेवण्याची व तिच्यावर सारखा विचार करण्याची पाळी त्यांच्यावर येत नाही.

अशी समाज रचना आता आपल्यामध्ये आणणे शक्य नाही. आपण वेगळ्याच मार्गाने खूप पुढे गेलो आहोत. आपणाला ताण पडू नये म्हणून वैद्यकीय परीक्षा करून योग्य वेळेस औषधोपचार करणे हेच काय ते आपल्या हातात आहे. त्यातल्या त्यात माणसाने आपली मानसिक कुचंबणा शक्य तितक्या लौकर कोणाला तरी सांगून आपल्या मनावरील ताण कमी करून घ्यावा. भाविकाने परमेश्वरावर भाव ठेऊन आलेली अडचण त्याच्यापुढे ठेवावी, तर नास्तिकाने वैद्यक शास्त्रावर किंवा मानसचिकित्सावर विश्वास ठेऊन पुढे जावे. एकूण मनाचा भार हलका करावा. तरच या यातनातून सुटका होईल.

कुटुंबातील सर्व माणसे आनंदी व बोलती ठेवावीत. कुढी माणसे बोलती करावीत. त्यांच्या अंतःकरणाचा कुणीतरी ठाव घ्यावा. मनाचे दुःख एकमेकांना सांगून सुद्धा कमी होते व वेडे होण्याची आपत्ती टाळता येते.

सध्या असलेल्या वेड्यांच्या दवाखान्यांची संख्या आता कमी पडू लागली आहे. तसेच मनोविकृती चिकित्सकांची जरूर समाजास अधिकाधिक भासत आहे. एवढेच नव्हे तर ही जरूर अधिक तीव्र होत जाणार आहे. वेड्या किंवा अर्धवट वेड्या माणसास औषधोपचार करण्याचे मूळ काम वैद्यकीयच आहे.

या सर्व अपंगांच्या, मंदबुद्धीच्या व वेड्यांच्यासाठी शिक्षण देणाऱ्या, वैद्यकीय उपचार करणाऱ्या व त्यांची काळजी घेणाऱ्या शासकीय व समाजप्रेरित थोड्या संस्था महाराष्ट्रात

आहेत. पण या संस्थांची संख्या कमी पडत आहे. या संस्था महाराष्ट्रातच नव्हे तर भारतातसुद्धा वाढविल्या पाहिजेत. म्हणजेच हा महाराष्ट्रातील संस्थावरचा ताण कमी होईल. व येथील इतर अपंगाची सोय होऊ शकेल. म्हणून साऱ्या समाजकल्याणाचे कार्य केंद्र शासित असेल तर सर्व राज्यांच्या प्रयत्नात समन्वय निर्माण होईल. निरनिराळ्या राज्यांचे प्रयत्न अपुरे पडत आहेत. प्रत्येक राज्याच्या विचारात भिन्नता असल्यामुळे निरनिराळ्या विषयांना प्राधान्य देण्यात येत आहे. त्याऐवजी सर्व भारताचे समाजकल्याण कार्य एकसंघ झाले तर ते अधिक प्रभावी होईल.

दुसरा एक विचार मनात येतो व तो म्हणजे खर्चाचा. एवढा मोठा खर्च कसा करावा ? पण खरोखरी या बाबतीत विचार करावा अशी परिस्थिती नाही. मुंबईमध्ये लोकांच्या दान देण्याच्या ऐपतीबद्दल व प्रमाणाबद्दल एक खाजगी स्वरुपाची चौकशी करण्यात आली तेव्हा असा अंदाज निघाला आहे की मुंबईमध्यें एक वर्षामध्ये सुमारे ३६ लाख रुपये रोख दान देण्यात येते. मद्रासमध्ये झालेल्या पहाणीमध्यें असे दिसून आले की मद्रास शहरातील ८० टक्के लोक दान देतात. भारतातील लोक दान देण्यात पुढे आहेत. तेव्हा चांगल्या कामाकरिता पैशाची अडचण भासू नये. योग्य काम असेल व योग्य व्यक्तींनी प्रचार केला तर पैशाची अडचण पडू नये. भारतात किंवा जगात जेव्हा मोठ्या आपत्ती येतात तेव्हा जगातील बरेच लहान देश आपापली मदत पाठवितात. पुष्कळशा पुढारलेल्या देशामध्ये " Central Assistance Fund " – " मध्यवर्ती मदत निधी " – सारखे कल्याण निधी किंवा गंगाजळी निर्माण करण्यात आलेल्या आहेत. पगार घेणाऱ्या प्रत्येक इसमास पगाराच्या वेळी त्या कार्याची तिकिटे विकत घेऊन अशा फंडास मदत करावी लागते. व्यापाऱ्यांसाठी वेगळी पद्धत आहे. पण देशातील सर्व पैसे मिळविणाऱ्या लहान-थोर व्यक्तींना या फंडांना पैसे द्यावेच लागतात. या फंडामध्ये खूप मोठ्या रकमा असतात. या पैशाचा उपयोग मोठ्या प्रमाणावर दारिद्र्य, अपघात, बालकल्याण स्त्रीसहाय्य अशा कामाकरिता स्वतःच्या व बाहेरच्या देशात करण्यात येतो. पैसाच नव्हे तर दूध पावडर, तेल, तूप, किंवा पौष्टिक आहाराच्या वस्तू या संस्था विकत घेऊन गरीब बांधवांना वाटण्याकरिता स्वखर्चाने पाठवितात. अशा तऱ्हेने आपल्याच देशबांधवांचे दैन्य, आजार, अपंगत्व शारीरिक व मानसिक दौर्बल्य याकरिता आपण पैसे जमवू शकणार नाही काय ? असे पैसे मिळविणे जरूर शक्य आहे. या कामाला निष्ठावंत, निस्पृह, निर्लोभी अशा कार्यकर्त्यांची जरूर आहे. सरकारच्या पाठिंब्याची जरूर आहे. अशी योजना सरकारी पाठिंब्याशिवाय उभी राहू शकणार नाही. व तिला प्रतिसाद सुद्धा योग्य प्रकारे मिळू शकणार नाही. म्हणून जनता व सरकार यांच्या सहकार्याने अशी योजना तयार करून कोणीतरी या महान-

कार्यांचे धूरिणत्व करावे. या कार्यात प्रांत, भाषा, पक्ष किंवा इतर कोणत्याच वादग्रस्त प्रश्नाचा अंतर्भाव नाही. माणसाच्या कल्याणाकरिता माणसाने सहाय्य करावयाचे आहे. या कार्याला योग्य अशी वेळ आहे.

याच कामाकरिता प्रचार करण्याची जरूरी आहे. या प्रचारात 'व्यक्तीला दान देण्यापेक्षा संस्थेला द्यावे' हे तत्व लोकांना शिकविले पाहिजे. भीक मागणाऱ्या भिकाऱ्याला दान दिले तर त्याचे पोट त्या दिवसापुरतेच भरते व तो भिकारीच रहातो. आपल्या दानाने भिकाऱ्याला मदत होत नाही हे समाजाला समजले पाहिजे. उलट संस्था त्या व्यक्तींच्या हिताच्या अनेक गोष्टी करून त्यांच्या त्यांच्या पुनर्वसनाचा रस्ता त्यांना सापडावा याबाबतीत मदत करते. व्यक्तीच्या मदतीपेक्षा संस्थेची मदत ही अधिक दूरगामी, अधिक तत्वपूर्ण अशी असते, हेही समाजास समजले पाहिजे. उपलब्ध प्रचाराच्या साधनातून मोठ्यांना शिकविले पाहिजे व लहान मुलांना या विषयाचे ज्ञान क्रमिक पुस्तकातून दिले पाहिजे, म्हणजेच कालांतराने योग्य असे ज्ञान नागरिकांना मिळेल. त्यांच्याजवळ जे अधिक आहे, त्याचा अधिकात अधिक उपयोग दुर्बलांना होऊ शकेल. इतकेच नव्हे तर त्यांनी प्रत्यक्ष काही प्रमाणात या लोकांची सेवा करावी. ही सेवासुद्धा अनेक प्रकारची असण्याची शक्यता आहे व ज्यांना ती झेपेल त्यांनी ती करावी. हे शिक्षण हळू हळू पुढच्या पिढीस दिले तर आपल्यामधील माणूस जिवंत राहील. हा प्रकार एकदम होणार नाही. किंवा त्याचा फायदासुद्धा एकदम दिसणार नाही. ५–१० वर्षांनंतर फरक आढळून येईल. पुण्यसंचय, दया, करुणा किंवा इतर कोणत्याही धार्मिक अथवा नैतिक तत्वासाठी जे दान द्यावयाचे त्याचा ओघ या केंद्रीय गंगाजळीकडे वळविला पाहिजे.

अशा तऱ्हेने गंगाजळी निर्माण करून तिचा संचयच नव्हे तर व्यय करण्याची संपूर्ण योजना तयार करावी लागेल. या योजनेप्रमाणे देशात जो सर्वांत खालचा गरीब अशिक्षित असा समाज आहे त्याचे कल्याण टप्याटप्याने व निरनिराळ्या मार्गांनी घडवून आणावे. आता अस्तित्वात असलेल्या संस्थांना जरूर असेल तर आर्थिक सहाय्य द्यावे व ज्या विभागात संस्था नसतील तेथे नव्या संस्था काढाव्यात. एकत्र कुटुंब पद्धती नष्ट झाल्यामुळे समाज हे एक मोठे कुटुंब झाले आहे व संस्था हे त्याचे कार्य–केंद्र झाले आहे. कुटुंबाची उणीव अशा संस्थांनी भरून निघाली पाहिजे.

अपंगासाठी असणाऱ्या संस्थांना कायद्याचे बंधन नसेल तर कोणाही गरजू माणसाला तेथे प्रवेश देता येईल व त्याला तेथे सन्मानाने रहाता येईल. आजचा भिक्षा प्रतिबंधक कायदा कितीही चांगला असला तरीसुद्धा त्याला थोडा तरी शिक्षेचा वास आहे. कायद्या-प्रमाणे झालेली स्थानबद्धता ही शिक्षेसारखीच वाटते व तो एक कलंक आहे असे अनेक

लोकांना वाटते. थोड्या अनुभवावरून असे म्हणता येईल की आदान केंद्रात स्वतः होऊन येणारा माणूस कुष्ठरोगी किंवा क्षयरोगी असतो. स्वतः होऊन आदान केंद्रात असे लोक पुष्कळदा येतात. इतर अडचणीत सापडलेला माणूस आदान केंद्रात येत नाही. अपंग व अडचणीत सापडलेल्या इसमांना मदत करणाऱ्या संस्था काढल्या तर तेथे मदत घेण्यास लोकांना भय किंवा कमीपणा वाटणार नाही व भिक्षा मागताना जी मानखंडना होते तीही तेथे गेल्यामुळे टाळता येईल.

आणखी एका पद्धतीने गावात रहाणाऱ्या भिकाऱ्यांचे बाबतीत कार्य करता येण्यासारखे आहे. याच अनुरोधाने एक प्रत्यक्ष झालेली हकिकत देण्यासारखी आहे.

एक सुमारे ३५ वर्षे वयाचा अशक्त माणूस आपल्या मुलांना बरोबर घेऊन भीक मागत असे. एकदा त्या माणसाबद्दल माझ्याकडे एका अधिकाऱ्याने तक्रार केली व तो इसम सध्या कोठे बसला आहे हेही सांगितले. मी त्या इसमास रक्षक पाठवून बोलावून घेतले. त्याचा ८–९ वर्षे वयाचा मुलगा तेथून पळून गेला. संस्थेत आल्यावर त्याने मला रडून विनंती केली की, मी एका संस्थेत नोकरीला आहे. मला धरून ठेऊ नका. माझ्या लहान मुलांकडे पहा ' मी त्याच्याबरोबर सुमारे अर्धा तास बोलत होतो. त्याने सांगितले, 'माझी बायकोसुद्धा एका संस्थेत गेली ७–८ वर्षे बदली काम करीत आहे. तिला महिना १५ ते २० रुपये पगार मिळतो. मला महिना ७०–८० रुपये रोख पगार हातात मिळतो. चार मुले आहेत. घराला २० रुपये भाडे आहे. पगार सुद्धा अपुरा पडतो म्हणून मी भीक मागतो. बायको सुद्धा रात्रीची भीक मागते. '

माझे मन द्विधा झाले. मी त्याच्याकडून, 'परत भीक मागणार नाही ' असे लिहून घेतले. बायकोच्या कामाच्या ठिकाणाची माहिती घेतली व त्याला सोडून दिले. दुसऱ्या दिवशी सकाळी ती बाई काम करीत होती त्या संस्थेच्या प्रमुखास नावाने पत्र पाठविले. ओळखीचे होते ते अधिकारी. त्यांना विनंती केली की त्या बाईला कायम नोकरीवर घ्यावे. चारच दिवसांनी तो माणूस परत आला. आल्याबरोबर पहिल्यांदा पायावर डोके ठेऊन रडू लागला. मला कळेना काय झाले. मी त्याला उठविले व विचारले. डोळे पुशीत तो हसू लागला. माझ्या आश्चर्याला पारावार उरला नाही. हा माणूस हसतो आहे व रडतो पण आहे. लहान मुलासारखाच भासला मला तो. 'बायकोला कायम नोकरी मिळाली.' एवढेच तो म्हणाला.

डोळ्यात अश्रू होते व ओठावर हसू. सुख–दुःखाचा हा संगम होता. भिक्षारूपी राक्षसाच्या तावडीतून सुटलेल्या आत्म्याच्या भावनोत्कटतेची स्पंदने अनुभवताना माझ्याही डोळ्यांच्या कडा पाणावल्या होत्या.

# परिशिष्ट १

## आजारी, अपंग, वृद्ध व सुदृढ अशा तत्वावर १९६२ ते १९६६ पर्यंत स्थानबद्ध केलेल्या भिकाऱ्यांचे वर्गीकरण

| अ. नं. | प्रकार | १९६२-६३ | १९६३-६४ | १९६४-६५ | १९६५-६६ | एकूण | टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | वेडे | २ | — | १३ | २३ | ३८ | ४२ |
| २ | आंधळे बहिरे व मुके | ११७ | १३२ | २८० | ६६ | ५९५ | ६.७ |
| ३ | वृद्ध व अपंग | ५२८ | ३८५ | ७६६ | ४२२ | २१०१ | २३.३ |
| ४ | गुप्त रोग, क्षय व कुष्ठ रोगी | २६१ | ६७७ | ५९५ | ३११ | १८४४ | २०.५ |
| ५ | सुदृढ | १०१० | १३०० | ११९८ | ९४५ | ४३७३ | ४८.५ |
| | एकूण | १९१८ | २४९४ | २७७२ | १७६७ | ८९५१ | — |

# परिशिष्ट २

## १९४६ ते १९६० पर्यंत या कायद्यान्वये हाताळलेले खटले

| वर्ष | १ एप्रिल रोजी शिल्लक खटले<br>१ वर्षात पकडलेल्यांची संख्या | | | वर्षात निकाली काढलेले खटले | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुरुष | स्त्रिया | एकुण | पुरुष | स्त्रिया | एकूण |
| १९४६–४७ | १०६० | ५९८ | १६७८ | १०६० | ५९८ | १६५८ |
| १९४७–४८ | ९१३ | — | ९१३ | ९११ | — | ९११ |
| १९४८–४९ | ६७४ | ४६४ | ११३८ | ६३४ | ४६० | १०९४ |
| १९४९–५० | ९४० | ३५६ | १३९६ | ९७६ | ३४६ | १३२२ |
| १९५०–५१ | १०३४ | ४८६ | १५३० | ९५६ | ४३८ | १३९४ |
| १९५१–५२ | ८०६ | ६८९ | १५४९ | ७४२ | ५९३ | १३३५ |
| १९५२–५३ | ११२७ | ८१७ | १९४४ | १०४५ | ७६४ | १८०९ |
| १९५३–५४ | ११७० | १०७५ | २२४५ | १०९२ | १०१३ | २१०५ |
| १९५४–५५ | १२३५ | ८२० | २०५५ | १०७१ | ६९९ | १७७० |
| १९५५–५६ | २०८४ | ७४८ | २८३२ | १५९३ | ६३३ | २२२६ |
| १९५६–५७ | ३३९६ | ८६३ | ४२५९ | ३०५३ | ८१० | ३८६३ |
| १९५७–५८ | २६४७ | ७७७ | ३४२४ | २२२६ | ६८७ | २९१३ |
| १९५८–५९ | ६६४९ | १२५३ | ७९०२ | ६१८३ | १०२० | ७२०३ |
| १९५९–६० | ५९०३ | १२६९ | ७१७२ | ४६५७ | ११८० | ५८३७ |
| एकूण | २९८२० | १०२१५ | ४००१७ | २६१९९ | ९२४१ | ३५४४० |

# परिशिष्ट ३.

या कायद्यान्वये १९४६ ते १९६० च्या दरम्यान स्थानबद्ध केलेल्या लोकांची मानसिक व शारीरिक स्थिती दर्शविणारा तक्ता

| वर्ष | वेडे | अंध | बहिरे-मुके | क्षयी | कुष्ठ रोगी | वृद्ध व अपंग | सुदृढ | गुप्त रोगी | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १९४६–४७ | ६६ | १२५ | २४ | १२ | १३० | — | ४१५ | — | ७१५ |
| १९४७–४८ | ९ | २७ | १५ | ३ | २९ | ३५ | ३६३ | — | ४८१ |
| १९४८–४९ | १३ | ८३ | २६ | ७ | २१ | — | ४१६ | — | ५६६ |
| १९४९–५० | २० | ९५ | २३ | २ | ८२ | ९७ | ४७३ | — | ७९२ |
| १९५०–५१ | ४१ | ५३ | १८ | ८ | ८३ | — | ५२३ | — | ७२६ |
| १९५१–५२ | ५२ | ४२ | १० | १४ | ९० | — | ३३३ | — | ५४१ |
| १९५२–५३ | २७ | ८५ | १० | १२ | ६२ | ३०१ | ४५७ | — | ९५४ |
| १९५३–५४ | १४ | ६८ | १७ | २४ | १०१ | ३८२ | ५१२ | — | १११८ |
| १९५४–५५ | १ | ८४ | १२ | ५ | २१ | २९८ | ३७९ | — | ८०० |
| १९५५–५६ | २२ | १२९ | २४ | ४१ | ९४ | २४१ | ४८७ | — | १०३८ |
| १९५६–५७ | — | १३४ | ३० | ५७ | १३९ | ५८८ | ४७२ | — | १४२० |
| १९५७–५८ | ३९ | ८८ | १९ | २८ | ३४० | ४२९ | २६३ | — | १२०६ |
| १९५८–५९ | २३७ | ३३९ | १०२ | ६० | ४५३ | १८७१ | २३५९ | ७७६ | ५४२१ |
| १९५९–६० | २१३ | १८५ | ६३ | १९१ | ४२२ | ५६३ | १७५० | ७७६ | ३३८७ |
| एकूण | ७५४ | १५३७ | ३९३ | ४६४ | २०६७ | ४८०५ | ९२०२ | — | १९२२२ |
| टक्केवारी | ४.० | ७.८ | २.० | २.५ | १०.७ | २५.० | ४८.० | — | — |

## परिशिष्ट नं. ४

१९४६ ते १९६० च्या दरम्यान सदरहू कायद्यान्वये स्थानबद्ध केलेल्या लोकांचे वयपरत्वे वर्गीकरण

| वर्ष | पुरुष | | | | स्त्रिया | | | | एकूण | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १६तेर२५ | २६ते४० | ४१चेवर | एकूण | १६तेर२५ | २६ते४० | ४१चेवर | एकूण | १६तेर२५ | २६ते४० | ४१चेवर | एकूण |
| १९४६–४७ | — | — | — | — | — | — | — | — | — | — | — | — |
| १९४७–४८ | — | — | — | — | — | — | — | — | — | — | — | — |
| १९४८–४९ | ११० | २०९ | ११९ | ४३८ | ३९ | १०० | १४० | २७९ | १४९ | ३०९ | २५९ | ७१७ |
| १९४९–५० | २४९ | २९८ | १८० | ७२७ | १८ | ९८ | ८० | १९६ | २६७ | ३९६ | २६० | ९२३ |
| १९५०–५१ | १७१ | २८९ | १६४ | ६२४ | २१ | १४५ | ३९ | २०५ | १९२ | ४३४ | २०३ | ८२९ |
| १९५१–५२ | १०४ | १७८ | १३४ | ४१६ | २१ | ६४ | ९९ | १८४ | १२५ | २४२ | २३३ | ६०० |
| १९५२–५३ | २०५ | २९० | २२७ | ७२२ | २१ | ११० | २०६ | ३३७ | २२६ | ४०० | ४३३ | १०५९ |
| १९५३–५४ | २२२ | ३५० | २१९ | ७९१ | २१ | १४९ | २४७ | ४१७ | २४३ | ४९९ | ४६६ | १२०८ |
| १९५४–५५ | १२१ | २७२ | २२५ | ६१८ | १४ | ७६ | १९३ | २८३ | १३५ | ३४८ | ४१८ | ९०१ |
| १९५५–५६ | १०९ | २७० | ४३२ | ८११ | १८ | ६६ | १४४ | २२८ | १२७ | २२६ | ५७६ | ९२९ |
| १९५६–५७ | १९५ | ५३२ | ४५९ | ११८६ | १२ | ९० | १३२ | २३४ | २०७ | ६२२ | ५९१ | १४२० |
| १९५७–५८ | १७९ | ३३१ | ४६३ | ९७३ | २८ | ८६ | १२४ | २३८ | २०७ | ४१७ | ५८७ | १२११ |
| १९५८–५९ | ८२१ | १६४२ | २४६३ | ४९२६ | १२४ | २०५ | १७६ | ५०५ | ९४५ | १८४७ | २६३९ | ५४३१ |
| १९५९–६० | १०२५ | ११३५ | ८५६ | ३०१६ | २५४ | ९२ | ८८ | ४३४ | १२७९ | १२२७ | ९४४ | ३४५० |
| एकूण | ३५११ | ५७९६ | ५९४१ | १५२४८ | ५९१ | १२८१ | १६६८ | ३५४० | ४१०२ | ६९६७ | ७६०९ | १८६७८ |
| विभागातील टक्के | २३.० | ३८.० | ३९.० | — | १६.५ | ३६.० | ४८.५ | — | — | — | — | — |
| एकूण टक्केवारी | १८.७९ | ३१.४ | ३२.८ | ८१.५८ | ३.१५ | ६.८५ | ८.९४ | १८.५ | २१.९५ | ३७.३१ | ४०.६८ | — |

# परिशिष्ट नं. ५

पहिल्याच वेळी अटक होऊन कोर्टाने दिलेल्या स्थानबद्धतेच्या मुदती बाबतची वर्गवारी. ( १९४६ ते १९६० चे दरम्यान )

स्थानबद्धतेची मुदत

| वर्ष | एक वर्ष | १ ते २ वर्षे | २ ते ३ वर्षे | ३ वर्षापेक्षा अधिक | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १९४६ – ४७ | ५२९ | ९२९ | २०० | — | १६५८ |
| १९४७ – ४८ | २६० | १४८ | ३८ | — | ४४६ |
| १९४८ – ४९ | १४४ | २४५ | २४४ | ६ | ६३९ |
| १९४९ – ५० | २३६ | २५१ | ३८१ | ११ | ८७९ |
| १९५० – ५१ | २८७ | ३५५ | ११५ | — | ७५७ |
| १९५१ – ५२ | ३६९ | १२१ | ४३ | — | ५३३ |
| १९५२ – ५३ | ५६६ | ३२४ | ३२ | १६ | ९३८ |
| १९५३ – ५४ | २४६ | ७०८ | १३७ | १५ | ११०६ |
| १९५४ – ५५ | ७२६ | ४० | ४ | — | ७७० |
| १९५५ – ५६ | ४९९ | ३०५ | ३३ | — | ८३७ |
| १९५६ – ५७ | ५६३ | ३५९ | ७६ | — | ९९८ |
| १९५७ – ५८ | ६६९ | ३२६ | ११५ | — | १११० |
| १९५८ – ५९ | २३६३ | १३५१ | ३९१ | २१२ | ४३१७ |
| १९५९ – ६० | २४९४ | ४६१ | ३४४ | ८१ | ३३८० |
| एकूण | ९९५१ | ५९२३ | २१५३ | ३४१ | १८३६८ |
| विभागीय टक्के. | ५४·० | ३२·२ | ११·५ | २·५ | — |
| स्थानबद्धावरील ,, | | | | | ८७·९७ |
| अटक झालेल्या. ,, | | | | | ४५·९ |

# परिशिष्ट नं. ६

दुसऱ्या वेळी किंवा अधिक वेळा या कायद्यान्वये अटक झाल्यामुळे कोर्टाने दिलेल्या स्थानबद्धतेच्या मुदतीबाबतची वर्गवारी.

स्थानबद्धतेची मुदत

| वर्ष | १ वर्ष | १ ते २ वर्षे | २ ते ३ वर्षे | ३ वर्षांपेक्षा अधिक | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १९४६ – ४७ | ३ | — | — | — | ३ |
| १९४७ – ४८ | — | — | — | ५१ | ५१ |
| १९४८ – ४९ | २ | १ | २० | ५५ | ७८ |
| १९४९ – ५० | — | — | — | ४४ | ४४ |
| १९५० – ५१ | — | — | — | ६७ | ६७ |
| १९५१ – ५२ | — | — | — | ६७ | ६७ |
| १९५२ – ५३ | १९ | २६ | ५ | ७१ | १२१ |
| १९५३ – ५४ | ४ | २५ | — | ७३ | १०२ |
| १९५४ – ५५ | १५ | ८ | — | १०८ | १३१ |
| १९५५ – ५६ | ८ | २१ | १५२ | २१ | २०२ |
| १९५६ – ५७ | ४६ | ९४ | १२९ | १५३ | ४२२ |
| १९५७ – ५८ | ३८ | १२ | ३७ | १४ | १०१ |
| १९५८ – ५९ | ४३९ | २८७ | २४८ | १३५ | ११०९ |
| १९५९ – ६० | — | — | — | ७० | ७० |
| एकूण | ५७४ | ४७४ | ५९१ | ९२९ | २५६८ |
| विभागीय टक्के. | २२.२ | १८.० | २२.० | ३७.८ | |
| स्थानबद्धांच्या एकूण संख्येवर टक्केवारी. | | | | | १२.३ |
| अटक झालेल्या एकूण संख्येवर टक्केवारी, | | | | | ६.४ |

# परिशिष्ट नं. ७

## प्रमाणित संस्थामध्ये असलेल्या स्थानबद्धांची प्रांतवारी
१९४६ – १९६०

| वर्ष | मुंबई शहरातील | मुंबई राज्याच्या इतर जिल्ह्यातील | भारतातील इतर प्रांतिक | भारता बाहेरील | सांगू शकणारे | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १९४६–४७ | ३७८ | २९५ | ३८१ | — | ६०४ | १६५८ |
| १९४७–४८ | ९० | २०८ | १९९ | — | — | ४९७ |
| १९४८–४९ | १८२ | २०१ | ३०७ | १७ | १० | ७१७ |
| १९४९–५० | ४१ | २३४ | ५६१ | २५ | ६२ | ९२३ |
| १९५०–५१ | ४१ | १९९ | ३९३ | ७४ | २२ | ७२९ |
| १९५१–५२ | ३८ | १७३ | ३३४ | २१ | ३४ | ६०० |
| १९५२–५३ | ७१ | ३८५ | ५४१ | २३ | ३९ | १०५९ |
| १९५३–५४ | ४१ | ३७४ | ७५७ | १३ | २३ | १२०८ |
| १९५४–५५ | २७५ | २४० | ३५१ | २० | १५ | ९०१ |
| १९५५–५६ | ३८२ | २६३ | ३५८ | ७ | २९ | १०३९ |
| १९५६–५७ | ९५ | ५२२ | ७०५ | २५ | ७३ | १४२० |
| १९५७–५८ | ५९ | ४१३ | ६८३ | २७ | २९ | १२११ |
| १९५८–५९ | ३०६६ | १५९९ | ६०५ | ७१ | ९० | ५४३१ |
| १९५९–६० | १३८४ | ६८० | ११७३ | १७ | १९६ | ३४५० |
| एकूण | ६१४३ | ५७८६ | ७३४८ | ३४० | १२२६ | २०८४३ |
| टक्केवारी | २९·० | २८·० | ३५·० | १·५ | ५·५ | — |

# परिशिष्ट नं. ८

स्थानबद्ध भिकाऱ्यातील महाराष्ट्र व बाहेरील असे वर्गीकरण

| वर्ष | स्थानबद्ध संख्या | महाराष्ट्रातील | महाराष्ट्रा-बाहेरील | बाहेरील लोकांची टक्केवारी |
|---|---|---|---|---|
| १९६० – ६१ | २५६६ | ८३२ | १७३४ | ६७ |
| १९६१ – ६२ | २२४९ | ८०६ | १४४३ | ६४ |
| १९६२ – ६३ | १९१८ | ६२२ | १२९६ | ६७ |
| १९६३ – ६४ | २५४२ | ७४६ | १७९२ | ७० |
| १९६४ – ६५ | २७७२ | ११६६ | १६०६ | ४९ |
| १९६५ – ६६ | १७६७ | ९७५ | ८२२ | ४६ |
| एकूण | १३८१४ | ५१४७ | ८६९३ | ३६३ |
| सरासरी | | | | ६०.५ |

# परिशिष्ट नं. ९

१९६२ – ६६ दरम्यान झालेली अटक, स्थानबद्ध इत्यादि ( महाराष्ट्रातील )

| | १९६२ – ६३ | १९६३ – ६४ | १९६४ – ६५ | १९६५ – ६६ |
|---|---|---|---|---|
| अटक झालेले | ४२८० | ४३५८ | ४५२६ | ३१०६ |
| स्थानबद्ध | १९१८ | २५४२ | २७७२ | १७९७ |
| सोडले वगैरे | २३६२ | १८१६ | १७५४ | १३०९ |
| स्थानबद्धांचे शेकडा प्रमाण | ४५.० | ५८.० | ६१.२ | ५७.५ |

# परिशिष्ट 'अ'

शासकीय व खाजगी प्रमाणित संस्था ( १९७३ मध्ये )

( भिक्षा प्रतिबंधक कायदा १९६० प्रमाणे )

| अ. नं. | संस्थेचे नाव पत्ता टे. नं. इत्यादी. | स्थानबद्धाची अधिकात अधिक संख्या | कोणत्या प्रकारच्या स्थानबद्धाकरिता प्रमाणित | तेथील उद्योग व शिक्षण |
|---|---|---|---|---|
| १. | भिक्षेकरी आदान केंद्र चेंबूर, चेंबूर, मुंबई, ७१. टे. नं. ५२१२५५. | ८५० | कच्च्या कैदेतील ५०० सुदृढ ( स्था. ) १०० कुष्ठरोगी १५० क्षय झालेले १०० | १) सुतार, २) खराटे करणे ३) शिंपी ४) परीट ५) यंत्र भाग ६) कुक्कुट पालन ७) शेती |
| २. | भिक्षेकरी आदान केंद्र ७१, नवी पेठ, पुणे, ११. टे. नं. ५४०१४. | ११५ | कच्च्या कैदेतील ८५ स्त्रिया १५ सुदृढ (स्था.) १५ | १) सुतार २) शिंपी ३) खराटा करणे. |
| ३. | स्त्रियांचेसाठी प्रमाणित संस्था चेंबूर, चेंबूर, मुंबई, ७१. टे. नं. ५२१६५७. | ३५० + २०० कच्ची कैद ५५० | कच्च्या कैदेतील व इतर स्थानबद्ध स्त्रिया | १) शिंपी २) शेती ३) खराटा करणे. ४) लोकर विणकाम ५) सूतकताई ६) पिनकुशन ७ पुट्ठा काम |
| ४. | पुरुष भिक्षेकरी प्रमाणित संस्था, विसापूर, जिल्हा, अहमदनगर. टे. नं. ३६५ ( नगर ) | ७२५ | सुदृढ स्थानबद्ध. | १) शेती २) विटा व कुंड्या करणे. ३) शिंपी ४) बांधकाम |

| अ. नं. | संस्थेचे नाव पत्ता टे. नं. इत्यादी. | स्थानबद्धांची अधिकात अधिक संख्या | कोणत्या प्रकारच्या स्थानबद्धाकरिता प्रमाणित | तेथील उद्योग व शिक्षण |
|---|---|---|---|---|
| ४ | | | | ५) विणकाम<br>६) परीट<br>७) मोची काम<br>८) साबण बनविणे.<br>९) कुक्कुट<br>१०) तेल घाणा<br>११) सुतार. |
| ५. | पुरुषाकरिता प्रमाणित संस्था. पिंपळगाव पिसा, जि. अहमदनगर. | ३०० | सुदृढ स्थानबद्ध | १) विणकाम<br>२) सुतार<br>३) शिंपी |
| ६. | पुरुषाकरिता प्रमाणित संस्था. तालुका श्रीगोंदे, वायपातवाडी, जिल्हा, अहमदनगर. | १०० | सुदृढ स्थानबद्ध | १) शेती<br>२) विणकाम<br>३) सुतार. |
| ७. | पुरुषाकरिता प्रमाणित संस्था. सातारा, जि. सातारा टे. नं. २५६. | २०० | सुदृढ स्थानबद्ध | १) परीट<br>२) खराटा करणे<br>३) शेती<br>४) शिंपी |
| ८. | पुरुषाकरिता प्रमाणित संस्था. चिंचळे. ता. श्रीगोंदे, जिल्हा, अहमदनगर. | २०० | अंध, वृद्ध व अपंग स्थानबद्धासाठी. | १) शेती<br>२) शिंपी<br>३) विणकाम<br>४) प्लॅस्टिक वायर बॅग<br>५) दंतमंजन |
| ९. | पुरुषाकरिता प्रमाणित संस्था. जांभूळ, पोस्ट, कुळगाव, जिल्हा, ठाणे. टे. नं. ५७. कुळगाव | ३०० | मंदबुद्धी, सुदृढ स्थानबद्ध. | १) शेती<br>२) खराटा करणे<br>३) शिंपी |

| अ. नं. | संस्थेचे नांव पत्ता टे. नं. इत्यादी. | स्थानबद्धांची अधिकात अधिक संख्या | कोणत्या प्रकारच्या स्थानबद्धाकरिता प्रमाणित | तेथील उद्योग व शिक्षण |
|---|---|---|---|---|
| १०. | कुष्ठरोगी भिक्षेकऱ्याकरिता प्रमाणित संस्था. ( पुरुष ). पुई-कोलाड, जि. कुलाबा. | १६० | कुष्ठरोगी स्थानबद्ध पुरुष. | १) शेती २) शिंपी ३) मोची ४) विणकाम |
| ११. | कुष्ठरोगी भिकाऱ्याकरिता प्रमाणित संस्था. ( पुरुष ). केडगाव, ता. व पोस्ट. जेऊर, जिल्हा, सोलापूर. | २५० | कुष्ठरोगी व ५० सुदृढ स्थानबद्ध. | १) शेती २) परीट ३) मोची ४) शिंपी |
| १२. | भिक्षेकऱ्यांचा वर्क कॅंप माळशिरस, जि. सोलापूर. | १०० | सुदृढ स्थानबद्ध. | १) शेती. |
| | | ३८५० | | |

## मनोरुग्णालये

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १. | मध्यवर्ती मनोरुग्णालय येरवडा, पुणे, ६. टे. नं. २२५१५. | | मानसिक विकृत | |
| २. | मनोरुग्णालय, ठाणे. | | मानसिक विकृत | |
| ३. | मनोरुग्णालय, रत्नागिरी. | | मानसिक विकृत | |

## भिक्षाप्रतिबंधक कायद्याखालील खाजगी प्रमाणित संस्था

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १. | किंग जॉर्ज V इनफर्मरी महालक्ष्मी, मुंबई. टे. नं. ३७३८७७. | ३० | अपंग स्त्री-पुरुष. | |

| अ. नं. | संस्थेचे नांव पत्ता टे. नं. इत्यादी. | स्थानबद्धांची अधिकात अधिक संख्या | कोणत्या प्रकारच्या स्थानबद्धाकरिता प्रमाणित | तेथील उद्योग व शिक्षण |
|---|---|---|---|---|
| २. | लेडी धूनबाई जहांगिर, होम फॉर द डेस्टीटयूट, महालक्ष्मी, मुंबई. टे. नं. ३७३८७७. | ३०० | अपंग स्त्री–पुरुष. | |
| ३. | ॲकवर्थ लेप्रसी होम, माटुंगा, मुंबई. | २० | दवाखान्यात ठेवण्यासारखे कुष्ठरोगी स्त्री पुरुष. | |
| ४. | पूना स्कूल ॲंड होम, फॉर ब्लाइंड, कोरगाव पार्क, पुणे, १. टे. नं. | ५० | अंध पुरुष भिकारी | |
| ५. | डेव्हिडससून इनफर्म, असायलम, ७१, नवी पेठ, पुणे, ३०. | ५० | अपंग स्त्री–पुरुष भिकारी. | |
| ६. | इदूलजी फ्रामजी, ऑलब्लेस लेप्रसी होम, ट्रॉम्बे, मुंबई, ७१. | ५० | कुष्ठरोगी पुरुष भिकारी. | |
| ७. | हाजी अल्लारखीया, सोनावाला अंध ॲंड अनाथ स्त्री आश्रम, अंधेरी, मुंबई. | ५० | अंध स्त्री भिकारी | |
| ८. | रेडक्रॉस टी. बी. सॅनिटो-रियम्, अरणगाव, अहमदनगर. | ५० | क्षय झालेले भिकारी | |

| अ. नं. | संस्थेचे नांव पत्ता टे. नं. इत्यादी. | स्थानबद्धाची अधिकात अधिक संख्या | कोणत्या प्रकारच्या स्थानबद्धाकरिता प्रमाणित | तेथील उद्योग व शिक्षण |
|---|---|---|---|---|
| ९. | कुसुमबाई मोतीचंद, महिला सेवा ग्राम, कर्वे रोड, पुणे, ४. टे. नं. ५७४९०. | १० | पतिता भिक्षेकरी स्त्रिया. | |
| १०. | महारोगी सेवा समिती, वरोरा, जिल्हा, चंद्रपूर. | २५ | दग्धरोग (कुष्ठ-रोगी) व्यक्ती. | |
| ११. | जगदंबा कुष्ठ निवास, तपोवन, अमरावती. | ५० | दग्धरोग (कुष्ठ-रोगी) व्यक्ती. | |
| १२. | डिस्ट्रिक्ट लेप्रसी रिलीफ, असोसिएशन, सावेडी, अहमदनगर. | २५ | | |
| १३. | महारोगी सेवा समिती, मालेगाव, जि. नाशिक. | २५ | | |
| १४. | दत्तापूर लेप्रसी कॉलनी, वर्धा. | ५० | | |

## परिशिष्ट ‘ब’

### शिधा पत्रक

G. L. Home Department, No. 770/4/ XF DL./16-8-1946 प्रमाणे

१) प्रत्येक सुदृढ पुरुष भिकाऱ्यास रोजचे अन्नप्रमाण. कष्टाचे काम करणाऱ्यास (शेती, सुतारी, लोहारी इत्यादी कामे).

| १ | २ | ३ | ४ |
|---|---|---|---|
| गहू, ज्वारी, बाजरी, किंवा तांदूळ | डाळ | मीठ | कांदे |
| २४ औंस | ५ औंस | ८ ड्राम | ४ ड्राम |
| ५ | ६ | ७ | ८ |
| मसाला | भाजी | सरपण | चिंच |
| ४ ड्राम | ८ औंस | १ पौंड | ६ ड्राम |
| ९ | | | |
| तेल | | | |
| ६ ड्राम (१ एप्रिल ते ३० सप्टेंबर) | | | |
| १० ड्राम (१ आक्टोबर ते ३१ मार्च) | | | |

२) मध्यम काम करणाऱ्या पुरुष भिकाऱ्याकरिता

| १ | २ | |
|---|---|---|
| गहू, ज्वारी, बाजरी, किंवा तांदूळ | डाळ | इतर प्रमाण १ प्रमाणे. |
| २२ औंस | ४ औंस | |

३) सुदृढ स्त्रिया, कच्च्या कैदेतील भिकारी व अपंगाकरिता.

| १ | २ | |
|---|---|---|
| गहू, ज्वारी, बाजरी, किंवा तांदूळ | डाळ | इतर प्रमाण १ प्रमाणे. |
| २० औंस | ४ औंस | |

**टीप** :- गहू, तांदूळ वगैरे धान्ये रेशनप्रमाणे कमी मिळाल्यास त्याचेऐवजी मटकी, मूग, चवळी, शेंगदाणे किंवा इतर मिळणाऱ्या डाळी द्याव्यात.

## रविवारचे अन्न

१) (अ) शाकाहारी – गव्हाच्या पोळीचे १ वेळचे अन्न, व त्याबरोबर ४ औंस गूळ, व २ औंस बेसन.

(ब) मांसाहारी – गव्हाच्या पोळीचे एक वेळचें अन्न, व त्याबरोबर ५ औंस मटण.

२) २ ड्राम जादा मीठ,

३) २ औंस जादा कांदे,

४) २ ते ५ वर्षांच्या मुलांना खालीलप्रमाणे रिमांडवरील मुलांचे शिधा प्रमाण द्यावे.

| १ | २ | ३ | ४ |
|---|---|---|---|
| गहू, ज्वारी, बाजरी, किंवा तांदूळ | डाळ | मीठ | कांदे |
| १८ औंस | ४ औंस | ८ ड्राम | ४ ड्राम |

| ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
|---|---|---|---|---|---|---|
| मसाला | भाजी | सरपण | चिंच | गूळ | साखर | तेल |
| २ ड्राम | ४ औंस | १२ औंस | २ ड्राम | ½ औंस | ३ औंस आठवड्याला | |

६ ड्राम ( १ एप्रिल ते ३० सप्टेंबर )

२१ ड्राम ( १ आक्टोबर ते ३१ मार्च )

**टीप :** डॉक्टरांच्या सल्ल्यावरून योग्य अन्न देता येईल.

आठवड्याचे विशेष पदार्थ परिपत्रक B. B. S. ६५४. दिनांक ३१–५–१९५५ प्रमाणे. ( ग्रामच्या हिशेबात. )

| | साबण चुरा | खोबरेल तेल | शिकेकाई किंवा अंघोळीचा साबण |
|---|---|---|---|
| पुरुष | ५८ ग्रॅम | १४ ग्रॅम | २९ ग्रॅम |
| स्त्रिया | ५८ ग्रॅम | २९ ग्रॅम | २९ ग्रॅम |

**टीप –: १)** १ औंसाचे ३० ग्रॅम या हिशेबात सध्या शिधा दिला जातो.

**२)** वरील शिधावाटपाचें प्रमाण लौकरच बदलणार आहे असे वाटते. पण हे प्रमाण १९७२–७३ मध्ये चालू आहे.

# परिशिष्ट ' क '

## महाराष्ट्रातील अपंगांचेसाठी काम करणाऱ्या संस्थांची यादी

## ( अ ) अंधांची सेवा करणाऱ्या संस्था

### शासकीय संस्था

१. शासकीय अंध शाळा,
कालेवार बिल्डिंग, स्टेशन रोड, नाशिक, टे. नं. ६३०६

२. शासकीय अंध शाळा,
भंडारा, टे. नं. ३६१

३. शासकीय अंध शाळा,
हौसिंग कॉलनी, लातूर, जिल्हा उस्मानाबाद.

४. शासकीय अंध शाळा,
नांदवी, तालुका, माणगाव, जि. कुलाबा.

### मान्यता दिलेल्या अंधशाळा

१. दी. व्ही. एम. स्कूल, फॉर दी ब्लाईंड
ताडदेव मुंबई नं. ३४. टे. नं. ३७९२३६

२. दी. दादर स्कूल, फॉर दी ब्लाईंड
१६०, दादासाहेब फाळके रोड, मुंबई १४. टे. नं. ४४२१४४

३. दी हॅपी होम अँड स्कूल, फॉर दी ब्लाइंड
डॉ. अॅनी बेझंट रोड, वरळी, मुंबई १८. टे. नं. ३६३८६६
,, ३७३१८३

४. दी पूजा स्कूल अॅन्ड होम फॉर दी ब्लाईंड
१४–१७ कोरेगाव पार्क, पुणे १. टे. नं. २२९८३६

५. दी ब्लाईंड बॉइज इंस्टीटयूट,
साऊथ अंबाझरी रोड, नागपूर, टे नं. २२६३९

६. दी स्कूल फॉर दी ब्लाईंड,
देवपूर, धुळे.

७. दी स्कूल फॉर दी ब्लाईंड बोधाडी,
रेल्वे स्टेशन, साऊथ रोड, ता. किनवट, जिल्हा नांदेड.

८. दी स्कूल फॉर दी ब्लाईंड,
अमरावती, मांगिलाल प्लॉटस्, अमरावती.

९. आनंद विद्यालय,
आनंदवन, वरोरा, जिल्हा चंद्रपूर.

१०. दी स्कूल फॉर दी ब्लाईंड, चाळीसगांव,
चाळीसगांव, जिल्हा जळगांव

## अंध स्त्री-पुरुषासाठी कर्मशाळा व संस्था

१. एन्. एस्. डी. इंडस्ट्रिअल होम फॉर दी ब्लाईंड,
बी. डी. डी. चाळ नं. ५२, वरळी, मुंबई १८. टे. नं. ३७५९९५

२. एम्. एन्. बनाजी इंडस्ट्रियल होम फॉर दी ब्लाईंड,
२८०, घोडबंदर रोड, जोगेश्वरी, मुंबई ६०. टे. नं. ५७२४८७

३. दी वर्कशाप फॉर दी ब्लाईंड,
वरळी, डॉ. ॲनीबेझंट रोड, वरळी, मुंबई १८. टे. नं. ४०४२४७
" ४५२४५९

४. दी शेल्टर्ड वर्कशॉप फॉर दी ब्लाईंड,
पुणे, ८२, रास्ता पेठ, पुणे २, टे. नं. २५३४४

५. दी इंडस्ट्रिअल होम फॉर दी ब्लाईंड वीमेन,
१६०, दादासाहेब फाळके रोड, दादर, मुंबई १४. टे. नं. ४४२१४४

६. शेल्टर्ड वर्कशॉप फॉर दी ब्लाईंड,
साऊथ अंबाझरी रोड, नागपूर. टे. नं. २२६३९

७. इंडस्ट्रिअल रिहॅबिलिटेशन युनिट,
५१, महात्मागांधी रोड, मुंबई १. टे. नं. ४५४२४७

८. दी टाटा ॲग्रीकलचरल ॲंड रूरल ट्रेनिंग सेंटर
फॉर दी ब्लाईंड, फानसे.
१) c/o ५१, महात्मा गांधी रोड, मुंबई १.

२) किंवा ऑ. ट्रेजरर, टाटा ट्रस्ट, बॉम्बे हाऊस,
ब्रूस स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १.

९. दी श्रम साधना ट्रस्ट वर्कशॉप फॉर दी ब्लाईंड,
१५९, शांती पेठ, जळगाव.

## अंधाच्या इतर संस्था

१. इंडस्ट्रिअल इंस्टिटयूट फॉर दी ब्लाईंड, डेफ अँड डंब
उत्तर अंबाझरी मार्ग, शंकर नगर, नागपूर.

२. दी हाजी अल्लारखिया सोनावाला, अँड अनाथ आश्रम,
३७, गिळबर्ट हिल, वरसोवा रोड, अंधेरी, मुंबई.

३. दी ब्लाइन्ड रिलीफ असोसिएशन,
बोरावाला बिल्डिंग, ४८१, काल्बादेवी रोड, मुंबई, २.

## ( ब ) मूकबधिरांची सेवा करणाऱ्या संस्था, शासकीय संस्था

१. मूकबधिरांची शासकीय शाळा,
आठले बिल्डिंग, अकोला. टे. नं. ८३०

२. शासकीय मूकबधिर शाळा,
गोंधळपाडा, अलिबाग, जि. कुलाबा. टे. नं. ८३

३. शासकीय मूकबधिर शाळा,
औरंगाबाद, नागसेन को–ऑपरेटिव्ह सोसायटी,
जिनसी ब्लॉक ३३–३४, औरंगाबाद.

## मान्यता दिलेल्या मूकबधिर शाळा

१. दी बॉम्बे इन्टिटयूशन फॉर डेफ अँड म्यूट
३३, नेसबिट रोड, माझगाव, मुंबई १०.

२. दी डेफ अँड डंब स्कूल, ( डे स्कूल )
ठाणा स्टेशन रोड, कलेक्टर ऑफिस शेजारी, ठाणे.

३. व्ही. आर. रूइया मूकबधीर विद्यालय, पुणे.
टिळक कॉलेज ऑफ एज्यूकेशन, टिळक रोड, पुणे ३०.

४. डेफ ॲण्ड डंब स्कूल, सोलापूर, ( डे स्कूल )
नवी पेठ, प्रभात टॉकीज़ शेजारी, सोलापूर.

५. दी भारत मूकबधिर विद्यालय, नागपूर, ( डे स्कूल )
गांधीबाग, नागपूर २.

६. दी बॉबे डेफ ॲंड डंब इन्स्टिटयूशन ( डे स्कूल )
काकडवाडी, मुंबई ४. टे. नं. ३५६०५०

७. दी स्कूल फॉर डेफ ॲंड डंब ( डे स्कूल )
विजय शिक्षण संस्था, मराठी ग्रंथ संग्रहालय,
१७२, नायगाव क्रॉस रोड, दादर, मुंबई १४. टे. नं. ४४१५५३

८. एज्युकेशन ऑडिऑलजी रीसर्च सेंटर ( डे स्कूल )
'पुनम' ६७, नेपियन रोड, मुंबई ६. टे नं. ३६१७०५

९. विकास विद्यालय फॉर दी डेफ ( डे स्कूल )
F. 7 शंकर निवास, भवानी शंकर रोड, दादर, मुं. २८.

१०. दी डेफ डंब ॲंड ब्लाइन्ड इन्स्टिटयूट,
नॉर्थ अंबाझरी रोड, नागपूर.

११. दी स्कूल फॉर दी डेफ
c/o दी सेंट्रल सोसायटी फॉर दी एज्युकेशन ऑफ डेफ
१८, मोराजीबाई स्ट्रीट, अग्रिपाडा, म्यु. शाळेसमोर,
भायखळा, मुंबई.

१२. दी स्टीफन स्कूल फॉर दी डेफ,
दादीशेट रोड, चौपाटी, मुंबई ७.

१३. मूकबधिर विद्यालय,
लायन्स क्लब, मालेगाव, जिल्हा नाशिक.

१४. दी वाचा प्रशिक्षण विद्यालय फॉर दी डेफ चिल्ड्रन,
कोल्हापूर, दी न्यू. एज्युकेशन सोसायटी,
न्यू महाद्वार रोड, कोल्हापूर.

१५. दी इन्स्टिटयूट फॉर दी हॅण्डकॅप्ड इन हिअरिंग,
मिरज, कृपामाई नर्सिंग होम, मिरज, जि. सांगली.

## कर्मशाळा व इतर संस्था

१. गव्हर्नमेंट ट्रेनिंग सेंटर फॉर ॲडल्ट डेफ
शांती भवन, कँप ५, उल्हासनगर, जि. ठाणे.

२. प्रो. दाते यांची मूक बधिर शाळा
ठाकुरद्वार, मुंबई,

३. बॉंबे डेफ अँड डंब सोसायटी,
केअर युनायटेड आशिया, १२ रॅमपार्ट रोड, मुंबई १.

## ( क ) मतिमंदांची सेवा करणाऱ्या संस्था

### शासकीय शाळा

१. मतिमंद मुलींची शाळा,
शिरूर, जिल्हा, पुणे.

### मान्यता दिलेल्या शाळा

१. दी 'हेवन' मोदी मिरर बंगलो रोड, वरसोवा,
व्हाया अंधेरी, मुंबई ५८. टे. नं. ५७१५८१

२. स्कूल फॉर दी चिल्ड्रन इन नीड ऑफ स्पेशल,
केअर, मुंबई, शिवडी हिल, मुंबई, ५६. टे नं. ३७२७७०

३. 'नंदनवन' स्कूल फॉर दी मेंटली हँडी कॅप्ड ( डे स्कूल )
c/o मातृ सेवा संघ, नॉर्थ अंबाझरी रोड, नागपूर, टे. नं. २६०४४

४. स्कूल फॉर दी मेंटली हँडी कॅप्ड ( डे स्कूल )
कामायनी बंगला, ११८७/६४ शिवाजी नगर, पुणे ५.
टे. नं. ५७००६

५. दी स्कूल, लायन्स जुहू सेंटर फॉर मेंटली हॅण्डीकॅप्ड्, खार
संशोधन सदन, साऊथ ॲव्हेन्यू, खार, मुंबई ५२
टे. नं. ५३२६९१

६. दी स्कूल फॉर दी मेंटली रिटार्डेड चिल्ड्रन,
कुमारिका स्त्री मंडळ, सरोजिनी रोड, विलेपार्ले मुंबई ५६.

७. होम फॉर मेंटली डेफिशिअंट चिल्ड्रन, मानखुर्द, मुंबई.

## मतिमंदासाठी कर्मशाळा व इतर संस्था

१. शेल्टर्ड्‌ वर्कशॉप फॉर मेंटली हँडीकॅप्ड्‌ ॲडल्टस्‌
मातृ सेवा संघ, नॉर्थ अंबाझरी रोड, नागपूर.

२. शेल्टर्ड्‌ वर्कशॉप फॉर दी मेंटली हँडीकॅप्ड्‌, मुंबई
c/o सोसायटी फॉर दी व्होकेशनल रीहॅबीलीटेशन ऑफ दी रिटार्डेड्‌,
किलाचंद मॅनशन, २९८ प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई २.

३. स्पेशल स्कूल फॉर मेंटली हँडीकॅप्ड्‌ चिल्ड्रन
बळराम भवन, ३ रा मजला ग्रँटरोड, मुंबई ७.

४. जानकीराम विद्यालय, रामनिवास, तळमजला भालचंद्र रोड माटुंगा, मुंबई.

५. शिशि मांगल्यम्‌, थिऑसॉफिकल सोसायटीसमोर
१०–११ जुहू रोड, सांताक्रुझ ( वेस्ट ) मुंबई–५८.

६. कस्तुरबा नर्सरी, एदनवाला मॅनशन चौपाटी, मुंबई ७.

७. स्कूल फॉर हॅण्डीकॅप्ड्‌ चिल्ड्रन, मेंटली रिटार्डेड.
( मुंबई कॉर्पोरेशनने चालविलेले ).

८. होम फॉर दी एजेड ॲंड हॅण्डीकॅप्ड्‌
उंटखाना, मेडिकल कॉलेज, रोड, नागपूर. टे. नं. २५६९१

## (ड) अस्थिव्यंग असणाऱ्यांची सेवा संस्था

### शासकीय संस्था

१. गव्हर्नमेंट होम फॉर दी क्रिपल्ड चिल्ड्रन.
रामदास पेठ, नागपूर. टे. नं. २४७२६

२. गव्हर्नमेंट होम फॉर दी क्रिपल्ड चिल्ड्रन.
नागसेन को-ऑपरेटिव्ह हौसिंग सोसायटी, औरंगाबाद.

३. गव्हर्नमेंट होम फॉर दी क्रिपल्ड चिल्ड्रन.
किल्ला, मिरज.

## मान्यता दिलेल्या संस्था

१. स्कूल फॉर दी बेड रिडन चिल्ड्रन इन.
दी बाई जेरबाई वाडिया हॉस्पिटल, सायन–ट्रॉंबवे रोड, देवनार मुंबई ८८.

२. सोसायटी फॉर दी एज्युकेशन ऑफ दी क्रिपल्ड चिल्ड्रन.
मोटलबाई स्ट्रीट, आग्रीपाडा, मुं. ११. टे. नं. ३७०८१०

३. दी सोसायटी फॉर दी वेल फेअर ऑफ फिझीकली हॅंडीकॅण्ड.
वानवडी, पुणे १. टे. नं. २२९४५

४. होम फॉर दी एजेड ॲंड हॅन्डीकॅफ्ड, मुलांचा विभाग.
उंटखाना मेडिकल कॉलेज रोड, नागपूर. टे. नं. २५६९१

५. अपंग कल्याण केंद्र, अणे,
तालुका, जुन्नर, जि. पुणे

६. नॅशनल सोसायटी फॉर इक्वल ॲपॉरच्युनिटीज् फॉर दी हॅंडीकॅप्ड,
सर विठ्ठलदास चेंबर्स, अपोलो स्ट्रीट, मुंबई, १.

७. सोसायटी, फॉर दी क्रीपल्ड चिल्ड्रन, चिल्ड्रन्स ऑरथोपेडिक हॉस्पिटल,
हाजी अली पार्क, महालक्ष्मी, मुंबई ११.

## कर्मशाळा व औद्योगिक संस्था

१. गव्हर्नमेंट शेल्टर्डड वर्कशॉप फॉर दी डेफ, म्यूट ॲण्ड क्रिपल्ड,
( ॲडल्टस् ) जुनी चोखामेळा इमारत, मंगळवारी बाजारा जवळ,
नरी बस्ती, नागपूर. टे. नं. २६३०१

२. गव्हर्नमेंट शेल्टर्डड वर्कशॉप फॉर ॲडल्ट फिजिकली हॅंडीकॅफ्ड्,
सिकची भवन, भटकळ गेट, औरंगाबाद.

## ( इ ) कुष्ठ रोग्यांना मदत करणाऱ्या संस्था

१. लेप्रसी क्लिनिक, अल्लीपूर, जि. चांदा.

२. सेंट ॲंड्र्यूज, लेप्रसी क्लिनिक, कागल, जि. कोल्हापूर.

३. लेप्रसी हॉस्पिटल, नाशिक पंचवटी, नाशिक.

४. कुष्ठरोग्यासाठी नाशिक नगरपालिकेचा दवाखाना. पंचवटी, नाशिक.

५. नाशिक डिस्ट्रिक्ट लेप्रसी असोशिएशन
शिशुविहार व कुष्टधाम, पंचवटी नाशिक

६. लेप्रसी हॉस्पिटल, पोलादपूर, जिल्हा – कुलाबा.

७. हिंद कुष्ट निवारण संघ शाखा
रेडक्रॉस बिल्डिंग, १४१ मिंट रोड, मुंबई–१.

८. गांधी मेमोरिअल लेप्रसी फौंडेशन वर्धा.

९. लेप्रसी हेल्थ युनिट, डायरेक्टोरेट ऑफ मेडिसीन अँड पब्लिक हेल्थ
कनॉट हाऊस, पुणे–१.

१०. आनंदवन महारोगी सेवा समिती वरोरा, जिल्हा चांदा.

११. प्लास्टिक सर्जरी युनिट, जे. जे. ग्रुप ऑफ हॉस्पिटलस्, भायखळा, मुंबई.

१२. पुना डिस्ट्रीक्ट लेप्रसी कमेटी, १८ वेलस्ली रोड, पुणे–१.

१३. रिचर्डसन लेप्रसी हॉस्पिटल, मिरज, जि. सांगली.

१४. लेप्रसी सेक्शन, स्किन डिपार्टमेंट.
के. ई. एम. हॉस्पिटल, परेल, मुंबई १२.

१५. दत्तापूर लेप्रसी कॉलनी, अमरावती. जि. वर्धा.

१६. स्किन डिपार्टमेंट, ससून हॉस्टिल, पुणे.

१७. स्पेशल लेप्रसी ऑफिसर, महाराष्ट्र राज्य, कनॉट हाऊस, पुणे, १.

१८. विदर्भ महारोगी सेवा मंडळ, अमरावती.

१९. अॅकवर्थ लेप्रसी होम, वडाळा, मुंबई.

२०. व्हिलेज ऑफ लेप्रसी पेशंटस्, वडाळा मिशन, जि. अहमदनगर.

२१. पीपल्स मेडिकल हॉल, जय मंदीर, वर्धा.

२२. एस्. ई. टी. युनिटस् (अ) सेवाग्राम, वर्धा जिल्हा.
(ब) जामनेर, जळगाव जिल्हा.

२३. आनंदग्राम सोसायटी, आळंदी रोड, पुणे.

२४. हॉस्पिटल फॉर लेप्रसी केसेस, सातारा.

२५. कोंढवा लेप्रसी हॉस्पिटल, पुणे, १.

या शिवाय परिशिष्ट 'अ' मध्यें अधीक संस्था आहेत.

## महाराष्ट्रातील वृद्धाश्रम

## वृद्ध अपंगाची सेवा करणाऱ्या संस्था

१. होम फॉर दी एजेड अँड हॅण्डीकॅप्ड्.
मेडिकल कॉलेज रोड, उंटखाना, नागपूर.

२. मातृसेवा संघ, पंचवटी आश्रम, नागपूर.

३. गुरूदेव वृद्धाश्रम, मोझरी, जि. अमरावती.

४. डेविड ससून इनफर्म असायलम, ७१ नवी पेठ, पुणे ३०.

५. इश–प्रेम-निकेतन, पदमजी पार्क, पुणे २.

६. लेप्रसी रिलीफ असोसिएशन, वृद्धाश्रम, अहमदनगर.

७. डब्यू. बी. एन्. ऑर्फनेज होम फॉर ओल्ड वीमेन.
पंढरपूर, जिल्हा सोलापूर.

८. नेहरू चाचा शिक्षणसंस्था, गांधी वृद्धाश्रम.
चाफळ, तालुका पाटण, जि. सातारा.

९. श्रद्धानंद महिलाश्रम, होम फॉर ओल्ड वीमेन, मुंबई १९.

१०. श्री गाडगे महाराज धर्मशाळा ट्रस्ट, परमधाम वृद्धाश्रम,
बळगाव, जिल्हा अमरावती.

११. नॅब लायन्स होम, फॉर एजिंग ब्लाईड.
नझीर बंगला, हायलॅंडस, लोणावळा, जि. पुणे.

## आधारभूत ग्रंथ


१. मुंबई भिक्षेकऱ्यांचा कायदा १९४५

२. मुंबई भिक्षा प्रतिबंधक कायदा १९५९

३. मुंबई मुलांचा कायदा १९२४ व १९४८.

४. महाराष्ट्र भिक्षाप्रतिबंधक नियम १९६४

५. अन्नासाठी दाहिदिशा ले. – शरश्चंद्र गोखले

६. अपंगांची हाक ले. – शरश्चंद्र गोखले

७. Beggass Problem in Greater Bombay, by Dr. M. T. Moorthy. Ph. D.

८. Report of the Evaluation Committee on Industrial, Occapational and Aricultural programmes in the Beggars Homes in the Maharashtra State-1963-64.

९. Principles and Practice of Public Administration, by M. Ruthanswami.

१०. Practice and Theory of Probation and Parole by David Dressler, Columbia University-1959.

११. Index of Institutions for the Handicapped in India and Reference material published by the Indian Conference of Social Work, Bombay.

१२. Article by Dr. Price—on Transvestides in Samaj Seve of May 1961.

१३. Social Defence Vol. III Number 10 October 1967—"Beggars Problem in India" by Shri P. K. Bhattacharya-Abu.

१४. 'Punishment'— by Hans Van. Hentig william Hodge and Company Ltd. London, Edimburgh, Classgow (1937).

१५. दैनिक सकाळ दिनांक १० मार्च १९७३ पान ७, 'छोट्या बातम्या'